अखिल भारतीय प्राच्यविद्यासम्मेलन
शतवर्ष महोत्सव ग्रंथमाला — ९१

# लघुजातकम्

(मराठी भाषांतर)

संपादन

**प्रा. डॉ. कृष्णकुमार पाण्डेय**

मराठी भाषांतर

**श्री. नंदकिशोर सुधाकर बढे**

प्रधानसंपादक

**आचार्य श्रीनिवास वरखेडी**

कुलगुरु

संपादक

**आचार्य मधुसूदन पेन्ना**

संचालक, संशोधन व प्रकाशन विभाग




**कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय**



रामटेक, जि. नागपुर (महाराष्ट्र)

शीर्षक – लघुजातकम् (मराठी भाषांतर)

संपादन – प्रा. डॉ. कृष्णकुमार पाण्डेय

मराठी भाषांतर – श्री. नंदकिशोर सुधाकर बढे

प्रधानसंपादक – आचार्य श्रीनिवास वरखेडी
कुलगुरु, क.का.सं.वि., रामटेक

संपादक – आचार्य मधुसूदन पेन्ना
संचालक, संशोधन व प्रकाशन विभाग,
क.का.सं.वि., रामटेक

अखिल भारतीय प्राच्यविद्या सम्मेलन – प्रो. गौतम पटेल, अध्यक्ष
प्रो. सरोजा भाटे, सचिव
प्रो. ग. उ. थिटे, उपाध्यक्ष

संपादक मंडळ – डॉ. दिनकर मराठे, क.का.सं.वि., रामटेक
डॉ. वीणा गानु, नागपुर.

प्रकाशन वर्ष – २०२०

आवृत्ती – प्रथम

मूल्य – रू. ३२५/–

आय.एस.बी.एन. – ९७८–९३–८५७१०–४८–३

मुखपृष्ठ – श्री. उमेश पाटील

मुद्रक – दुर्गा प्रिन्टींग, नागपूर

प्रकाशक – कुलसचिव, क.का.सं.वि., रामटेक
प्रशासकीय भवन, मौदा रोड, रामटेक.

## PREFACE

It is indeed a matter of great pleasure and pride for Kavikulaguru Kalidas Sanskrit University, Ramtek to have this rarest opportunity of hosting the 50th session of All India Oriental Conference at Nagpur. This AIOC-50th session at Nagpur will be forever remembered by all as the year 2019 also happens to be the year of Centenary Celebration of AIOC. The premier objective with which the great scholars of yester years had contemplated and established this national academic event called All India Oriental Conference has been achieved through these years with scores of young scholars contributing significantly to the treasure house of knowledge through their valuable research work.

The research of yore and of the present should be properly recorded so as to make it easily available to all lovers of knowledge and wisdom in the years to come. With this objective, we have contemplated to commemorate the 100th year of this grand event of 50th session of AIOC by way of publishing 100 monographs on different subjects in four languages viz., Sanskrit, Hindi, Marathi and English. It is no doubt a herculean task but still worth of it, for the reason that these 100 monographs will inspire many young scholars to take upon a fresh study and research of the oriental subjects with more vigour and zeal.

The AIOC Centenary Publication Series includes wide variety of subjects like Literature, Language, Veda, Indian Philosophy, Sanskrit Grammar, Law, Children Literature, Yoga, Astronomy and Astrology, Ayurveda, Pali, Prakrit, Jain, Buddhism, Education, Library Science, Poetics, Aesthetics, and Indology. It also includes reprint of some rare texts of academic importance which have gone out of print are not easily available. We wish to mark this centenary celebrations with this series that connects the glory of the past and aspirations of future. I place on record my sincere gratitude to all the authors of these monographs who have kindly contributed to the richness of this

series.

I am confident that the books published in these series will definitely inspire the lovers of Oriental Learning in general and of Sanskrit Language and Literature in particular.

On this occasion, we have published a memorable book of all the speeches of Section-Presidents of all previous sessions of AIOC. It is indeed a very capacious addition to any collection. I with all respect thank two eminent scholars of our times - Prof. Gautam Patel, President and Prof. Saroja Bhate, General Secretary, the torch bearers of AIOC who have not only encouraged us in this venture but also made all efforts to provide these valuable historical speeches for us. I thank all executive members of AIOC and my colleagues of the varsity for making this event a grand success.

My words fall short in describing the painstaking efforts and scholarly commitment of my esteemed colleague Prof. Madhusudan Penna, local secretary of this session in bringing out this series.

I also take this opportunity to profusely thank Shri. Subhash Jain and Shri Dipak Jain, the proprietors of New Bharatiya Book Corporation, New Delhi for their enthusiastic approach and timely work with all precision and grace.

Let us all sanctify ourselves in the eternal flow of wisdom by reading these books and recommending these to others also!

सरस्वती श्रुतिमहती महीयताम्

Ramtek
10th January 2020

Prof. Shrinivasa Varakhedi
Vice Chancellor, KKSU

**Kavikulaguru Kalidas Sanskrit University**
**All India Oriental Conference**

**100th Year 50th Session**
**10th-12th January, 2020**

## Chief Patron

Hon'ble Nitin Gadkari
Minister of Road, Transport & Highways of India

## Patron

Prof. Srinivasa Varakhedi
Vice Chancellor, KKSU, Ramtek

## AIOC President

Prof. Gautam Patel
Chairman, Sanskrit Seva Samiti, Ahmedabad.

## AIOC General Secretary

Prof. Saroja Bhate
Professor of Sanskrit (Retd.), Pune University, Pune

## AIOC Local Secretary

Prof. Penna Madhusudan
Dean, KKSU, Ramtek

## Additional Local Secretary

Dr. Harekrishna Agasti
Dr. Kalapini Agasti
Dr. Dinakar Marathe
Dr. Parag Joshi

## Organising Committee

Prof. C.G. Vijayakumar, Registrar (I/c) & Dean, KKSU, Ramtek
Prof. Nanda Puri, Dean, KKSU, Ramtek
Prof. Krishnakumar Pandey, Dean, KKSU, Ramtek
Prof. Laita Chandratre, Dean, KKSU, Ramtek
Dr. Ramachandra Joshi, Finance Officer, KKSU, Ramtek
Dr. Umesh Shivahare, Controller of Examination, KKSU, Ramtek
Dr. Dipak Kapade, Librarian, KKSU, Ramtek
Dr. Renuka Bokare, PRO, KKSU, Ramtek

Shri. Rajivranjan Mishra, Technical Head, KKSU, Ramtek
Shri. Pravin Kalambe, Security Officer, KKSU, Ramtek

## Reception Committee

Prof. Shrinivasa Varakhedi, Chairperson Reception Committee & VC, KKSU
Parampujya Govindagiri Swamiji, Rishikesh
Prof. P.T. Chande, Former VC, KKSU
Prof. Uma Vaidya, Former VC, KKSU
Prof. Vijendra Kumar, VC, National Law University, Nagpur
Prof. Rajnish Shukla, VC, National Hindi University, Wardha
Prof. Vinayak Kane, VC, RTM Nagpur University, Nagpur
Shri. Krupal Tumane, Member of Parliament
Shri. Girishji Vyas, Member of Legislative Council
Shri. Chandrashekhar Bawankule, Guardian Minister, Nagpur
Prof. Vishram Jamdar, Director, VNIT, Nagpur
Dr. Bhushankumar Upadhyay, Commissioner of Police, Nagpur
Shri. Vijay Phanshikar, Editor, The Hitavada, Nagpur
Shri. Rajkumar Tirpude, Tirpude Group of Insitutions, Nagpur
Shri. Mohabbat Singh, Tuli International, Nagpur.
Shri. Chandragupta Varnekar, Principal Retd., Nagpur
Shri. Suresh Sharma, Baidyanath, Nagpur
Shri. Prabhakar Rao Mundle, Dharampeth Educational Institutions, Nagpur

## Executive Committee

Prof. G. U. Thite,
Vice President

Dr. Brijeshkumar Shukla,
Treasurer

## Members

Dr. Rajni Satish Chandra Jha
Prof. Shukla Ramakant
Dr. Behera Ranjit
Dr. Meena Shukla
Dr. Nirmala Kulkarni
Dr. Roy Gauri Nath
Dr. Tripathi Uma Rani
Dr. Pushpa Jha
Dr. Basu Ratna
Dr. Mithilesh Kumar
Prof. Singh Prasoon Dutta
Shri. Mishra Arun Ranjan
Dr. Mishra Baidyanath
Dr. Tripathi Rajendra Rasraj
Shri. Harshdev Madhav
Dr. Kamdev Jha
Dr. Parinita Deshpande
Dr. Jha Udayanath (Ashok)

## कृतज्ञता

---

**सदगुरू : परमपूज्य आदरणीय गुरूमाउली**
**प्रल्हाद ईंगळे उर्फ नानाजी विवरा ( अकोला )**

**परमपूज्य आजोबा-आजी**
तीर्थरूप.स्व. श्री निनू महादू बढे
तीर्थरूप.स्व.ग.भा.शेवंताबाई निनू बढे
तीर्थरूप.स्व. श्री रामभाऊ आनंदा चौधरी
तीर्थरूप.स्व.ग.भा.चंद्रभागाबाई रामभाऊ चौधरी

**परमपूज्य आई-बाबा**
तीर्थरूप.सुधाकर निनू बढे
तीर्थरूप.स्व.सौ.कुसूम सुधाकर बढे.
तीर्थरूप.स्व.श्रीमती.सुशिला सुधाकर बढे.



*यांच्या चरणी समर्पित*
**नंदकिशोर सुधाकर बढे**



# प्रस्तावना

ज्योतिष शास्त्राचे नाव आजच्या काळात समाजातील कोणत्याही वर्गाला अपरिचित नाही. हे शास्त्र अनादी काळापासून ज्ञानी समाजात तेवढेच आदरणीय राहीले आहे. ज्योतिष शास्त्राच्या सिध्दान्त स्कंधाव्दारे जातकाच्या संपूर्ण हालचालींना काळजीपूर्वक दिशा दाखविण्याचे सामर्थ्य आहे.होरा शास्त्र जाणून घेण्याच्या दृष्टीने आचार्य वराहमिहिर यांनी लिहीलेला हा लघुग्रंथ अग्रगण्य आहे, यात शंका नाही. या ग्रंथाच्या वाचनाने व अभ्यासाने सहज होरा स्कंधासंबंधी अल्पज्ञानीसुध्दा कमी वेळात प्राविण्य मिळवू शकतो. या ग्रंथासंबंधी अनेक आचार्यांनीं वेगवेगळया टीका लिहील्या आहेत. मात्र त्यांपैकी आचार्य उत्पल भट्ट यांची संस्कृत टीकाच परीपूर्ण असून सर्वोत्कृष्ट ठरली आहे. महाराष्ट्रात मराठी ही मातृभाषा असल्याने तीचा सहज आणि स्वाभाविकपणे वापर केल्या जातो. महाराष्ट्रात ज्योतिष शास्त्राची महान परंपरा राहीली आहे. अनेक निष्णात पंडीत इथे होऊन गेलेत. ज्योतिष शास्त्रासंबंधी बहुतांश मूळ ग्रंथ, वाङ्मय हे संस्कृत भाषेतून आहेत. नंतरच्या काळात त्याचे हिंदी भाषेतील ग्रंथ उपलब्ध झालेत. मात्र मराठी भाषेत अजूनही संपूर्ण ज्योतिष शास्त्रासंबंधी ग्रंथ मराठी भाषेत उपलब्ध झाले नाहीत. आजपर्यंत काहीच प्रमाणात मराठी ग्रंथ उपलब्ध आहेत.मराठी भाषेतून लघुजातकम् हा ग्रंथ उपलब्ध असल्याचे आढळून आले नाही.

माझे प्रिय शिष्य श्री नन्दकिशोर बढेजी यांनी लघुजातकम् ह्या ग्रंथाचे मराठीत भाषांतर करून त्यात ठिकठिकाणी आवश्यकतेनुसार विशेष व्याख्या सादर केल्या आहेत. मराठी भाषीक तसेच मराठी वाङ्मयाचा व्यासंग असलेल्या जिज्ञासू आणि ज्ञानपिपासू जनांसाठी त्यांनी प्रशंसनीय कार्य केले आहे. वेळोवेळी अनेक ठिकाणी माझ्यासोबत शास्त्रीय दृष्ट्या गंभीर आाणि विस्तृत चर्चा करून त्यासंबंधी स्पष्टीकरण सुध्दा दिलेले आहे. या कार्याची ज्योतिष शास्त्रासंबंधी जिज्ञासा व तसेच आवड असणाऱ्यांना अतिशय आवश्यकता भासत होती. या ग्रंथामुळे त्यांची जिज्ञासा पूर्ण होईल अशी आशा आहे.

या ग्रंथलेखनाच्या कार्याला सहजपणे संपन्न करण्यामागे त्यांच्या धर्मपत्नी सौ. मधुमालती नन्दकिशोर बढे यांचे बरेच योगदान राहीले आहे. त्यांनी केलेल्या ह्याा कार्यासाठी मी श्री नन्दकिशोर बढे आणि सौ. मधुमालती बढे यांच्या उत्कर्षाची मनोकामना करून त्यांच्या पुढील आयुष्यासाठी शुभेच्छा देतो.

नागपूर

**संपादक**



**प्रा. डॉ. कृष्णकुमार पाण्डेय**
कविकुलगुरू कालिदास संस्कृत विश्वविद्यालय रामटेक
जिल्हा नागपूर

# माझे मनोगत

सर्वप्रथम आदरणीय सद्‌गुरू आणि सर्व गुरूजनांना नमन करून माझे मनोगत व्यक्त करतो की, अनेक दिवसांपासून वेगवेगळया विषयांवर पुस्तक लिहिण्याची इच्छा होती. ती या ग्रंथाद्वारे सुरूवात झाली आणि हे सर्व सद्‌गुरू आणि गुरूजनांच्या कृपेमुळेच शक्य झाले. मी वेदांग ज्योतिष शास्त्राचा अभ्यास करतांना त्या त्या विषयाचे मराठी पुस्तक खूप शोधले. पण अनेक प्रकारच्या अडचणी आल्या. सर्व पुस्तके संस्कृत आणि हिंदीतूनच होती. काहीच मराठी भाषेतून मिळाली. माझे गुरूवर्य प्रा.डॉ. कृष्ण कुमार पाण्डेय सर, अधिष्ठाता, प्राचीन भारतीय विज्ञान, कवि कुलगुरु कालिदास संस्कृत विद्यापीठ रामटेक, डॉ. प्रसाद गोखले सर आणि डॉ. दिनकर मराठे सर यांना विचारणा केली असता त्यांनीपण सांगीतले की ज्योतिष शास्त्रातील बहुतांश अभ्यासाची पुस्तके संस्कृत आणि हिंदीतूनच आहेत. त्यावेळी त्यानीच सुचविले की, तुम्हीच ज्योतिषशास्त्राची वेगवेगळया विषयाची पुस्तके मराठी भाषेतून लिहा किंवा संस्कृत/हिंदी भाषेतील पुस्तकांचे मराठीत भाषांतर करा. त्यांचा हा आदेश लक्षात घेता, मला ज्योतिषशास्त्र शिकतांना ज्या अडचणी गेल्या त्या इतरांना जावू नयेत म्हणून हा माझ्या आयुष्यातील पहिलावहीला ग्रंथ लघुजातकम् मराठी भाषांतर, भट्टोत्पल संस्कृत टीकासहीत आपल्या समोर सादर करतांना आनंद तर होतोच पण सोबतच भिती पण वाटत आहे. कारण ज्योतिषशास्त्र विषयात अनेक रथी, महारथी, शास्त्र पारंगत, ज्ञानी लोकांनी या आधीच मोठी मोठी पुस्तके लिहून ठेवली आहे आणि म्हणून लहान तोंडी मोठा घास तर आपण घेत नाही ना? असे वाटते. परंतू मा. गुरूवर्याच्या आदेशाचे पालन करून त्यांनी वाढविलेला उत्साह दिलेली हिंमत आणि त्यांच्या वेळोवेळीच्या मार्गदर्शनाने हा ग्रंथ लिहून पूर्ण केला. आशा आहे नवीन शिकणाऱ्या विद्यार्थ्यासांठी याचा उपयोग होईल. मराठी भाषीक, मराठी वाङ्‌मयात रूची ठेवणाऱ्या, जिज्ञासूंसाठी हा एक छोटासा प्रयत्न आहे. माझे दुसरे पुस्तक फलदीपीका ह्या ग्रंथाचेही मराठी भाषांतर सुरूच आहे. ते पण लवकरच पूर्ण होईल अशी आशा आहे. या पुस्तक लिहिण्यासाठी गुरूवर्यांचे तसेच माझे सद्‌गुरू आदरणीय नानाजी यांचे मार्गदर्शन, नैतिक आधार आणि हिंमत दिल्याबद्दल मी त्यांच्या सर्वांचा आभारी आहे. तसेच माझे आजोबा-आजी, आई-वडील यांच्या बद्दल कृतज्ञता व्यक्त करणे हे मी माझे कर्तव्य समजतो. ईश्वर कृपेने आणि आपल्या सर्वांचा आशीर्वाद, आणि प्रत्यक्ष/अप्रत्यक्षपणे ज्यांचे ज्यांचे सहकार्य मला मिळाले त्यांचा सर्वांचा मी आभारी आहे. तसेच श्री पुरूषोत्तम प्यारेलाल चौरासिया धरमपेठ नागपूर यांच्या भरीव सहकार्याबद्दल त्यांचा मी विशेष आभारी आहे. ह्या ग्रंथात चूक राहू नये याचा आटोकाट प्रयत्न केला आहे. तरीही वाचकांच्या नजरेस अशी चूक आढळल्यास माझ्या नजरेस आणून दिल्यास मी आभारी राहील.



धन्यवाद!

**नंदकिशोर सुधाकर बढे**
**सौ. मधुमालती बढे**

# अनुक्रमणिका

(१)

अध्याय पहिला

# राशिबलाध्याय

## मंगलाचरण

*यस्योदयास्तसमये सुरमुकुटनिघृष्टचरणकमलोऽपि।*
*कुरूतेऽञ्जलिं त्रिनेत्रः स जयति धाम्नां निधिःसूर्यः ।। १।।*

**भट्टोत्पल :** यस्योदयेति । सतामयमाचारो यच्छास्त्रप्रारम्भेऽभिमत्तदेवता नमस्कारं कुर्वन्ति। तदयमावन्तिकाचार्य वराहमिहिरोऽर्कलब्धवरप्रसादो ज्योतिःशास्त्रसङ्ग्रहं कृत्वा तदेव भीरूणां कृत्ते सङ्क्षिप्तगणितसङ्ग्रहं कृत्वा होराशास्त्रं सङ्क्षिप्तं वक्ष्यमाणोऽशेषविघ्नोपशमायाभिमतसूर्यस्यादौ प्रणाममाह–स सूर्य आदित्यो जयति सर्वोत्कर्षेण वर्तते। कथम्भूतो धाम्नां निधिः। यस्योदयकालेऽस्तकाले च त्रिनेत्रो महेशः अञ्जलिं कुरूते, नमस्कारं करोतीत्यर्थः। कीदृशः सुरमुकुटनिघृष्टचरणकमलो देवचूडामणिनिघृष्टपादपद्म इत्यर्थः। यतः सर्वे देवा भगवतो नारायणस्य महादेवस्य पादवन्दनं कुर्वन्ति। अपि–शब्दाद्यस्य महादेवोऽपि अञ्जलिं करोति तस्य सेन्द्राः सुराः महर्षयश्च वदनं कुर्वन्ति ।। १।।

**सती –** ज्यांच्या चरणी सर्व देव नतमस्तक होतात असे देवाधीदेव महादेव स्वतः सूर्योदयी आणि सूर्यास्ताच्यावेळी सूर्याला नमन करतात, त्याला अर्ध्य देतात त्या तेजपूंज सूर्य देवाला नमस्कार करतो, त्या सूर्य देवाचा जयजयकार असो.

(वरील मंगलचरणाव्दारे आचार्य श्री वराहमिहिर यांनी सूर्याची स्तुति केली आहे.)

## ग्रंथाचे प्रयोजन

*होराशास्त्रं वृत्तैर्मया निबद्धं निरीक्ष्य शास्त्राणि।*
*यत्तस्याप्यार्याभिः सारमहं सम्प्रवक्ष्यामि ।। २।।*

**भट्टोत्पल :** होराशास्त्रमिति। होराशास्त्रं वक्ष्यामीत्याह–होराशास्त्रं जातकं मया  वृत्तैर्नानाविधैर्निबद्धं रचितम्। किं कृत्वा शास्त्राण्यन्यानि निरीक्ष्य विलोक्य यत्तस्य सारमार्याभिः सम्प्रवक्ष्यामि कथयिष्यामीत्यर्थः।।२।।

**सती -** मुळ ग्रंथकाराचे म्हणणे आहे की, हा ग्रंथ मी, अनेक आचार्यांनी लिहिलेले ज्योतिषशास्त्राचे ग्रंथ, जसे होराशास्त्र (बृहद्जातक नावाचा) ग्रंथ, गर्ग आणि इतर मुनी द्वारा लिखित शास्त्राचे अवलोकन करून अनेक प्रकारच्या छंदाचा उपयोग करून, निर्माण केला आहे. त्याचा अर्थ आर्या छन्दात सांगत आहे. होराशास्त्र म्हणजेच फलितज्योतिष. आचार्य वराहमिहिर यांनी लिहिलेल्या होरास्कंधाचे दोन ग्रंथ म्हणजे बृहज्जातकम् आणि लघुजातकम् हे आहेत.

### ग्रन्थ-प्रशंसा

*यदुपचितमन्यजन्मनि शुभाऽशुभं तस्य कर्मणः पंक्तिम्।*
*व्यञ्जयति शास्त्रमेतत् तमसि द्रव्याणि दीप इव ।। ३।।*

**भट्टोत्पलः** यदुपचितमिति। शास्त्रोपयोगित्वमाह–प्राणिनां यदन्यजन्मनि शुभमशुभं वा कर्मार्जित सञ्चितं तस्य क्रर्मणः प्राप्तिमेतच्छास्त्रं व्यञ्जयति प्रकटीकरोतीत्यर्थः। यस्मिन् काले शुभफलं यस्मिंश्चातोऽ शुभफलमिति। क इव दीप इव। यथा दीपस्तमसि अन्धकारे द्रव्याणि विद्यमानानि व्यञ्जयति व्यवहारार्थम् ।। ३।।

**सती -** मनुष्याने जन्मोन-जन्मी कमावलेले शुभ-अशुभ कर्माचे फल हे होराशास्त्र (जातकशास्त्र) त्याच प्रकारे व्यक्त करते, ज्या प्रकारे अंधारात ठेवलेली वस्तु दिव्याच्या प्रकाशाने स्पष्ट दिसते.

### कालपुरूषाचे अंग विभाग

*शीर्षमुखबाहुहृदयोदराणि कटिबस्तिगुह्यसंज्ञानि।*
*ऊरू जानू जङ्घे चरणाविति राश्योऽजाद्याः ।। ४।।*
*कालनरस्यावयवान् पुरूषाणां चिन्तयेत्प्रसवकाले।*
*सदसद्ग्रहसंयोगात् पुष्टाः सोपद्रवास्ते च ।। ५।।*

**भट्टोत्पल :** शीर्षमुखेति। काल पुरूषस्य मेषादिराशिपूर्व कमङ्गविभागमाह–अजाद्या राशयः कालस्याङ्गनि। राशय इति फलितोऽर्थः। अस्य कालपुरूषस्य मेषः शिरः, वृषो मुखं, मिथुनं बाहू, कर्कटो हृदयं, सिंह उदरं, कन्या कटिः, तुला वस्तिर्नाभेरधोभागः, वृश्चिको गुह्यंः, धनुरूरूयुग्म, मकरो जानुयुगलं, कुम्भो जङ्घे मीनश्चरणौ। प्रयोजनम्-जन्मकाले पुरूषादिराशिषु शुभग्रहाक्रान्तेषु मनुष्यांणा शीर्षादिकानामारोग्यता पापाक्रान्तेषु रोगित्वं सङ्ग्रामादिप्रविष्टस्य व्रणादिज्ञानम् ।। ४-५।।

**सती –** काळाला पुरूषाची आकृति समजून त्याचे १२ भाग केले असता प्रत्येक भागाची राशि निर्धारित केलेली आहे. मेष इत्यादी १२ राशि ह्या कालपुरूषाचे अनुक्रमे शीर्ष (डोके) इत्यादी अवयव आहे. ते खालीलप्रमाणे आहेत.

१) मेष–डोक, २) वृषभ–तोंड, ३) मिथुन–हात, ४) कर्क–हृदय, ५) सिंह–पोट, ६) कन्या–कंबर, ७) तुळा–मुत्रेद्रिंय (बेंबीच्या खालचा भाग), ८) वृश्चिक–गुह्येंद्रिय, ९) धनु–मांडया, १०) मकर–गुडघा, ११) कुंभ– पोटरी (गुडघ्याच्या खालचा भाग), १२) मीन–पाय.

मनुष्याच्या जन्माच्या वेळी कालपुरूषाचा अंगाचा विचार करावा. शुभग्रहाने युक्त राशित अंग विभाग मजबूत आणि पापग्रह युक्त राशित अंग त्रासदायक, (निर्बल) असतात.



२ मुख वृषभ

१२ पाय

३ हात मिथुन

१ शीर्ष मेष

११ पोटरी

४ हृदय कर्क

१० मकर गुडघे

५ पोट सिंह

७ बस्ति कंबरेच्या खालचा भाग

९ मांड्या/जांघा धनु

६ कंबर कन्या

८ गुहयेंद्रिय

वरील प्रमाणे विचार हा जन्मकुंडली/प्रश्नकुंडली अशा दोन्ही वेळी करावा. गुरू, शुक्र, पूर्णचंद्र आणि बुध हे शुभग्रह आहेत. तसेच सूर्य, मंगळ,शनि,राहु,केतू हे अशुभ (पाप) ग्रह आहेत. बुध मुक्त असेल तर शुभ फळे देतो. अन्यथा म्हणजे शुभ ग्रहाने युक्त किंवा दृष्ट नसेल तर शुभफळ देत नाही. म्हणजेच जर बुध हा पापग्रहाने युक्त किंवा दृष्ट असेल तर बुध जरी शुभ ग्रह असला तरी तो शुभफळे देत नाही. तो अशुभ फळे देतो.

## राशिंचे रंग

*अरूणसितहरितपाटलपाण्डुविचित्राः सितेतरपिशङ्गौ।*
*पिङ्गलकर्बुरबभ्रुकमलिना रूचयो यथासङ्ख्यम् ।। ६।।*

**भट्टोत्पल :** अरूणसितेति। व्याधितस्य पीडाज्ञानाय तिलकादिचिह्नज्ञानाय च राशिवर्णज्ञानमाह– अजाद्या इत्यनुवर्तते। अजादयो राशयो वर्णयुत्ता भवन्ति। तत्र मेषोऽरूण ईषद्रक्तः, वृषः श्वेतः, मिथुन हरितः, शुकाभः, कर्कटः, पाटलः ईषच्छ्वेतरक्तः, सिंहः पाण्डुधूम्राभः ईषच्छुक्लः, कन्याशिर्विचित्रो नानावर्णः, तुला सितेतरः कृष्णः, वृश्चिकः पिशङ्गः सुवर्णवर्णः, धन्वी पिङ्गल ईषत्कपिलः, मकरः कर्बुरः शुक्कलपिलो मिश्रवर्णः, कुम्भो बभ्रुः कपिलः, मीनो मलिनो मत्स्यवर्णः। एता राशीनां रूचयो वर्णाः। प्रयोजनं हृतनष्टादिषु द्रव्यवर्णज्ञानम् ।। ६।।

**सती -** राशिंचे वर्ण- मेषादि १२ राशिंचे वर्ण (रंग) खालील प्रमाणे आहेत. १) मेष-लाल २) वृषभ-पांढरा. ३) मिथुन-हिरवा. ४) कर्क-गुलाबी. ५) सिंह-पाण्डू/ फिकट पिवळा. ६) कन्या-विचित्र. ७) तुळा-काळा. ८) वृश्चिक-सोन्यासारखा ९) धनु-पिंगल, १०) मकर-करडा ११) कुंभ-अभ्रक १२) मीन- मळका

| राशि | रंग | राशि | श्रंग | राशि | रंग |
|---|---|---|---|---|---|
| मेष | लाल | सिंह | पिवळा | धनु | पिंगल |
| वृषभ | पांढरा | कन्या | विचित्र | मकर | करडा |
| मिथुन | हिरवा | तुळा | काळा | कुंभ | अभ्रक |
| कर्क | गुलाबी लाल+पांढरा | वृश्चिक | पिशंग | मीन | मळका |

## राशिंच्या व्याख्या आणि दिशा

*पुंस्त्री-क्रूराऽक्रूरौ चर-स्थिर-द्विस्वभावसंज्ञाश्च।*
*अजवृषमिथुनकुलीराः पचमनवमैः सहैन्द्र्याद्याः ।। ७।।*

**भट्टोत्पल :** पुंस्त्रीति। राशिसंज्ञादिदिग्विभागं चाह-पुंस्त्रीति मेषः पुमान्, वृषःस्त्री, मिथुनं पुमान्, कर्कटः स्त्री एवं सर्वत्र। तथा क्रूराऽक्रूरौ मेषः क्रूरः, वृषोऽक्रूरः सौम्य एवं सर्वत्र। चरस्थिरद्विस्वभावसंज्ञाश्चेति। ततो मेषश्चरः, वृषः स्थिरः मिथुनं द्विस्वभावः एवं सर्वत्र कर्कटादिषु। प्रयोजनं पुरूष- शीलज्ञानादि। अजवृषमिथुनकुलीरा इति। अजो मेषस्तस्य पञ्चम नवमाभ्यां सह पूर्वदिग्वृषस्य स्वपञ्चमनवमाभ्यां सह दक्षिणा दिक्। मिथुनस्य स्वपञ्चमनवमाभ्यां सह पश्चिमादिक्। कुलीरः कर्कटस्तस्य पञ्चमनवमाभ्यां सहोत्तरादिक्। प्रयोजनं तु चोरादेर्दिग्गमनादिज्ञानम् ।। ७।।

**सती -** राशिंच्या व्याख्या आणि दिशा.

मेषादि १२ राशींचे प्रकार खालील प्रमाणे आहेत.

१) पुरूष आणि स्त्री, २) शुभ-अशुभ, ३) चर-स्थिर-व्दिस्वभाव ४) सम-विषम ५) क्रुर-अक्रुर सर्व विषम राशि ह्या क्रुर आणि पुरूष राशि आहेत आणि सर्व सम राशि ह्या सौम्य आणि स्त्री राशि आहेत.

| राशि | १, ३, ५, ७, ९, ११, | पुरूष-क्रूर, विषम |
|---|---|---|
| राशि | २,४,६,८,१०, १२ | स्त्री-सौम्य, सम |

## २ ) चर-स्थिर-व्दिस्वभाव

| रा | १ | ४ | ७ | १० | चर |
|---|---|---|---|---|---|
| शी | २ | ५ | ८ | ११ | स्थिर |
| | ३ | ६ | ९ | १२ | व्दिस्वभाव |

## ३ ) दिशा

| राशि | दिशा | राशि | दिशा |
|---|---|---|---|
| १, ५, ९ – | पूर्व. | २, ६, १० – | दक्षिण. |
| ३, ७, ११ – | पश्चिम. | ४, ८, १२ – | उत्तर. |

**राशींचे स्वामी तसेच नवमांशाचे स्वामी**

***कुजशुक्रज्ञेन्द्वर्कज्ञशुक्रकुजजीवसौरियमगुरवः।***
***मेषा नवांशकानामजमकरतुलाकुलीराद्याः ।। ८।***

**भट्टोत्पल :** कुजशुक्रेति। राश्यंशाऽधिपानाह-कुजादयो मेषादीनामधिपाः। तत्र मेषस्य भौमोऽधिपतिः, वृषम्य शुक्रः, मिथुनस्य बुधः, कर्कस्य चंन्द्रः, सिंहस्यादित्यः, कन्याया बुधः, तुलायाः शुक्रः, वृश्चिकस्य भौमः, धन्विनो जीवः, मकरस्य मन्द्रः, कुम्भस्य शनिः, मीनस्य बृहस्पतिः। तथा नवांशकानामज मकरतुलाकुलीराद्या इति येषां नवांशकानां ते अजमकरकुलीराद्याः। मेषस्य मेषाद्या नवांशा धन्वन्ताः, वृषस्य मकराद्या कन्यान्ताः, मिथुनस्य तुलाद्या मिथुनान्ताः, कर्कटस्य कर्कटाद्या मीनान्ताः, मेषवत् सिंहधन्विनोः, वृषवत् कन्यामकरयोः, मिथुनवत्तुलाकुम्भयोः कर्कटवद्वृश्चिकमीनयोर्नवांशकानां राश्यधिपा एव अधिपतयो ज्ञेयाः।। ८।।

**सती - मेषादि राशीचे स्वामी**

१) मेष-मंगळ २) वृषभ-शुक्र ३) मिथुन-बुध ४) कर्क-चंद्र ५) सिंह-सूर्य ६) कन्या-बुध ७) तुळ-शुक्र ८) वृश्चिक-मंगळ ९) धनु-गुरू १०) मकर-शनि ११) कुंभ-शनि १२) मीन-गुरू, म्हणजेच सूर्य-चंद्र यांची एक-एक राशि आणि मंगळ, बुध, गुरू, शुक्र, आणि शनि यांना दोन-दोन राशि असतात.

## मेषादि नवमांशाचे स्वामी

मेषदि राशींमध्ये अनुक्रमे मेषादि, मकरादि तुलादि आणि कर्कादि (मेमतुक) ९-९ राशींचे नवमांश असतात.पहिल्या राशित मेष राशि पासून सुरू होउन ९ राशि पर्यंत, (धनुपर्यंत) दुसरी रास म्हणजे मकरेपासून पूढील ९ राशिपर्यंत, (कन्येपर्यंत) तुळा राशिपासून पुढील ९ राशिपर्यंत, (मिथूनपर्यंत) आणि शेवटी कर्कराशिपासून पूढील ९ राशिपर्यंत (मीनपर्यंत) असे नवमांश खालील प्रमाणे असतात.

**विशेष** - राशिचे सारखे ९ भाग केल्यावर प्रत्येक नवव्या भागाला नवमांश म्हणतात. अर्थात ३० अंश भागीला ९ केले असता ३ अंश २० कलेचा एक नवमांश होतो.

## स्पष्टार्थ राशि-स्वामी चक्र

| राशि | मे | वृष. | मि. | क | सिं | कं | तु | वृ | ध | म | कुं | मी. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| स्वामी | मं. | शु | बु | चं | सू | बु | शु | मं | गु | श | श | गु |

## नवमांश चक्र

| क्रम | अंश | मे | वृ | मि | क | सि | कं | तु | वृ | ध | म | कुं | मी. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | ३-२० | मे | म | तु | क | मे | म | तु | क | मे | म | तु | क |
| २ | ६-४० | वृ | कुं | वृ | सिं | वृ | कुं | वृ | सिं | वृ | कुं | वृ | सिं |
| ३ | १०-०० | मि | मी | ध | कं | मि | मी | ध | कं | मि | मी | ध | कं |
| ४ | १३-२० | क | मे | म | तु | क | मे | म | तु | क | मे | म | तु |
| ५ | १६-४० | सिं | वृ | कुं | वृ | सि | वृ | कुं | वृ | सिं | वृ | कुं | वृ |
| ६ | २० | कं | मि | मी | ध | कं | मि | मी | ध | कं | मि | मी | ध |
| ७ | २३-२० | तु | क | मे | म | तु | क | मे | म | तु | क | मे | म |
| ८ | २६-४० | वृ | सिं | वृ | कुं | वृ | सिं | वृ | कुं | वृ | सिं | वृ | कुं |
| ९ | ३० | ध | कं | मि | मी | ध | कं | मि | मी | ध | कं | मि | मी |

## राशिचा नवमांश काढायचे सुत्र -



(आधीची रास संख्या गुणीला ९) + काढायचा नवमांशाची संख्या भागेला १२. १२ ने भाग दिल्यावर राहीलेली शिल्लक संख्या म्हणजे त्या राशिचा नवमांश.

उदा. तुळ राशिचा ७ वा नवमांश काढु या

(तुळेच्या आधीची रास म्हणजे ६ (कन्या) गुणेला ९ + ७ (काढावयाचा नवमांश) = तुळेचां ७ वा नवमांश ६ ग ९ = ५४ + ७ = ६१

इथे ६१ ला १२ ने भागीतल्यावर शिल्लक राहिला १ म्हणजे मेष

तुळेचा ७ वा नवमांश मेषेचा राहील.

### होरा, द्रेष्काण, द्वादशांशाचे स्वामी

*स्वगृहाद् द्वादशभागाः द्रेष्काणाः प्रथमपञ्चनवपानाम्।*
*होरे विषमेऽर्केन्द्वोः समराशौ चन्द्रतीक्ष्णांशोः ।। ९।।*

**भट्टोत्पल :** स्वगृहादिति। द्वादशभागद्रेष्काणहोराधिपतिज्ञानमाह–स्वगृहात् आरभ्य द्वादशभागाः २।३० गणनीयाः। मेषस्य मेषाद्या मीनान्ताः, वृषस्य वृषभाद्या मेषान्ताः, एवं सर्वत्र। द्वादशांशकानां राश्यधिपा एवाऽ धिपतयः। द्रेष्काणाः प्रथमपञ्चनवपानामिती। द्रेष्काणो राशित्रिभागः। एवं यथाक्रमं प्रथमपञ्चनवपानां सम्बन्धिनो भवन्ति। तथा मेषस्य प्रथमोऽङ्गरकः तस्य सम्बन्धी, द्वितीयः पञ्चमस्याधिपस्यार्कस्य सम्बन्धी, तृतीयो नवमाधिपस्य जीवस्य सम्बन्धी, एवं वृषादीनामपि। होरे विषमे इति। होरा राश्यर्ध १५ तत्र विषमराशीनां मेषमिथुनसिंहादीनां प्रथमहोरादित्यस्य द्वितीयहोरा चन्द्रमसः। समराशीनां वृषकर्कटकन्यादीनां प्रथमा चन्द्रमसः, द्वितीयार्कस्य ।। ९।।

द्वादशांश

सती– स्वतःच्या राशिपासुन सुरू होउन अनुक्रमे १२ राशींचे १२ द्वादशांश (बारावा भाग) असतात. एक रास ३०° ची असते. तर राशीचा एक द्वादशांस हा २°/३० (२ अंश ३० कलेचा) होईल. (३०÷१२ = २°/३०')

उदा० मेष राशिचा पहीला द्वादशांश हा मेषे पासून (२°–३०') सुरू होऊन अनुक्रमे वृषभ मिथुन ते मीन पर्यंत १२ वा द्वादशांस असेल. तसेच वृषभेचा पहिला द्वादशांश हा वृषभ पासून सुरू होऊन अनुक्रमे मिथुन ते मेष पर्यंत १२ वा द्वादशांस असेल.

याप्रमाणे प्रत्येक राशिचा पहिला द्वादशांस त्याच राशीपासून सुरू होईल. आणि त्या राशि पासून १२ वी रास म्हणजे त्या राशीचा १२ वा द्वादशांस असेल.

## द्वादशांश चक्र

| अंश | मे. | वृ. | मि. | क. | सिं. | कं. | तु. | वृ. | ध. | म. | कुं. | मी. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २।३० | मे. | वृ. | मि. | क. | सिं. | कं. | तु. | वृ. | ध. | म. | कुं. | मी. |
| ५।० | वृ. | मि. | क. | सिं. | कं. | तु. | वृ. | ध. | म. | कुं. | मी. | मे. |
| ७।३० | मि. | क. | सिं. | कं. | तु. | वृ. | ध. | म. | कुं. | मी. | मे. | वृ. |
| १०।० | कं. | सिं. | कं. | तु. | वृ. | ध. | म. | कुं. | मी. | मे. | वृ. | मि. |
| १२।३० | सिं. | कं. | तु. | वृ. | ध. | म. | कुं. | मी. | मे. | वृ. | मी. | क. |
| १५।० | कं. | तु. | वृ. | ध. | म. | कुं. | मी. | मे. | वृ. | मि. | क. | सिं. |
| १७।३० | तु. | वृ. | ध. | म. | कुं. | मी. | मे. | वृ. | मि. | क. | सिं. | कं. |
| २०।० | वृ. | ध. | म. | कुं. | मी. | मे. | वृ. | मि. | क. | सिं. | कं. | तु. |
| २२।३० | ध. | म. | कुं. | मी. | मे. | वृ. | मि. | क. | सिं | कं. | तु. | वृ. |
| २५।० | म. | कुं. | मी. | मे. | वृ. | मि. | क. | सिं. | कं. | तु. | वृ. | ध. |
| २७।३० | कुं. | मी. | मे. | वृ. | मि. | क. | सिं. | कं. | तु. | वृ. | ध. | म. |
| ३०।० | मी. | मे. | वृ. | मि. | क. | सिं. | कं. | तु. | वृ. | ध. | म. | कुं. |

**द्रेष्काण –** राशीचे सारखे तीन भाग केले असता प्रत्येक भाग १०° चा होतो. त्याला द्रेष्काण म्हणतात. (३०÷३), म्हणजे १° ते १०° पर्यत स्वराशिचा म्हणजे मेषेचा पहिला द्रेष्काण, ११° ते २०° पर्यत दुसरा द्रेष्काण हा ५ व्या राशिचा म्हणजे सिंह राशिचा असतो आणि २१° ते ३०° पर्यत तिसरा द्रेष्काण हा ९ व्या राशिचा म्हणजे धनुचा असतो

### द्रेष्काण चक्र

| अंश | मे. | वृ | मि | क | सिं | कं. | तु. | वृ. | ध. | म. | कुं. | मी. | राशियाँ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १० | मं.<br>१ | शु<br>२ | बु.<br>३ | चं.<br>४ | सू.<br>५ | बु.<br>६ | शु.<br>७ | मं.<br>८ | गु.<br>९ | श.<br>१० | श.<br>११ | गु<br>१२ | स्वामी<br>राशि |
| २० | सू.<br>५ | बु.<br>६ | शु<br>७ | मं.<br>८ | गु.<br>९ | श.<br>१० | श.<br>११ | गु.<br>१२ | मं<br>१ | शु.<br>२ | बु.<br>३ | चं.<br>४ | स्वामी<br>राशि |
| ३० | गु.<br>९ | श<br>१० | श<br>११ | गु.<br>१२ | मं.<br>१ | शु.<br>२ | बु.<br>३ | चं.<br>४ | सू.<br>५ | बु.<br>६ | शु<br>७ | मं.<br>८ | स्वामी<br>राशि |



होराचक्र

**होरा :** राशीचे दोन भाग केले म्हणजे ३०° चे दोन भाग असता पहिला भाग १° ते १५° आणि दुसरा भाग १६° ते ३०° चा असतो. विषम राशित १ ते १५ अंशापर्यंत पहिला होरा सूर्याचा असतो आणि १६ ते ३० अंशापर्यंतचा दूसरा होरा चंद्राचा असतो. मात्र सम राशित १ ते १५ अंशापर्यंतचा पहिला होरा चंद्राचा असतो तर १६ ते ३० अंशापर्यंतचा दूसरा होरा सूर्याचा असतो.

**होरा चक्र**

| अंश/राशि | मे. | वृ. | मि. | क. | सिं. | कं | तु. | वृ. | ध. | म. | कुं. | मी. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १-१५ | सू. | चं. | सू. | चं. | सू. | चं. | सू. | चं. | सू. | चं. | सू. | चं. |
| १६-३० | चं. | सू. | चं. | सू. | चं. | सू. | चं. | सू. | चं. | सू. | चं. | सू. |

## त्रिशांश

*कुजयमजीवज्ञसिताः पञ्चेन्द्रियवसुमुनीन्द्रियांशानाम्।*
*विषमेषु समर्क्षेषूत्क्रमेण त्रिंशांशपाः कल्प्याः ।। १०।।*

**भट्टोत्पल :** कुजयमेति। त्रिशांशाधिपानाह–विषमराशिषु यथाक्रमेण कुजादीनां पञ्चादयो भागाः त्रिशांशकाः कल्प्याः। तत्रादावेवाङ्गारकस्य पञ्च, ततः परं मन्दस्य पञ्च, ततो जीवस्याष्टौ, ततः परं बुधस्य सप्त, ततः शुक्रस्य पञ्च । एवं समराशिषूत्क्रमेण। यथा– प्रथमाः पञ्च शुक्रस्य, ततः सप्त बुधस्य, ततोऽष्टौ जीवस्य, ततः पञ्च सौरस्य, ततः पञ्च भौमस्य ।। १०।।

## त्रिशांशाचे स्वामी

**सती –** एका राशित ५ त्रिशांश असतात. यात विषम राशींमध्ये (म्हणजे १, ३, ५, ७, ९, ११) अनुक्रमे ५°, ५°, ८°, ७°, ५° अंशाचे त्रिशांश स्वामी अनुक्रमे भौम (मंगळ), शनि, गुरू (बृहस्पति) बुध आणि शुक्र हे असतात. या ग्रहांच्या विषम राशित त्यांची त्रिशाश राशि असते. तसेच सम राशींमध्ये ( म्हणजे २, ४, ६, ८, १०, आणि १२) याच्या उलट क्रमाणें ५°-७°-८°-५°-५° अंशाचे त्रिशांश स्वामि अनुक्रमे शुक्र, बुध, गुरू, शनि आणि भौम (मंगळ), हे असतात. या ग्रहांच्या सम राशि त्यांच्या त्रिशांश राशि असतात.

## विषम त्रिशांशाधिप चक्र

| अंश | भागांश | मे | मि | सिं | तु | ध | कुं | त्रिशांश |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | १ | ३ | ५ | ७ | ९ | ११ | राशि |
| ५° | ०-५ अंश | मं | मं | मं | मं | मं | मं | स्वामी |
| ५° | ६-१० अंश | श | श | श | श | श | श | स्वामी |
| ८° | ११-१८ अंश | गु | गु | गु | गु | गु | गु | स्वामी |
| ७° | १९-२५ अंश | बु | बु | बु | बु | बु | बु | स्वामी |
| ५° | २६-३० अंश | शु | शु | शु | शु | शु | शु | स्वामी |

## सम त्रिशांशाधिप चक्र

| अंश | भागांश | वृ | क | कं | वृ | मा | मी | त्रिशांश |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | २ | ४ | ६ | ८ | १० | १२ | राशि |
| ५° | ०-५ अंश | शु | शु | शु | शु | शु | शु | स्वामी |
| ७° | ६-१० अंश | बु | बु | बु | बु | बु | बु | स्वामी |
| ८° | ११-१८ अंश | गु | गु | गु | गु | गु | गु | स्वामी |
| ५° | १९-२५ अंश | श | श | श | श | श | श | स्वामी |
| ५° | २६-३० अंश | मं | मं | मं | मं | मं | मं | स्वामी |

## राशींचे दिशाबल आणि कालबल

*नृचतुष्पदकीटाप्याबलिनः प्राग्दक्षिणापरोत्तरगाः।*
*सन्ध्याद्युरात्रिबलिनः कीटा नृचतुष्पदाश्चैवम्।। ११।।*

**भट्टोत्पल :** नृचतुष्पदेति। राशिनां दिक्कालबलमाह-नृराशया मिथुनकन्यातुलाकुम्भधन्विपूर्वार्द्धमेते पूर्वस्थाबलिनः। लग्नगता इत्यर्थः।

**सती -** विशिष्ट दिशेला राशिला बल प्राप्त होते. जसे पूर्व दिशेला म्हणजे लग्नात द्विपदराशि ( दोन चरण असलेली) दक्षिण दिशेला (दहावे स्थान) चतुष्पाद राशि (चार चरण असलेली), पश्चिम दिशेला (सातवे स्थान) कीट राशि आणि उत्तरेस म्हणजे चौथ्या स्थानी जलचर राशिंना बल प्राप्त होते.



दिशा



राशिंचे दिशाबल

**राशींचे कालबल :** दिवसा द्विपद राशि आणि रात्रीच्यावेळी चतुष्पद राशि बलवान असतात. सायंकाळी कर्क राशि आणि वृश्चिक राशि (कीटराशि) हया बलवान असतात. तर सकाळच्या संध्येच्यावेळी मीन आणि मकर राशिंचे उतरार्ध बलवान असतात.

दिवसा व्दिपाद राशि बली

| सायंकाळची संध्या | ------------------------- | सकाळची संध्या |
|---|---|---|
| किट राशिबली | रात्री चतुष्पाद राशि बली | किट राशि बली |

## राशिंचे प्रकार

*मेषवृषधन्विसिंहाश्चतुष्पदा मकरपूर्वभागश्च।*
*कीटः कर्कटराशिः सरीसृपो वृश्चिकः कथितः ।। १२।।*
*मकरस्य पश्चिमार्धं ज्ञेयो मीनश्च जलचरः ख्यातः।*
*मिथुनतुलाघटकन्या द्विपदाख्या धन्विपूर्वभागश्च ।। १३।।*

**भट्टोत्पल :** मेषवृषेति। चतुष्पदा मेषवृषसिंहधन्विपरार्द्धा मकरपूर्वार्द्ध एत्ते दक्षिणस्था बलिनो दशमस्थानगता इत्यर्थः। कीटो वृश्चिकः स पश्चिमस्थो बली सप्तमस्थ इत्यर्थः। कर्कटमकरपरार्धमीना आप्याः एते चोत्तरस्था बलिनश्चतुर्थस्थानगता इत्यर्थः। सन्ध्याद्युरात्रिबलिन इति। अत्र जलराशयोऽपि कीटग्रहणेन गृह्यन्ते। एवं कीटः सन्ध्याकाले बली, नरराशये दिवाकाले बलिनश्चतुष्पदा रात्रौ बलिनः ।। १२-१३।।



**सती -** राशिचे पाद (चरणावरून) प्रकार पडले आहेत. जसे चतुष्पाद (४ चरण) द्विपाद (२ चरण)

१) **चतुष्पाद राशि :-** मेष, वृषभ, सिंह, धनु राशिचा उत्तरार्ध आणि मकर राशिच्या पूर्वार्धाला चतुष्पाद म्हणतात.

२) **कीटराशि :-** कर्क आणि वृश्चिक राशिला सरीसृप राशि म्हणतात.

३) **जलचर राशि :-** मकरेचा उत्तरार्ध, आणि मीन राशिला जलचर राशि म्हणतात.

४) **द्विपादराशि :-** मिथुन राशि, तुला, कुंभ कन्या (३, ७, ११, ६) आणि धनुराशिच्या पूर्वार्धाला द्विपाद राशि म्हणतात.

## राशिबल-ज्ञान

*अधिपयुतो दृष्टो वा बुधजीवयुतेक्षितश्च यो राशिः।*
*स भवति बलवान्न यदा युक्तो दृष्टोऽपि वा शेषैः ।। १४।।*

**भट्टोत्पल :** अधिपयुत इति। अथ राशिबलज्ञानार्थमाह-अधिपयुतः। स्व-स्वामिना युतो दृष्टो वा राशिर्बलवानेव। बुधजीवयोरन्यतमेन युक्तो दृष्टो वा बल-वानेव। यदाऽन्यैर्ग्रहैरयुतो नाऽपि वीक्षितः। अनुक्तदृटो युतो वा स्वस्वामिना युक्तो राशिर्बलवान् भवति। स्वामिना दृष्ट, अन्यैः उक्तानुक्तैर्दृष्टो राशिर्मध्यबलो भवति। स्वस्वामिना बुधजीववर्ज्यमन्यैर्युतदृष्टो बलहीन एवं ।। १४।।

**सती - बलवान राशि :** जी राशि आपल्या स्वामीने युत किंवा दृष्ट ( त्या राशिचा स्वामी त्याच राशित असणे किंवा त्या राशिस्वामीची तिच्यावर नजर असणे) असेल किंवा बुध आणि गुरू ग्रहाने युत किंवा दृष्ट असेल. तसेच इतर ग्रहांनी युत किंवा दृष्ट नसेल तर ती राशि बलवान आहे असे समजल्या जाते.

**अतिबलवान राशी -** जी राशि आपल्या स्वामीने, बुध आणि गुरू ग्रहांनी म्हणजे तिघांनीच युत किंवा दृष्ट असेल, व इतर ग्रहांनी युत किंवा दृष्ट नसेल तर ती राशि अतिबली असते.

**मध्यम बलवान -** जी राशि आपल्या स्वामीने, बुध आणि गुरू ग्रहांनी म्हणजे तिघांनीच युत किंवा दृष्ट असेल, व इतर ग्रहांनीसुध्दा युत किंवा दृष्ट असेल तर ती राशि मध्यम बलवान असते.

**निर्बल राशि -** मात्र राशि जेंव्हा तीच्या स्वामिने, बुध किंवा गुरूनेही युत किंवा दृष्ट नसेल तर तिला निर्बल राशि म्हणतात.

## कुंडलीतील तनु ईत्यादी १२ घरे

*तनुधनसहजसुहृत्सुतरिपुजायामृत्युधर्मकर्माख्याः।*
*व्यय इति लग्नाद्भावाश्चतुरस्त्राख्येष्टमचतुर्थे ।। १५।।*

**भट्टोत्पल :** तनुधनसहजेति। लग्नादीनां तन्वादिभावाश्रयत्वव्यवहारार्थमाह–लग्नादारभ्यामी तन्वादयो भावाःतत्र लग्नं प्रथमं पुरूषस्य शरीरं द्वितीयं धनस्थानं, तृतीयं सहजं, चतुर्थ सुहृत् भ्रातृमित्रसंज्ञं वा पचमं सुतः षष्ठं शत्रुःसप्तमं जाया भार्या वा अष्टमं मृत्युः नवमं धर्मः दशमं कर्म एकादशं आयः द्वादशं व्ययः। प्रयोजनं लग्नादीनां यथोक्तभावानां शुभपापग्रहसंयोगात्सम्पत्तिविपत्तीचिन्तनीये इति। चतुरस्त्राख्येऽष्टमचतुर्थे लग्नादष्टमस्थानस्य चतुर्थस्थानस्य चतुरस्त्र इत्याख्या ।। १५।।

**सती –** कुंडलीत एकूण १२ घरं असतात त्यांना भाव असेही म्हणतात आणि ते वेगवेगळया नावाने पण ओळखल्या जाते. त्यांचा विचार करावा.

१) पहिल्या घराला – लग्न/तनु भाव
२) दुसऱ्या घराला – धन भाव
३) तिसऱ्या घराला – साहस/पराक्रम भाव
४) चौथ्या घराला – सुहृत/सौख्य भाव ?
५) पाचव्या घराला – सुत/संतती भाव
६) सहाव्या घराला – शत्रू/रोग भाव
७) सातव्या घराला – जाया/विवाह भाव ?
८) आठव्या घराला – मृत्यु भाव ?
९) नवव्या घराला – धर्म/भाग्य भाव
१०) दहाव्या घराला – कर्म भाव
११) अकराव्या घराला – आय/लाभ भाव
१२) बाराव्या घराला – व्यय भाव



कुंडलीतील १२ घर

**चतुरस्त्र भाव :** लग्नापासून ४ थे आणि ८ वे स्थानाला चतुरस्त्र भाव म्हणतात. वरील १२ घरांना आणखी पर्यायी नावे आहेत ते पण पहावेत.

*पातालहिबुकवेश्मसुखबन्धुसंज्ञाश्चतुर्थभावस्य ।*

*नव-पञ्चमे त्रिकोणे नवमर्क्षे त्रित्रिकोणं च ।। १६।।*

**भट्टोत्पल :** पातालेति। चतुर्थनवमपञ्चमानां संज्ञान्तरमाह-लग्नाच्चतुर्थभवनस्य पातालसंज्ञा सुखसंज्ञा वेश्मसंज्ञा हिबुकसंज्ञा बन्धुसंज्ञा च । तथा च नवमस्य पञ्चमस्य च त्रिकोण इत्याख्या। नवमस्य त्रित्रिकोणमित्यपि च। ।। १६।।

**सती -** कुंडलीतील चवथ्या स्थानाला पाताळ, हिबुक स्थान असे म्हणतात तसेच सुखस्थान आणि बंधूभाव असेही म्हणतात. पाचव्या आणि नवव्या घराला त्रिकोण स्थान म्हणतात. तर फक्त नवव्या घराला त्रित्रिकोणस्थान असे म्हणतात.

*धीः पञ्चमं तृतीयं दुश्चिक्यं सप्तमं तुं यामित्रम्।*
*द्यूनं द्यूनं च तद्वच्छिद्रमष्टमं द्वादशं रिष्फम् ।। १७।।*

**भट्टोत्पल :** धीः पचममिति। पचम तृतीय सप्तमाष्टम द्वादशस्थानानां संज्ञान्तरमाह-लग्नात्पञ्चमस्थानं धीसंज्ञं तृतीयं दुश्चिक्यसंज्ञं सप्तमं यामित्रसंज्ञं द्यूनंद्युनं च तत्तदेव सप्तमस्थानं सप्तमं यामित्रसंज्ञं द्युनसंज्ञं द्युनसंज्ञं च अष्टमस्थानं छिद्रसंज्ञं छिद्रं क्षतपर्यायं लग्नाद् द्वादशं रिष्फसंज्ञम् ।। १७।।

**सती -** पांचव्या घराला धी (बुद्धि-संज्ञक), तिसऱ्या घराला दुश्चिक्य, सातव्या घराला यामित्र, द्यून किंवा द्युन असे म्हणतात. तर आठव्या घराला छिद्र आणि बाराव्या घराला रिष्फ म्हणतात.

**स्थानांची केंन्द्र, पणफर आणि आपोक्लीमं व्याख्या**

*केंन्द्रचतुष्टयकण्टकलग्नाऽस्तदशमचतुर्थानाम्।*
*संज्ञा परतः पणफरमापोक्लीमं च तत्परतः ।। १८।।*

**भट्टोत्पल :** केंन्द्रचतुष्टयेति। स्थानानां संज्ञान्तरमाह-लग्नचतुर्थ सप्तम दशमानां चतुर्णा स्थानानां प्रत्येकस्य संज्ञात्रयं केंन्द्र चतुष्टयं कण्टकमिति। तत्सर्वस्मात्केन्द्रात्परस्य पणफरमित्याख्या। सर्वस्मात्पणफरात्परस्यापोक्लीमेत्याख्या ।। १८।।

**सती -** केंद्रस्थाने : लग्न स्थान (१), चतुर्थ स्थान (४), सप्तम स्थान (७) आणि दशम स्थान (१०) ही केंद्रस्थाने आहेत. हयांना कण्टक तसेच चतुष्टय स्थान असेही म्हणतात. कुंडलीतील २/५/८/११- या स्थानांना पणफर स्थान म्हणतात. तर कुंडलीतील ३/६/९/१२-या भावांना आयोक्लीम स्थाने म्हणतात.



**केंन्द्र-पणफर-आपोक्लीम संज्ञा चक्र**



केंद्र स्थाने



पणफर/अपोक्लीम स्थाने

## उपचय, अनुपचय तसेच वर्गोतम नवमांश

*त्रिषडेकादशदशमान्युपचयभवनान्यतोऽन्यथाऽन्यानि।*
*वर्गेत्तमा नवांशाश्चरादिषु प्रथममध्यान्त्याः ।। १९।।*

**भट्टोत्पल :** त्रिषडेकादशेति। उपचयापचयसंज्ञां नवांशकानां वर्गोत्तमसंज्ञा चाहतृतीयषष्ठैकादश दशमानामुपचयमित्याख्या। अतोऽन्यथाऽन्यानि उपचयेभ्यो यान्यवशेषस्थानानि तान्यपचयानि इत्यर्थः। वर्गोत्तमा नवांशाश्चरराशिषु प्रथमनवांशस्य वर्गोत्तमः स्थिरराशिषु मध्यमस्य पञ्चमस्य द्विःस्वभावराशेश्चान्त्यस्य नवांशस्य। एतदुक्तं भवति। सर्वस्यैव राशेः स्वनवांशको वर्गोत्तमाख्य इति।।

**सती –** कुंडलीत लग्नापासून ३/६/१०/११ या घरांना उपचय स्थाने म्हणतात. याव्यतिरिक्त राहिलेल्या घरांना म्हणजे १/२/४/५/७/८/९/१२ या घरांना अनुपचय स्थाने म्हणतात.




उपचय, अनुपचय स्थाने

| | | | |
|---|---|---|---|
| १ | पहिले स्थान | केंद्र/अनुपचय | लग्न,तनु, धर्म त्रिकोण |
| २ | दूसरे स्थान | अनुपचय/पणफर | धन, अर्ध त्रिकोण, मारक |
| ३ | तिसरे स्थान | अपोक्लीम/उपचय | पराक्रम,साहस, कामत्रिकोण |
| ४ | चौथे स्थान | केंद्र/अनुपचय | सौख्य, मोक्षत्रिकोण |
| ५ | पाचवे स्थान | अनुपचय/ पणफर | संतती, त्रिकोण, धर्म त्रिकोण |
| ६ | सहावे स्थान | अपाक्लीम/ उपचय | शत्रु/रोग/ अर्ध त्रिकोण, अनिष्ट |
| ७ | सातवे स्थान | केंद्र/अनुपचय | जाया/विवाह/मैत्री, कामत्रिकोण, मारक |
| ८ | आठवे स्थान | अनुपचय/ पणफर | मृत्यू आयुष्य स्थान |
| ९ | नववे स्थान | अनुपचय/अपोक्लीम | धर्म/भाग्य, धर्म त्रिकोण |
| १० | दहावे स्थान | केंद्र/ उपचय | कर्म, अर्ध त्रिकोण |
| ११ | अकरावे स्थान | पणफर/ उपचय | आय, कामत्रिकोण |
| १२ | बारावे स्थान | अनुपचय/अपोक्लीम | व्यय, मोक्षत्रिकोण |

**नवमांश वर्गोत्तम**

चर राशिचा पहिला नवमांश वर्गोत्तम असतो स्थिर राशिचा पाचवा नवमांश वर्गोत्तम असतो. द्विस्वभाव राशिचा नववा नवमांश वर्गोत्तम असतो. म्हणजेच सर्व राशिंचा स्वनवमांश हा वर्गोत्तमांश असतो. वर्गोत्तम नवमांश हे शुभदायक असतात.

**राशिचे दिवस रात्रबल आणि राशिंची शीर्षोदयाचे प्रकार**

*मेषाद्याश्चत्वारः: सधन्विमकराः क्षपाबला ज्ञेयाः।*
*पृष्ठोदया विमिथुनाः शिरसान्ये ह्युभयतो मीनः ।। २०।।*

**भट्टोत्पल :** मेषाद्याश्चत्वार इति। राशिनां दिनरात्रिबलपृष्ठोदयत्वशीर्षोदयत्वमाह–मेषाद्याश्चत्वारो मेषवृषमिथुनकर्कटा धन्विमकराभ्यां सह एते षड्राशयो रात्रि–बलिनः। अन्ये दिनबलाः। अन्न यद्यपि बलग्रहणमस्ति तथापि संज्ञामात्रं वेदितव्यं यथा रात्रिसंज्ञा तथा दिनसंज्ञा इति। यतस्ते द्युबलं सन्ध्याद्युरात्रिबलिन इति। पृष्ठोदया विमिथुना इति। मेषवृषकर्कटधन्विमकराः पृष्ठोदयसंज्ञाः। अन्ये मिथुनसिंहकन्यातुलावृश्चिककुम्भाः शीर्षोदयसंज्ञाः। मीनः शीर्षोदयः पृष्ठोदयश्चेति ।। २०।।

**सती -** रात्रबली:- अ) मेष (१), वृषभ (२), मिथुन (३), कर्क (४), धनु (९), मकर (१०) हया राशि रात्री बलवान असतात.

**दिनबली -** ब)- सिंह (५),कन्या (६), तुला (७), वृश्चिक (८), कुंभ (११) आणि मीन (१२) हया राशि दिवसा बलवान असतात.

| रात्रबली | १, २, ३, ४, ९, १० | राशि |
|---|---|---|
| दिनबली | ५, ६, ७, ८, ११, १२ | राशि |

पृष्ठोदयी - १, २, ४, ९, १० हया राशि पृष्ठोदयी असतात,.
शीर्षोदयी - ३, ५, ६, ७, ८, आणि ११ हया राशि शीर्षोदयी असतात. मात्र मीन रास ही उभयोदयी (शीर्षोदयी व पृष्ठोदयी) असते. याचा उपयोग आपल्याला लग्नावरून जातकाच्या जन्माबद्दल माहीतीसाठी होतो.

| पृष्ठोदयी | १, २, ४, ९, १० | राशि |
|---|---|---|
| शिर्षोदयी | ३, ५, ६, ७, ८, ११, | राशि |
| उभयोदयी | १२ | राशि |

**ग्रहांचे उच्च-नीच आणि त्रिकोण राशि स्थान**

*अजवृषमृगाङ्गनाकर्किमीनवणिजांशकेष्विनाद्युच्चाः।*
*दशशिख्यष्टाविंशतितिथीन्द्रियत्रिनवविंशेषु ।। २१।।*

**भट्टोत्पल :** अजवृषेति। अर्कादीनामुच्चराशीनाह। सारावल्याम्-
विंशतिरंशाः सिंहे त्रिकोणमपरे स्वभवनमर्कस्य।
उच्चं भागत्रितयं वृष इन्दोः स्यात्त्रिकोणमपरे स्युः।।
द्वादशभागा मेषे त्रिकोणमपरे स्वभं तु भौमस्य।
उच्चफलं कन्यायां बुधस्य तुङ्गांशकैः सदा चिन्त्यम्।।
परतस्त्रिकोणजातं पञ्चभिरंशैः स्वराशिजं परतः।
दशभिर्भागश्चापे त्रिकोणमपरे स्वभं तु देवगुरोः।।
शुक्रस्यांशातिथयस्त्रिकोणमपरे स्वभं तुलायां च ।
कुम्भे त्रिकोणनिजभे रविजस्य रवेर्यथा सिंहे।।

**तद्यथा -** आदित्यस्य मेष उच्चं चन्द्रस्य वृष उच्चं भौमस्य मृगो मकरः बुधस्य कन्या गुरोः कर्कः शुक्रस्य मीनः मन्दस्य वणिक् तुला एवं सर्वराशिषूच्चसंज्ञा दशादिषु भागेषु

व्यवस्थिता: परमोच्चस्था भवन्ति। तद्यथा-मेषस्य दशमांशे व्यवस्थितोऽर्क: परमोच्चस्थो भवति, वृषस्य तृतीयभागे चन्द्र: मकरस्याष्टाविंशतिभागे भौम: कन्याया: पञ्चदशे बुध: कर्कटस्य पञ्चमे जीव: मीनस्य सप्तविंशे शुक्रस्तुलायां विंशतितमे सौरि एवं विधा: परमोच्चस्था उदिता: ग्रन्थान्तरे च। रवेर्मेषतुले प्रोक्ते चन्द्रस्य वृषवृश्चिकौ। भौमस्य मृगकर्कौ च कन्यामीनौ बुधस्य च। जीवस्य कर्कमकरौ मीनकन्ये सितस्य च। तुलामेषौ च मन्दस्य उच्चनीचे उदाहृते।।

**सती- ग्रहांचे उच्च स्थान**

१) मेष राशित सूर्य ०-१०° पर्यंत उच्चीचा असतो

२) वृषभ राशित चंद्र ०-३° पर्यंत उच्चीचा असतो.

३) मकर राशित मंगळ ०-२८° पर्यंत उच्चीचा असतो.

४) कन्या राशित बुध ०-१५° पर्यंत उच्चीचा असतो.

५) कर्क राशित गुरू ०- ५° पर्यंत उच्चीचा असतो.

६) मीन राशित शुक्र ०-२७° पर्यंत उच्चीचा असतो.

७) तुला राशित शनि ०-२०° पर्यंत उच्चीचा असतो.

८) मिथुन राशित राहू ०-२५° पर्यंत उच्चीचा असतो.

**उच्चराशि चक्र**

| ग्रह | सू | चं | मं | बु | गु | शु | श | रा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| उच्चराशि | मे | वृष | म | कं | क | मी | तु | मि |
| अंश | १० | ३ | २८ | १५ | ५ | २७ | २० | २५ |

***उच्चान्नीचं सप्तममर्कादीनां त्रिकोणसंज्ञानि।***

***सिंहवृषाजप्रमदा-कार्मुकभृत्तौलिकुम्भधरा:।। २२।।***

**भट्टोत्पल :** उच्चान्नीचमिती। ग्रहाणामुच्चनीचस्थानानि त्रिकोणानि चाह-यस्य ग्रहस्य यदुच्चं तस्मादुच्चस्थानात् सप्तमं नीचसंज्ञं तत्र दशादिष्वंशेषु परमनीचत्वं ज्ञेयम्। अत्र न्यास एवं विधा: सूर्यादय: परमनीचस्था भवन्ति। अर्कादीनां त्रिकोणसंज्ञानीति। आदित्यस्य सिंहस्त्रिकोणाख्य: चन्द्रमसो वृष: भौमस्य मेष: बुधस्य कन्या जीवस्य धनु: शुक्रस्य तुला मन्दस्य कुम्भ इत्यर्थ:।। २२।।



**सती -** ज्या ग्रहाची जेवढया अंशावर जी उच्च रास असते तेवढयाच अंशावर त्यापासून सातव्या राशित तो ग्रह नीचीचा असतो. सूर्याची सिंह रास, चंद्राची वषभ रास, मंगळाची

मकर रास, बुधाची कन्या रास, गुरूची धनु रास शुक्राची तुला रास आणि शनिची कुंभ रास हे मूलत्रिकोण स्थाने आहेत.

**ग्रहांचे नीच स्थाने**

| ग्रह | सू | चं | मं | बु | गु | शु | श |
|---|---|---|---|---|---|---|---|
| नीचराशि | तु | वृ | कर्क | मी | म | कं | मे |
| अंश | १० | ३ | २८ | १५ | ५ | २७ | २० |

**ग्रहांचे मुल त्रिकोण राशि**

| ग्रह | सू | चं | मं | बु | गु | शु | शनि |
|---|---|---|---|---|---|---|---|
| मुल त्रिकोण रास | सिंह | वृष | मे | कं | ध | तु | कुं |

**ग्रहांचे षडवर्ग**

***गृहहोराद्रेष्काणा नवभागो द्वादशांशकस्त्रिंशः।***
***वर्गः प्रत्येतव्यो ग्रहस्य यो यस्य निर्दिष्टः ।। २३।।***

**भट्टोत्पल :** गृहहोरेति। षड्वर्गज्ञानार्थमाह–आत्मीयो राशिर्ग्रहस्य गृहसंज्ञः। आत्मीया होरा आत्मीयश्च द्रेष्काण आत्मीया नवमभाग आत्मीयो द्वादशांश आत्मीयस्त्रिंशद्भागः, एत्तेषां षड्वर्गसंज्ञा यद्यप्येवं तथाप्यात्मीयेषु स्थितः स्ववर्गस्थो भवति। वर्गशब्दस्य समुदायवाचित्वात् यत्र चन्द्रार्कयोः त्रिंशांशकाभावो भौमादीनां होराभाव एवं षष्ठानामसम्भ्वः। स्वगृहाधिष्ठितो वर्गस्थः। परवर्गस्थस्याप्येवमेवेति ज्ञातव्यम्।। २३।।

**सती –** ज्या ग्रहाचे जे लग्न (राशिचा एक भाग), होरा (राशिचे दोन सारखे भागापैकी एक भाग), द्रेष्काण, (राशिचे सारखे तीन भागापैकी एक भाग ) नवमांश (राशिचे नउ सारखे भागापैकी एक भाग) द्वादशांश ( राशिचे बारा सारखे भागापैकी एक भाग) आणि त्रिशांश ( राशिचे तिस सारखे भागापैकी एक भाग) सांगीतले आहे. तेच त्या ग्रहाचे षडवर्ग समजल्या जातात.सूर्य आणि चंद्राचा त्रिशांश नसतो तसेच मंगळ, बुध, गुरू, शुक्र आणि शनि या ग्रहांचे होरा नसतात.

**अध्याय १ ला संपला.**



* * * * * * * *

(२)

अध्याय दुसरा

# ग्रहबलाध्याय

## कालपुरूषांचे आत्मादि विभाग

*आत्मा रविः शीतकरस्तु चेतः सत्त्वं धराजः शशिजोऽथ वाणी।*
*ज्ञानं सुखं चेन्द्रगुरूर्मदश्च शुक्रः शनिः कालनरस्य दुःखम् ।। १।।*

**कालरूपी पुरूषाचा आत्मा –** सूर्य, मन –चंद्र, बल– मंगळ, वाणी – बुध, ज्ञान/सुख– गुरू, मदन (कामदेव) – शुक्र आणि दुःख – शनि हे आहेत.

## आत्मादिंचे शुभाशुभत्व

*आत्मादयो गगनगैर्बलिभिर्बलवत्तराः।*
*दुर्बलैदुर्बला ज्ञेया विपरीतः शनिः स्मृतः।। २।।*

**सती –** जन्माचे वेळी जर सूर्यादि ग्रह बलवान असतील तर आत्मादि सुध्दा बलवान असतात. जर सूर्यादि ग्रह दुर्बल असतील तर आत्मादि यांना सुध्दा दुर्बल समजायला पाहिजे. शनिला या उलट समजायला पाहीजे. शनि जेवढा बलवान असेल तेवढाच तो अशुभ असतो. आणि जेवढा निर्बल असेल तेवढाच तो शुभ समजावा. म्हणजे निर्बल शनि शुभ असतो तर बलवान शनि अशुभ असतो.

## ग्रहांचे राजत्वादी अधिकार

*राजा रविः शशधरश्च बुधः कुमारः*
*सेनापतिः क्षितिसुतः सचिवौ सितेज्यौ।*
*भृत्यस्तथा तरणिजः सबला ग्रहाश्च*

*कुर्वन्ति जन्मसमये निजमेव रूपम् ।। ३।।*

**सती -**

१) सूर्य आणि चंद्र - राजा.

२) बुध - राजकुमार

३) मंगळ - सेनापति

४) गुरू आणि शुक्र - मंत्री

५) शनि - नौकर

जन्माचे वेळी जो ग्रह बलवान असतो, तो त्याच्या प्रमाणे जातकाला बनवतो. विशेषः- ज्या जातकाच्या कुंडलीत सूर्य आणि चंद्र बलवान असेल तर तो जातक राजा किंवा राजासारखा होतो. अशाप्रकारे इतर ग्रहांचे फल समजावे.

### दिशांचे स्वामी तसेच शुभाशुभ ग्रह

*प्राच्यादीशा रविसितकुजराहुयमेन्दुसौम्यवाक्पतयः।*
*क्षीणेन्द्वर्कयमाराः पापास्तैः संयुक्तः सौम्यः।। ४।।*

**भट्टोत्पल :** प्राच्यादीशेति। अथातो ग्रहयोनिप्रभेदाध्यायं व्याख्यास्यामः। तत्रादौ ग्रहाणां दिक्स्वाम्यं सौम्यपापत्वं चाह-तत्र पूर्वस्यां दिश्यर्काऽधिपतिः, पूर्व-दक्षिणस्यां शुक्रः, दक्षिणायां भौमः, दक्षिणपश्चिमायां राहुः, पश्चिमायां सौरिः, पश्चिमोत्तरायां चन्द्रः, उत्तरस्यां बुधः, उत्तरपूर्वस्यां जीवः। तद्यथा-पूर्वे रविः, आग्नेय्यां शुक्रः, दक्षिणे कुजः, नैर्ऋत्यां राहुः, पश्चिमे शनि वायव्यां चन्द्रः, उत्तरस्या बुधः, ईशान्यां गुरूः। क्षीणेन्द्वर्कयमारा इति। कृष्णपक्षस्याष्टम्या ऊर्ध्वं शुक्लपक्षस्याष्टमीं यावत्क्षीणचन्द्रो भवति। क्षीणश्चन्द्र आदित्याङ्गारकशनैश्वराः पापसंज्ञकास्तैः संयुतो बुधोऽपि पापो भवति। एषां पापानां मध्येऽन्यतमेन युक्तो बुधः पाप एव अर्थादिवाऽक्षीणचन्द्रमाः सौम्यः बुधबृहस्पतिशुक्राश्च सौम्या ज्ञेया इति ।। ४।।

**सती -** पूर्व पश्चिम इत्यादी आठ दिशांचे स्वामी अनुक्रमे सूर्य शुक्र, मंगळ, राहु शनि, चंद्र, बुध आणि गुरू हे असतात.

| दिशा | स्वामी | दिशा | स्वामी |
|---|---|---|---|
| पूर्व | सूर्य | पश्चिम | शनि |
| आग्नेय | शुक्र | वायव्य | चंद्र |
| दक्षिण | मंगळ | उत्तर | बुध |
| नैर्ऋत्य | राहु | ईशान्य | गुरू |




**अ ) पापग्रह कोणते –** क्षीण चंद्र, सूर्य, शनि, आणि मंगळ हे पापग्रह आहेत. तसेच राहु व केतू हे पण पापग्रह आहेत.

**ब ) शुभग्रह कोणते –** पूर्णचंद्र, बुध, गुरू, शुक्र हे शुभग्रह आहेत.

**पूर्णचंद्र –** क्षीणचंद्र :– शुक्लपक्षाच्या अष्टमी पासून कृष्णपक्षातील सप्तमी पर्यंत पूर्ण चंद्र समजला जातो. तसेच कृष्ण अष्टमीपासून शुक्ल सप्तमीपर्यंत क्षीणचंद्र समजला जातो.

## ग्रहांची संज्ञा आणि वेदांचे अधिपति

*क्लीबपती बुधसौरी चन्द्रसितौ योषितां नृणां शेषाः।*
*ऋगथर्वसामयजुषामधिपा गुरूसौम्यभौमसिताः ।। ५।।*

**भट्टोत्पल :** क्लीबपतीति ग्रहांणा स्त्रीपुन्नपुंसकाऽधिपत्यं शाखाधिपत्यं चाह–बुध शनैश्वरौ नपुंसकाधिपती, चन्द्रसितौ स्त्रीणामधिपती, शेषा आदित्याङ्गारक बृहस्पतयस्ते नृणामधिपतयः। प्रयोजनं चोरज्ञानादि। ऋगथर्वेत्यादि। ऋग्वेदाधिपतिर्जीवः, अथर्ववेदाधिपतिर्बुधः, यजुर्वेदाधिपतिः शुक्रः, सामवेदाधिपति भौमः। प्रयोजनं बलवति शाखाधिपतौ कुले जातस्तद्विद्याश्रेष्ठो ब्राह्मणो भवती। ब्राह्मणे चोरविज्ञान शाखाविज्ञान ग्रपीडायां तच्छाखापठनं पूजनमिती ।। ५।।

**सती –** ग्रहांचे स्त्री– पुरूष प्रकार

नपुंसक – बुध आणि शनि हे नपुंसक ग्रह आहेत.



पुरूषः – सूर्य, मंगळ आणि गुरू हे पुरूष ग्रह आहेत.

स्त्रीग्रह – चंद्र आणि शुक्र हे स्त्रीग्रह आहेत.

**वेदांचे अधिपती**

१) ऋग्वेदाचे स्वामी – गुरू ग्रह आहे.
२) यजुर्वेदांचे स्वामी – शुक्र आहे.
३) सामवेदाचे स्वामी – मंगळ ग्रह आहे.
४) अथर्ववेदाचे स्वामी – बुध ग्रह आहे.

चोर इत्यादी ज्ञानासाठी पुरूष ग्रहांचे प्रयोजन आहे. तर ग्रहांच्या जन्मारिष्ठ शांतीसाठी वेदांच्या अधिपतींचे प्रयोजन आहे.

## ब्राह्मण ईत्यादि वर्णांचे स्वामी

*जीवसितौ विप्राणां क्षत्राणां रविकुजौ विशां चन्द्रः।*
*शूद्राधिपः: शशिसुतः शनैश्चरः सङ्करभवानाम्।। ६।।*

**भट्टोत्पल :** जीवसिताविति। ग्रहाणां वर्णाधिपत्यमाह–जीवशुक्रौ ब्राह्मणानामधिपती, सूर्याङ्गारकौ क्षत्रियाणामधिपतिश्चन्द्रो वैश्याधिपतिः बुधः शूद्राधिपतिः शनैश्वरः सङ्करभवानामधिपतिः प्रतिलोमजानां सूतमागधादीनामित्यर्थः।। ६।।

**सती –** एकूण ४ वर्ण आहेत ते म्हणजे.
१) ब्राम्हण २) क्षत्रिय ३) वैश्य ४) शुद्र वर्ण
४ वर्णांचे स्वामी खालीलप्रमाणे आहेत.

| वर्ण | | स्वामी |
|---|---|---|
| १) ब्राम्हण वर्ण | – | गुरू आणि शुक्र |
| २) क्षत्रिय वर्ण | – | सूर्य आणि मंगळ |
| ३) वैश्य वर्ण | – | चंद्र |
| ४) शुद्र वर्ण | – | बुध |
| ५) वर्ण शङ्कर व इतर | – | शनि |

जातकाचा तसेच चोराचा वर्णभेद जाणून घेण्यासाठी याची मदत होते.

## ग्रहांचे स्थान बल

*बलवान् स्वगृहोच्चांशे मित्रर्क्षे वीक्षितः शुभैश्चापि।*
*चन्द्रसितौ स्त्रीक्षेत्रे पुरूषक्षेत्रोपगाः शेषाः।। ७।।*



**भट्टोत्पल :** बलवानिति। बलाबलकरणमाह–मित्रक्षेत्रस्थो ग्रहों बलवान् भवति, स्वगृहस्थः स्वोच्चस्थः स्वनवमांशकस्थश्च उच्चादिसाहचर्यात् त्रिकोणस्थोऽपि। यस्मादुक्तं

स्वोच्चसुहृत्स्वत्रिकोणनवांशैः स्थानबलमिति वीक्षितः शुभैश्चापि यतस्तत्रस्थो ग्रहः शुभैर्दृष्टो बलवान् भवति। चन्द्रसितौ स्त्रीक्षेत्रे वृषादौ समराशौ व्यस्थितौ बलिनौ भवतः। शेषा आदित्याङ्गारकबुधजीवसौरयः पुरूषक्षेत्रस्थाः विषमराशौ मेषादौ व्यवस्थिताः बलवन्तो ज्ञेया इति ।। ७।।

**सती –** सर्व ग्रह आपल्या राशित (स्वराशित) आपल्या उच्चराशित तसेच आपल्या नवमांश आणि मित्रराशित असता तसेच शुभग्रहांची त्या ग्रहावर दृष्टी असेल तर (शुभग्रह म्हणजे बुध, गुरू, शुक्र आणि पूर्णचंद्र) तो ग्रह बलवान समजल्या जातो.

समराशित चंद्र आणि शुक्र (स्त्रीग्रह)

अ) जर समराशित म्हणजे २, ४, ६, ८, १०, १२ (स्त्रीराशि) चंद्र आणि शुक्र असेल तर ते ग्रह बलवान असतात.

ब) जर विषमराशित, १, ३, ५, ७, ९, ११, (पुरूषराशि) सूर्य, मंगळ, गुरू, (पुरूष ग्रह) बुध आणि शनि ग्रह असता ते ग्रह बलवान असतात.

## ग्रहांचे दिशाबल आणि चेष्टाबल

*प्राच्यादिषु जीवबुधौ सूर्यारौ भास्करिः शशाङ्क सितौ।*
*उदगयने शशिसूर्यौ वक्रेऽन्ये स्निग्धविपुलाश्च ।। ८।।*

**भट्टोत्पल :** प्राच्यादिष्विति। दिग्बलचेष्टाबलयोर्ज्ञानार्थमाह–पूर्वादिक्स्थौ जीवबुधौ बलिनौ भवतः लग्नगतावित्यर्थः आदित्याङ्गारकौ दक्षिणस्थौ बलिनौ दशमस्थावित्यर्थः। शनैश्वरः पश्चिमस्थो बली लग्नात् सप्तमस्थ इत्यर्थः। चन्द्रशुक्रावुत्तरस्थौ बलिनौ चतुर्थस्थावित्यर्थः। एतद्दिग्बलम्। अथ चेष्टाबलम्। उदगयन इत्यादी–मकरादिराशिषट्के वर्तमानोदगयनस्थो भवति कर्कदिराशिषट्के वर्तमानो दक्षिणायनस्थश्च। तत्रोत्तरायणस्थौ अर्कशशिनौ बलिनौ, वक्रेऽन्ये। स्फुटगत्या प्रतीपगतयः वक्रिण उच्यन्ते। भौमादयो वक्रगताश्च बलिनो भवन्ति। तथा गगने स्निग्धा दृश्यमाना बलिनो भवन्ति विपुला बृहत्प्रमाणा दृश्या वा ।। ८।।

## ग्रह कोणत्या दिशेला बलवान असतात ते पाहू

**सती –** पूर्वेस–बुध, गुरू, लग्न बलवान असतात

दक्षिणेस– दहाव्या स्थानी सूर्य आणि मंगळ बलवान असतात.

पश्चिमेस–सातव्या स्थानी शनि बलवान असतो

उतरेस–चौथ्या स्थानी चंद्र आणि शुक्र बलवान असतात.



जन्मकुंडलीत लग्नभावाची पूर्व दिशा, दहाव्या भावाची दक्षिण दिशा, सातव्या भावाची पश्चिम दिशा तर चौथ्या भावाची उत्तर दिशा असते. सांगायचे म्हणजे १,४,७,

१० ही केंद्र स्थाने मुख्य ४ दिशा आहेत.




दिशा-बलवान ग्रह

## ग्रहांचे चेष्टाबल

**सती –** सूर्य व चंद्र उतरायणात बलवान असतात मात्र इतर ग्रह वक्रगती (उलट दिशेने चालणे) असतांना तसेच आकाशात स्वच्छ आणि मोठा असेल तर तो ग्रह बलवान असतो. अयन दोन असतात उत्तरायण व दक्षिणायण.

**उत्तरायण :** जेंव्हा सूर्य मकर राशि पासून मिथूनराशि पर्यत असतो त्याला उत्तरायण आणि
**दक्षिणायण :** सूर्य कर्केपासून  धनु पर्यंतचा असतो त्याला दक्षिणायण म्हणतात.

ग्रहांची गती २ आहेत. मार्गी आणि वक्री. सूर्य-चंद्र नेहमी मार्गी असतात तर ईतर ५ ग्रह म्हणजे मंगळ, बुध, गुरू, शुक्र आणि शनि यांना ग्रह पंच तारा म्हणतात ते मार्गी आणि वक्री दोन्ही असतात.

**मार्गी :** ग्रह परिभ्रमण मार्गावर पश्चिमेकडून पूर्वेकडे भ्रमण करतो तेंव्हा तो मार्गी असतो
**वक्री :** ग्रह परिभ्रमण मार्गावर पूर्वेकडून पश्चिमकडे भ्रमण करतो तेंव्हा तो वक्री असतो
**विशेष :** दिग्बल युत ग्रहच्या दिशा आणि दशेत धन, सुखाचा लाभ होतो. तसेच चेष्टाबल युत ग्रहाच्या दिशेत यात्रा केल्याने विजय, धन आणि यश यांचा लाभ होतो.

## ग्रहांचे कालबल

*अह्नि सितार्कसुरेज्या द्युनिशं ज्ञो नक्तमिन्दुकुजसौराः ।*

*स्वदिनादिष्वशुभशुभा बहुलोत्तरपक्षयोर्बलिनः ।। ९ ।।*

**भट्टोत्पल :** अहनि सितेति। कालबलमाह–अहनि दिवसे शुक्रादित्यजीवा बलिनः। ज्ञो बुधः द्युनिशं अहोरात्रं बली। नक्तं रात्रौ चन्द्राङ्गारकशनैश्चरा बलिनः। स्वदिनादिष्विति– स्वदिवसे सर्वे ग्रहा बलिनो भवन्ति। आदिग्रहणात् स्वाब्दे स्वमासे स्वकाले होरायां च । अशुभशुभा इति। अशुभाः पापाः बहुलपक्षे कृष्णपक्षे बलिनः, शुभाः सौम्याः शुक्लपक्षे बलिनः।। ९।।

**सती –** ग्रहांचे कालबल

– रवि, गुरू आणि शुक्र हे दिवसा बलवान असतात.

– बुध हा दिवस आणि रात्री ला दोन्ही वेळेस बलवान असतो.

– तर चंद्र, मंगळ आणि शनि हे रात्रीला बलवान असतात.

– सूर्यग्रह आपल्या वारी/दिवशी, होरा, महिना आणि वर्षात बलवान असतो.

– पापग्रह कृष्णपक्षात तर शुभ ग्रह शुक्ल पक्षात बलवान असतात.

| दिवसा बलवान ग्रह | सूर्य, गुरू, आणि शुक्र |
|---|---|
| रात्री बलवान ग्रह | चंद्र , मंगळ ,शनि |
| दिवसा आणि रात्री बलवान ग्रह | बुध |

**ग्रहांचे नैसगिक बल**

***मन्दारसौम्य वाक्पति सितचन्द्रार्का यथोत्तरं बलिनः।***
***नैसर्गिकबलमेतत् बलसाम्येऽस्माद् बलाधिकता ।। १०।।***

**भट्टोत्पल :** मन्दारसौम्येति। नैसर्गिकबलमाह–सर्वेभ्यो ग्रहेभ्यो मन्दो हीनबलः मन्दादङ्गारको बलवान् अङ्गारकाद्बुधः बुधाज्जीवः जीवाच्छुक्रः शुक्राच्चन्द्रः चन्द्रादादित्यः एतद् ग्रहाणां नैसर्गिकं स्वाभाविकबलम्। बलसाम्येऽस्मादधिक चिन्ता। यत्र पूर्वोक्तं ग्रहयोस्तुल्यबलं भवति तत्र नैसर्गिकबलेन चाधिकबलः स ततो बलवान् भवति।। १०।।

**सती –** (१) शनि, (२) मंगळ (३) बुध (४) गुरू (५) शुक्र (६) चंद्र (७) सूर्य हे ग्रह क्रमानुसार उत्तरोत्तर बलवान असतात म्हणजेच

शनि पेक्षा मंगळ बलवान

मंगळापेक्षा बुध बलवान



बुधापेक्षा गुरू बलवान

गुरूपेक्षा शुक्र बलवान

शुक्रापेक्षा चंद्र बलवान
आणि चंद्रापेक्षा सूर्य बलवान

असे हे ग्रहांचे नैसगीक बल असते. जर पूर्वी सांगीतलेल्याप्रमाणे ग्रहांमध्ये, स्थान, बल इत्यादी मध्ये समानता असेल तर ज्या ग्रहांचे नैसगीक बल अधिक असते तो ग्रह बलवान मानल्या जातो.

**ग्रहांचे स्थान बल**

*मित्रक्षेत्रे स्वोच्चे स्वहोरायां स्वभवनत्रिकोणे च।*
*स्वद्रेष्काणे स्वांशे स्वदिने च बलान्विताः सर्वे।। ११।।*

**भट्टोत्पल :** मित्रक्षेत्र इति। स्थानबलज्ञानमाह–मित्रक्षेत्रस्थो ग्रहों बलवान् भवति, स्वोच्चस्थः स्वगृहस्थः स्वत्रिकोणस्थः स्वद्रेष्काणस्थः स्वहोरास्थः स्वांशस्थः स्वदिनस्थः एतेषु स्थानेषु स्थितो ग्रहो बलवान् भवति ।। ११।।

**सती –** सर्व ग्रह आपल्या मित्र राशीत, तसेच आपल्या उच्च राशीत, होऱ्यात लग्नात, मुलत्रिकोण रास, द्रेष्काण, नवमांश आणि दिवशी बलवान असतात

**ग्रहदृष्टी-स्थान**

*दशम-तृतीये नव-पञ्चमे चतुर्थाष्टमें कलत्रं च ।*
*पश्यन्ति पादवृद्ध्या फलानि चैवं प्रयच्छन्ति ।। १२।।*

**भट्टोत्पल :** दशमतृतीय इति। दृष्टिज्ञानार्थमाह–यस्मिन् स्थाने ग्रहः स्थितः तस्माद् दशमे तृतीये च पाददृष्ट्या पश्यति, नवमे पञ्चमे चार्धदृष्ट्या पश्यति, चतुर्थाष्टमे पादहीनं पश्यति, त्रिभिः पादैरित्यर्थः। कलत्रं सप्तमं सम्पूर्णदृष्ट्या पश्यति। एवं सर्वे ग्रहाः पश्यन्ति फलानि चैवं प्रयच्छन्ति। यत्र पादमेकं पश्यति तत्र पादमेकं फल दन्तति। यत्र पादद्वयं पश्यन्ति तत्र पादद्वयफलम्। यत्र पादत्रयं पश्यन्ति तत्र पादत्रयफलम्। यत्र सम्पूर्ण पश्यन्ति तत्र सम्पूर्णफलं प्रयच्छन्ति ।। १२।।

**सती –** १) सर्व ग्रह ज्या घरात राहतात त्या ठिकाणाहून ते तिसऱ्या आणि १० व्या घरास एक पाद (एक चरण– २५%) चतुर्थांश दृष्टीने पाहतात,

२) – अशाप्रकारे सर्व ग्रह नवव्या आणि पाचव्या स्थानाला अर्ध (दोन चरण) दृष्टीने (५०%) पाहतात.



३) – अशाप्रकारे सर्व ग्रह चौथ्या व आठव्या स्थानाला त्रीपाद दृष्टीने (तीन चरण– ७५%) पाहतात.

४) – अशाप्रकारे सर्व ग्रह सातव्या स्थानाला चार चरणांनी (१००%) म्हणजे पूर्ण दृष्टीने पाहतो. अशाप्रकारे ग्रह वाढत्या चरण दृष्टीनुसार (एक पाद, द्विपाद, चतुर्थ पाद दृष्टी नुसार) एक चतुर्थांश, अर्धे, तीन चतुर्थांश आणि पूर्ण फळ देतो. म्हणजेच ३–१० स्थानात एक चतुर्थांश फळ, ५–९ स्थानात अर्धे फळ, ४–८ स्थानात तीन चतुर्थांश फळ व ७ व्या स्थानात पूर्ण फळ मिळते.

## ग्रहांचे विशेष दृष्टीस्थान

*पूर्णम्पश्यति रविजस्तृतीयदशमे त्रिकोणमपि जीवः।*
*चतुरस्त्रं भूमिसुतः सितार्कबुधहिमकराः कलत्रं च ।। १३।।*

**सती –**

१) शनि – तिसऱ्या आणि दहाव्या स्थानाला पूर्णदृष्टीने पाहतो.
२) गुरू – पाचव्या आणि नवव्या स्थानाला पूर्णदृष्टीने पाहतो.
३) मंगळ – चौथ्या आणि आठव्या स्थानाला पूर्णदृष्टीने पाहतो.
४) शुक्र, सूर्य,बुध आणि चंद्र–हे ग्रह मात्र आपल्या स्थानापासून सप्तम स्थानाला (कलत्र स्थानाला) पूर्णदृष्टीने पाहतात.

## ग्रहांचे पूर्ण दृष्टीस्थान

ग्रह – पूर्ण दृष्टीस्थान
शनि – ३, १०
मंगळ– ४, ८
गुरू – ५, ९
शुक्र, सूर्य, बुध, चंद्र – ७

## अध्याय २ रा संपला.

---

टीप : या अध्यायातील श्लोक १, २, ३ आणि १३ चे संस्कृत भट्टोत्पल टीका उपलब्ध नसल्याने दिली नाही.

* * * * * * * *

(३)

अध्याय तिसरा

# ग्रहमैत्री विचार

### यवनादि आचार्यांच्या मते ग्रह मैत्री

*मित्राण्यर्काज्जीवो ज्ञगुरू ज्ञसितौ विभास्करा विकुजाः।*
*वीन्द्वर्का विकुजरवीन्दवश्च केषाञ्चिदरयोऽन्ये ।। १।।*

**भट्टोत्पल :** मित्राण्यर्कादिति। अथ मित्रप्रकरणमारभ्यते। तत्रादौ परमतेन मित्रामित्राण्याह– अर्कात् प्रभृति मित्राणि तत्रादित्यस्य जीवो मित्रं शेषाः शत्रवः, चन्द्रस्य बुधजीवौ मित्रे शेषाः शत्रवः, कुजस्व बुधशुक्रौ मित्रे शेषाः शत्रवः, बुधस्य विगतार्काः सर्वे मित्राणि रविः शत्रुः, जीवस्य विगतकुजाः सर्वे मित्राणी कुजः शत्रुः, शुक्रस्य विगतचन्द्रार्काः सर्वे मित्राणी चन्द्रार्कौ तस्य शत्रु शनैश्चरस्य विगताङ्गारकसूर्यचन्द्राः सर्वे मित्राणी चन्द्रार्कभौमास्तस्य शत्रवः एतत्केषाञ्चिदाचार्याणां मतम् ।। १।।

**सती –** सूर्य ग्रहाचा मित्र गुरू आहे. बाकी सर्व ग्रह त्याचे शत्रु आहेत.
– चंद्राचे– बुध आणि गुरू मित्र आहेत. बाकी सर्व ग्रह त्याचे शत्रु आहेत.
– मंगळाचे – बुध आणि शुक्र हे मित्र असून बाकी ग्रह शत्रु आहेत.
– बुधाचे– चंद्र मंगळ, गुरू, शुक्र आणि शनि हे मित्र असून सूर्य ग्रह त्याचा शत्रु आहे.
– गुरूचे– सुर्य, चंद्र, बुध, शुक्र आणि शनि हे मित्र आहेत. मंगळ मात्र गुरूचा शत्रु आहे.
– शुक्राचे– मंगळ, बुध, गुरू आणि शनि हे मित्र असून, सूर्य, चंद्र हे शत्रु आहेत.
– शनिचे– बुध, गुरू, शुक्र हे मित्र असुन सूर्य, चंद्र, मंगळ हे शत्रु आहेत.

हे मित्र–शत्रु मत सर्व आचार्यांना मान्य नाही काही ज्ञानी याला यवन आचार्यांचे मत आहे असे मानतात.

सत्याचार्यांच्या मतानुसार ग्रहांची नैसर्गिक मैत्रि–



**शत्रू मन्दसितौ समश्च शशिजो मित्राणि शेषा रवे–**
**स्तीक्ष्णांशुर्हिमरश्मिजश्च सुहृदौ शेषाः समाः शीतगोः।**

**जीवेन्दूष्णकराः कुजस्य सुहृदो ज्ञोऽरिः सितार्की समौ**
**मित्रे सूर्यसितौ बुधस्य हिमगुः शत्रुः समाश्चापरे ।। २।।**

**सूरे : सौम्यसितावरी रविसुतो मध्योऽपरे त्वन्यथा**
**सौम्यार्की सुहृदौ समौ कुजगुरू शुक्रस्य शेषावरी**
**शुक्रज्ञौ सुहृदौ समः सुरगुरूः सौरेस्तथान्येऽरय-**
**स्तत्काले च दशाऽऽयबन्धुसहजस्वाऽन्त्येषु मित्रं स्थितः ।। ३।।**

**भट्टोत्पल** : शत्रू मन्दसिताविती। अथ सत्यमतमङ्गीकुर्बन् मित्रादीविभागं सर्वग्रहाणां तात्कालीनकं मित्रामित्रं चाह-रवेर्मन्दसितौ शत्रू, बुधः समः, शेषा ग्रहाः चन्द्राङ्गारकजीवाः रवेर्मित्राणि एवमादित्यस्य। अथ चन्द्रस्य तीक्ष्णांशुरित्यादी। शीतगोश्चन्द्रस्यार्कबुधौ मित्रे, शेषा भौमजीवशुक्रसौरा अस्य समाः मध्यस्था इत्यर्थः। एवं चन्द्रस्य। अथाङ्गारकस्य जीवेन्दुष्णकरा इति कुजस्य भौमस्य जीवेन्दूष्णकरा गुरूचन्द्रसूर्या मित्राणी, ज्ञो बुधः शत्रुः, सितार्की शुक्रमन्दौ समौ मध्यस्थौ। एवमङ्गारकस्य। अथ बुधस्य मित्रे सूर्यसिताविति। बुधस्यादित्यशुक्रौ मित्रे, हिमगुश्चन्द्रः शत्रुः, समाश्चापरे भौमजीवशनैश्चराः बुधस्य समा मध्यस्था एवं बुधस्य ।। २।।

**अथ गुरो** : सूरेरिति। सूरेर्बृहस्पतेः सौम्यसितौ बुधशुक्रौ शत्रु, रविसुतः शनैश्चरो मध्यस्थः, अपरे तु मित्राणी चन्द्राङ्गारकार्का गुरोर्मित्राणि। एवं जीवस्य। अथ शुक्रस्य सौम्यार्की बुधसौरी मित्रे समौ कुजगुरू भौमजीवौ मध्यस्थौ, शेषावर्कचन्द्रवरी। एवं शुक्रस्य। अथ सौरेः। शुक्रज्ञाविती शनैः शुक्रबुधौ मित्रे जीवः समः अन्ये चन्द्रार्कभौमाः अरयः। एवं सौरेः। नैसर्गिक मित्रामित्रविभागमुक्त्वा तात्कालिकमाह- तत्काले चेति। इष्टकाले यस्मिन्स्थाने ग्रहः स्थितस्तस्माद् दशमस्थाने एकादशे चतुर्थे तृतीये द्वितीये अन्ये द्वादशे यो ग्रहस्थितः स तात्कालिकमित्रं भवति ।। ३।।

**सती -** सूर्याचे शुक्र, शनि हे शत्रु असून, बुध सम आणि  चंद्र, मंगळ आणि  गुरू हे मित्र आहेत.

- चन्द्राचे सूर्य आणि बुध हे मित्र असून, मंगळ, गुरू, शुक्र, शनि हे मित्र आहेत, त्याला शत्रु नाही.
- मंगळाचे सुर्य, चन्द्र आणि गुरू हे मित्र असून, शुक्र व शनि सम आहेत तर बुध शत्रु आहे.



- बुधाचे सूर्य आणि शुक्र हे मित्र असून, मंगळ, गुरू, शनि हे सम आहेत तर चन्द्र शत्रु आहे.

- गुरूचे बुध और शुक्र शत्रु, शनि सम आणि सूर्य, चंद्र, मंगळ ग्रह मित्र आहेत
- शुक्राचें बुध,शनि हे मित्र ग्रह असून, मंगल व गुरू हे सम, तर सूर्य, चंद्र हे ग्रह शत्रु आहे
- शनि चे शुक्र आणि बुध मित्र असून गुरू सम, तसेच सूर्य, चन्द्र आणि मंगल हे शत्रु आहेत तात्कालिक मित्र स्थाने २,३,४,१०,११,१२ ही असून तात्कलिक शत्रु स्थाने १,५,६,७,८,९ आहेत

विशेष–नैसर्गिक चा अर्थ स्वाभाविक होतो. इथे ग्रहांचे स्वाभाविक मित्र, सम आणि शत्रु असा विचार केला गेला आहे।

**सती –** सत्याचार्याच्या मतानुसार ग्रहांची नैसर्गिक मैत्रि–खालील प्रमाणे आहे.

| ग्रह | सूर्य | चंद्र | मगळं | बुध | गुरू | शुक्र | शनि |
|---|---|---|---|---|---|---|---|
| मित्र | चं, मं ,गु | सू, बु | सू चं गु | सू, शु | सू चं मं | बु, श | बु, शु |
| सम | बु | मं गु श शु | शु श | मं, गु श | श | मं, गु | गु |
| शत्रु | शु , श | × | बु | चं | बु, शु | सू, चं | सू, चं, मं |

**सती –** प्रत्येक ग्रहाचे आपापल्या स्थित राशिपासून १०, ११, १२, २, ३ आणि ४ या स्थानांत स्थित असलेला ग्रह हा त्या ग्रहाचा तत्कालिक मित्र ग्रह असतो. म्हणजेच इतर स्थानातील ग्रह (५, ६, ७, ८, ९ आणि १ हया स्थानातील ग्रह) हे तत्कालिक शत्रु होत.

**विशेष :–** नैसर्गिक अर्थ स्वाभाविक असा होतो. इथे ग्रहांचे नैसर्गिक मित्र, सम–मित्र आणि शत्रू यांचा विचार केला गेला आहे. चंद्राचा कोणी नैसर्गिक शत्रु ग्रह नसतो.गुरू कोणत्याही ग्रहाचा शत्रु नसतो. तत्कालिक शत्रु स्थानासंबधी आचार्यानी या अध्यायाच्या ५ व्या श्लोकात स्पष्टपणे सांगीतले आहे.

**नैसर्गिक ग्रह–मैत्री–चक्र**

**तात्कालिक शत्रु-विचार ( क्षेपक )**

*मूलत्रिकोणषष्ठत्रिकोणनिधनैकराशिसप्रमगाः।*
*एकैकस्य यथा सम्भवन्ति तात्कालिका रिपवः ।। ४।।*

**भट्टोत्पल :** मूलत्रिकोणेति। अश्वादीनां मूलत्रिकोणराशिः सिंहवृषाजप्रमदाकार्मुक भृत्तौलिकुम्भधराः इति। षष्ठं त्रिकोणं नवपञ्चमं निधनमष्टमम् एकराशिः सप्तम एषु स्थानेषु स्थितास्तात्कालिका रिपवो भवन्ति ।। ४।।

**सती –** मुलत्रिकोणात तसेच ज्या स्थानात ग्रह असेल त्या स्थानापासून १, ५, ६, ७, ८ आणि ९ स्थानातील ग्रह त्या ग्रहाचे तत्कालीक शत्रू असतात.

## नैसर्गिक आणि तात्कालिक मित्रामित्र यावरून अधिमित्र ईत्यादिचा विचार

**मित्रमुदासीनोऽरिर्व्याख्याता ये निसर्गभावेन।**
**तेऽधिसुहृन्मित्रसमास्तत्कालमुपस्थिताश्चिन्त्याः।। ५।।**

**भट्टोत्पल :** मित्रमुदासीन इति। मित्रस्थानानां प्रयोजनमाह–दर्शितेषु मित्रस्थानेषु दशादिकेषु मित्रमवस्थितमधिमित्रं भवति, मध्यमस्थं मित्रं भवति, शत्रुव्यवस्थितो मध्यस्थो भवति, अर्थादेव मित्रस्थानव्यतिरिक्तानि स्थानानि शत्रुस्थानानि भवन्ति। तानि च प्रथमपञ्चाष्टषट् सप्तमनवमानि तेषु स्थानेषु ग्रहस्य नैसर्गिकः शत्रुर्व्यवस्थिताऽधिशत्रुर्भवति। मध्यस्थो व्यवस्थितः शत्रुर्भवति मित्रमवस्थितः समो भवति।। ५।।

**सती –** पूर्वीच्या श्लोकात जे नैसर्गिक मित्र, सममित्र आणि शत्रु बद्दल सांगीतले आहे. ते जर तत्कालिक मित्र असतील तर त्यांना क्रमाने अधिमित्र, मित्र आणि सममित्र समजावे. म्हणजेच नैसर्गीक आणि तत्कालिक मित्र असतील तर तो अधिमित्र होतो. एक प्रकारे मित्र आणि एक प्रकारे सम असेल तर तो मित्र होतो. एक प्रकारे मित्र आणि एक प्रकारे शत्रू असेल तर सम समजावे. एक प्रकारे शत्रू आणि एक प्रकारे सम असेल तर शत्रू समजावा आणि दोन्ही प्रकारे म्हणजे नैसर्गिक शत्रु तत्कालिक मित्र असेल तर सम, आणि नैसर्गिक शत्रु व तत्कालीक शत्रु असेल तर अधिशत्रू समजावे. यालाच पंचधा मैत्री म्हणतात.

| अधिमित्र | तत्कालिक मित्र + नैसर्गिक मित्र |
|---|---|
| मित्र | तत्कालिक मित्र + नैसर्गिक सम |
| सम | तत्कालिक मित्र + नैसर्गिक शत्रु |
| अधिशत्रु | तत्कालिक शत्रु + नैसर्गिक शत्रु |
| शत्रु | तत्कालिक शत्रु + नैसर्गिक सम |
| सम | नैसर्गिक मित्र + तत्कालिक शत्रु |

**अध्याय ३ रा संपला.**



* * * * * * * *

(४)

अध्याय चौथा

# ग्रह-स्वरूपाध्याय

## सूर्याचे स्वरूप आणि गुण

**चतुरस्त्रो नात्युच्चस्तनुकेशः पैत्तिकोऽस्थिसारश्च।**
**शूरो मधुपिङ्गाक्षो रक्तश्यामः पृथुश्चार्कः।। १।।**

**भट्टोत्पल :** चतुरस्त्र इति। अथ ग्रहाणां स्वरूपमाह- चतुरस्त्रो न्यग्रोधमण्डलाकारः यावदेव प्रसारितभुजद्वयस्य विस्तीर्णत्वं तावदेवास्य दैर्ध्य नात्युच्चः किञ्चिदुच्च एव, तनुकेशी विरलकेशः, पैत्तिकः पित्तप्रकृतिः, अस्थिसारो दृढास्थिः, शूरः सङ्ग्रामप्रियः, मधुपिङ्गाक्षः ईषत्पिङ्गलोचनः, रक्तश्यामो लोहितश्यामः रक्तश्चासौ श्यामश्च, पृथुर्विस्तीर्णशरीरः, एवंविधोऽर्कः ।। १।।

**ग्रहस्वरूप**

**सती -** आता आपण प्रत्येक ग्रहाचे स्वरूप आणि गुण पाहू या.

## सूर्य ग्रहाचे स्वरूप आणि गुण

**सूर्य -** दोन्ही हात पसरविल्यानंतर जेवढी रूंदी होते तेवढीच उंची अशा शरीराचा,सामान्य उंचीचा, कमी केस असलेला, पित्त प्रकृतिचा, मजबूत हाडांचा,शूरवीर , मधाच्या रंगासारखे पिंगट डोळे, लाल आणि काळा रंग मिश्रीत वर्णाचा आणि स्थूल शरीरयष्टी असणारा.

## चन्द्राचे स्वरूप आणि गुण

***स्वच्छः प्राज्ञो गौरश्चपलः कफवातिको रूधिरसारः।***
***मृदुवाग् घृणी प्रियसखस्तनुवृत्तश्चन्द्रमाः प्रांशुः।। २।।***

**भट्टोत्पल :** स्वच्छ इति। स्वच्छो दर्शनीयः, प्राज्ञो मेधावी, गौरः श्वेतप्रायः, चपलः क्रियास्ववस्थितः, कफवातिको वातश्लेष्मप्रकृतिः, रूधिरसारो रक्ताधिकः मृदुवाक्कोमलभाषी, घृणी दयावान्, प्रियसखो मित्रप्रियः, तनुवृत्तः कृशवर्तुलाङ्गः, प्रांशुरूच्चः एवंविधश्चन्द्रमाः ।। २।।



**सती -** चंद्र-हा स्वच्छ कीर्तिचा, तल्लख बुध्दीचा, विव्दान, गोऱ्या रंगाचा, चंचल, कफ आणि वात प्रकृतीचा असतो. अधिक रक्त युक्त, गोड बोलणारा दयाळू, मित्रांचा लाडका

कृश म्हणजे दुबळा, दरिद्री आणि गोल आकृतिचा तसेच उठावदार शरीरवाला असतो.

**मंगळाचे स्वरूप आणि गुण**

*हिंस्त्रो ह्रस्वस्तरूणः पिङ्गाक्षः पैत्तिको दुराधर्षः।*
*चपलः सरक्तगौरो मज्जासारश्च माहेयः।। ३।।*

**भट्टोत्पल :** हिंस्त्र इति। हिंस्त्रो दंष्टो, ह्रस्वोऽल्पोच्छ्रायः, तरूणःसदैव तरूणाकारः पिङ्गाक्षः कपिलनेत्रः, पैत्तिकः पित्तप्रकृतिः, दुराधर्षः दुराचारी, चपलोऽनेकमतिः, सरक्तगौरः पद्मपत्राग्रवर्णः मज्जासारो मज्जाधिकः एवंविधो माहेयोऽङ्गारकः।। ३।।

**सती –** मंगळ– हिंसक, लहान शरीर, कपिल तांबड्या रंगाचे डोळे, पित्त प्रकृति, दुराचारी, जो लवकर आटोक्यात येत नाही असा. चंचल, लाल आणि गोऱ्या रंगाचा तसेच खुप मजबूत, पिळदार शरीर असणारा.

**बुधाचे स्वरूप आणि गुण**

*मध्यमरूपः प्रियवाग् दूर्वाश्यामः शिराततो निपुणः।*
*त्वक्सारस्त्रिस्थूणः सततं हृष्टस्तु चन्द्रसुतः।। ४।।*

**भट्टोत्पल :** मध्यमरूप इति। अथ बुधस्याह–मध्यमरूपो न दर्शनीयः नाप्यदर्शनीयः, प्रियवाक् अभिमतवक्ता, दूर्वाश्यामः, शाद्वलवर्णाभः, शिराततो दृश्यस्नायुः, निपुणः क्रियासु सूक्ष्मदृक्, त्वक्सारः स्थूलत्वक्, त्रिस्थूणो वातपित्तकफ–प्रकृतिः, सततं हृष्टो नित्यं हर्षितः एवंविधो बुधः।। ४।।

**सती –** बुध– हा सामान्य स्वरूपाचा, देखणा, पण कुरूप नसता. मधुरबोलणारा, सावळ्या रंगाचा, स्पष्टपणे दिसणारे स्नायु आणि नसायुक्त, काम करण्यात निपुण–हुशार कफ, पित्त, वात तिन्ही प्रकारची प्रकृति आणि नेहमी आनंदी राहणारा असतो.

**गुरूचे स्वरूप आणि गुण**

*मधुनिभनयनो मतिमानुपचितमांसः कफात्मको गौरः।*
*ईषत्पिङ्गौलकेशो मेदःसारो गुरूर्दीर्घश्च।। ५।।*

**भट्टोत्पल :** मधुनिभेति। बृहस्पतेराह–मधुनिभनयनः ईषत्कातरलोचनः, मत्तिमान् बुद्धिमान्, उपचितमांसः स्थूलदेहः, कफात्मकः श्लेष्मप्रकृतिः, गौरः श्वेतप्रायः, ईषत्पिङ्गालकेशः, मेदःसारो मेदोऽधिकः, अदीर्घः, ह्रस्व एवंविधो गुरूः।। ५।।

**सती –** गुरूचे मधाप्रमाणे पिंगट डोळे असणारा, बुध्दिमान, स्थुल शरीर असणारा, कफप्रकृति, गोरा रंग, साधारण पिंगट रंगाचे केस असणारा, जास्तीचे मांस (मेद) असणारा, आणि दीर्घ शरीराचा असतो.

### शुक्राचे स्वरूप आणि गुण

*श्यामो विकृष्टपर्वा कुटिलासितमूर्द्धजः सुखी कान्तः।*
*कफवातिको मधुरवाग्भृगुपुत्रः शुक्रसारश्च ।। ६।।*

**भट्टोत्पल :** श्याम इति। श्यामः किञ्चित्कृष्णाङ्गः, विकृष्टपर्वा विरलशरीरसन्धिः, कुटिलासितमूर्द्धजः कुञ्चितकृष्णकेशः, सुखी भोगी, कान्तो दर्शनीयः, कफवातिको वातश्लेष्मप्रकृतिः मधुरवाक्कोमलभाषी, शुक्रसारः शुक्राऽधिकः एवंविधः शुक्रः।। ६।।

**सती -** शुक्र- सावळया रंगाचा, पातळ शरीर, कुरळे केस असणारा नेहमी आनंदी असणारा, कांतीयुक्त शरीर असणारा कफ आणि वात प्रकृति वाला, गोड बोलणारा आणि अधिक वीर्यवान असतो.

### शनिचे स्वरूप आणि गुण

*कृशदीर्घः पिङ्गाक्षः कृष्णः पिशुनोऽलसोऽनिलप्रकृतिः।*
*स्थूलनखदन्तरोमा शनैश्चरो स्नायुसारश्च।। ७।।*

**भट्टोत्पल :** कृशदीर्घ इति। अथ शनिमाह-कृशदीर्घो दुर्बलोन्नतः, पिंगाक्षः कपिलनेत्रः, कृष्णः श्यामवर्णवान्, पिशुनः पररन्ध्रसूचकः, अलसो मन्थरगामी, अनिल प्रकृतिः वातात्कमः स्थूलनखदन्तरोमास्नायुसारः एवंविधः शनैश्चरः।। ७।।

**सती -** शनि-सडपातळ उंच शरीरयष्टी असणारा, पिंगट डोळे, सावळया रंगाचा, चहाडी करणारा, कळी लावणारा, आळशी, वात प्रकृति, मोठे नख, दांत, मोठे आणि भरपूर केसं असणारा तसेच अधिक स्नायु युक्त बळकट शरीराचा असतो.

### ग्रहांचे स्वरूप आणि गुण

*एते ग्रहा बलिष्ठाः प्रसूतिकाले नृणां स्वमूर्तिसमम्।*
*कुर्युर्देहं नियतं बहवश्च समागता मिश्रम्।। ८।।*

**सती -** जातकाच्या जन्माच्या वेळी जो ग्रह सर्वात बलवान असेल तो ग्रह आपल्याप्रमाणे स्वरूप आणि गुण प्रदान करतो. जातकाच्या जन्माच्या वेळी अनेक ग्रह बलवान असतील तर त्यांच्या मिश्रीत स्वरूप आणि गुणानुसार जातक बनतो.

**अध्याय ४ था संपला.**

---

टीपः या अध्यायातील ८ व्या श्लोकाची संस्कृत भट्टोत्पल टीका उपलब्ध नसल्याने दिली नाही.



* * * * * * * *

(५)

अध्याय पाचवा

# आधानाध्याय (गर्भाधान विचार)

### गर्भाधान ज्ञान

*आधानऽस्तगृहं यत्तच्छीलो मैथुने पुमान् भवति।*
*सायासमसद्युतवीक्षिते विदग्धं शुभैरस्ते।। १।।*

**भट्टोत्पल :** आधानेऽस्तेति। अथाधानं व्याख्यास्यामः। तत्रादौ मैथुनकृतज्ञानमाह–आधानं बीजक्षेपः तत्र आधाने प्रश्नकाले च यो लग्नराशिस्तस्माद्यो राशिः सप्तमः तन्नामा जन्तुर्येन प्रकारेन मैथुनं करोती तेन प्रकारेण युक्तो मैथुनकारी पुमानिति वक्तव्यम्। तस्मिन्सप्तमे स्थाने पापग्रहैर्युते दृष्टे वा तन्मैथुनं सायासं श्रमयुक्तमासीत्। तस्मिन्नेव सप्तमे स्थाने शुभैर्युते दृष्टे वा विदग्धां श्रमरहितं च तन्मैथुनमासीत्। मिश्रैर्युते दृष्टे वोभयरूपं सामान्यात्। न केनचिद्युते न दृष्टे वा न सायासं नापि विदग्धमिति।। १।।

**सती –** गर्भधारणेच्या वेळी किंवा गर्भासंबंधी प्रश्न लग्नापासून सातव्या भावांत जी राशि असते ती ज्याप्रमाणे संभोग करते त्याचप्रमाणे स्त्री–पुरूष गर्भधानाच्यावेळी मैथुन करतात. लग्नस्थानापासून सातव्या स्थानी जर अशुभ ग्रह असेल किंवा अशुभ ग्रहाची सातव्या स्थानावर दृष्टी असेल तर खूप त्रास आणि कष्टाने संभोग होतो. मात्र सातव्या स्थानी शुभ ग्रह असेल किंवा शुभ ग्रहाची दृष्टी असेल तर प्रेमपुर्वक, शांतचित्ताने कुठलाही त्रास न होता संभोग होतो. शुभ आणि अशुभ दोन्ही प्रकारचे ग्रह युक्त किंवा त्यांची दृष्टी असते त्यावेळी सामान्यपणे संभोग होतो.

### जन्म–लग्न, प्रश्न–लग्न किंवा आधान–लग्नावरून दीव्याचे ज्ञान

*सौरांशेऽब्जांशे वा चन्द्रः सौरान्वितोऽथ हिबुके वा।*
*शान्तो दीपो जन्मन्याधाने चेन्न रविदृष्टः।। २।।*

**भट्टोत्पल :** सौरांश इति। आधानकाले जन्मकाले प्रश्नकाले वा दीपस्याभावज्ञान माह– सौरांशे यत्र तत्र राशौ मकरकुम्भयोरन्यतरनवांशस्थे चन्द्रमसि तमस्यन्धकारे आधान् प्रसवश्च वक्तव्यः। अब्जांशे वा कर्कटमीनयोरन्यतमनवांशस्थे वा चन्द्रमसि तमस्येव। अथवा यत्र तत्रावस्थितश्चन्द्रमाः शनैश्चरयुतस्तदा तमस्येव अथवा लग्नाच्चन्द्रश्चतुर्थो भवति तदाऽन्धरकार एव शान्तो दीपः प्रशान्त इत्यर्थः। एतदाधानलग्नाज्जन्मलग्नात् प्रश्नलग्नाच्च विचारणीयम्। अत्र सर्वयोगेषु यद्यर्कयुक्तश्चन्द्रमा भवति तदाऽन्धकाराभावः।। २।।

**सती –** जन्माच्या वेळी किंवा गर्भाधानाच्यावेळी किंवा प्रश्नलग्न काळात चंद्र हा

१) शनिच्या नवमांशात (मकर किंवा कुंभ) असेल तर अंधारात गर्भधारण किंवा जन्म झाला असे समजावे.

२) जलचर राशित (कर्क, मीन, मकरेचा उत्तरार्ध) किंवा नवमांशात असेल तरही अंधार समजावा.

३) लग्नात, चंद्र–शनि युत असेल किंवा लग्नापासून चतुर्थ स्थानी चंद्र असेल तेव्हाही जन्म किंवा गर्भधान अंधारात झाले असे समजावे.

४) जर केंव्हाही म्हणज जन्म लग्नात, प्रश्न लग्नात, किंवा गर्भधान लग्नात स्थित चंद्रावर सूर्याची दृष्टी नसेल तर अशा योगांमध्ये दीपाभाव म्हणजे अंधारात जन्म किंवा गर्भाधान झाले असे समजावे. जर चंद्रावर सूर्याची दृष्टी असेल तर दीप प्रकाशात म्हणजे जन्म किंवा गर्भाधान प्रकाशात झाले असे समजावे.

**गर्भाधान वेळेनुसार–जन्म वेळेचे ज्ञान**

*चन्द्रो यावत्सङ्ख्ये द्वादशभागे निषेकसमये स्यात्।*
*तस्मात् तावति राशौ जन्मेन्दौ सम्भवे मासि।। ३।।*

**सती –** गर्भाधारणेच्या वेळी चंद्र ज्या द्वादशांशात असेल त्यापासून तेवढयाच अंकाच्या राशित, तेवढयाच द्वादशांत जेव्हा दहाव्या महीन्यात चंद्र जाईल त्यावेळी जातकाच्या जन्म होतो.

जसे गर्भाधारणेच्या वेळी कन्या राशिच्या पाचव्या द्वादशांत म्हणजे मकरेचा चंद्र आहे. तेव्हा मकर राशि पासून पाचवी रास म्हणजे वृषभ राशित तेवढयाच अंशावर म्हणजे द्वादशांत दहाव्या महिन्यात चंद्र जेंव्हा जाईल त्यावेळी जातकाच्या जन्म होईल असे समजावे.

### उशीरा होणाऱ्या प्रसुतीचे ज्ञान

*उदयति मृदुभांशे सप्तमस्थे च मन्दे*
*यदि भवति निषेकः सूतिमब्दत्रयेण।*
*शशिनि तु विधिरेष द्वादशेऽब्दे प्रकुर्या-*
*न्निगदितमिह चिन्त्यं सूतिकालेऽपि युक्त्या।। ४।।*

**सती –** गर्भाधान काळात किंवा प्रश्न लग्नात शनि ग्रहाच्या राशिचा म्हणजे मकर किंवा कुंभेचा नवमांश असेल आणि लग्नापासून सातव्या स्थानी शनी असेल तर अशा योगात गर्भाधान होत असेल तर त्या दिवसापासून (३–या) तिसऱ्या वर्षी बालकाचा जन्म होतो. ठिक अशाप्रकारचा योग जर चंद्रमामुळे होत असेल. म्हणजे कोणत्याही लग्नात चंद्र राशि कर्केचा नवमांश असेल आणि लग्नापासून सातव्या स्थानी चंद्र असेल. तर असा योग असतांना गर्भधारण झाल्यास १२ वर्षानंतर बालकाचा जन्म होतो. गर्भधान लग्नावरून जे फलीत सांगीतले आहे. ते जन्म लग्नावरून सुध्दा समजावे.

### गर्भाधान लग्नापासून अशुभ योग

*यमवक्रौ द्यूनेऽर्कात् पुंसो रोगप्रदौ स्त्रियश्चन्द्रात्।*
*तन्मध्यगयोर्मृत्युस्तदेकयुतदृष्टयोश्चैवम्।। ५।।*

**भट्टोत्पल :** यमवक्राविति। आधानजन्ममध्ये पित्रोः शुभाऽशुभज्ञानमाह–आधानकाले प्रश्नकाले वा अर्काक्रान्तराशितः सप्तमे स्थाने यदि शनिभौमौ भवतस्तदा प्रसवादर्वाक् पुरूषस्य रोगादौ व्याधिकरावित्यर्थः। एवं चन्द्रात् सप्तमे राशौ शनिभौमौ भवतस्तदा स्त्रियों रोगकरौ भवतः। तन्मध्यगयोः मृत्युः। तदिति शनैश्चराङ्गारकौ तयोर्मध्यस्थितयोश्चन्द्रार्कयोर्यथासङ्ख्येन स्त्रीपुंसोर्मृत्युकरौ भवतः। तत्रादित्याद्यदा शनिभौमयोरेको द्वादशस्थो द्वितीयो द्वितीयस्थो भवति तदा प्रसवादर्वाक् पुरूषो म्रियते। अथ चन्द्रादेको द्वादशस्थो द्वितीयो द्वितीयस्थो भवति तदा प्रसवादर्वाक् स्त्री म्रियत इत्यर्थः। तस्मिन्नपि राशौ शनिभौमाभ्यामेकेन भुक्तांशकानतिक्रम्य द्वितीयेन भुज्यमानमप्राप्य यद्यर्कचन्द्रयोरन्यतरस्यावस्थानं तदाप्यसौ मध्यगत एव भवति। तदापि स्त्रीपुंसयोरेकतरस्य मृत्युर्भवति। तदेकयुतदृष्टयोश्चैवमिति। तयोः शनिभौमयोर्मध्यादेकेन भानुर्यदा युक्तः परेण दृश्यते तदा प्रसवादर्वाक् पुंसो मरणं भवति। तयोरेकेन युक्तं चन्द्रमसं यदाऽपरः पश्यति तदा प्रसवादर्वाक् स्त्री म्रियत इति।। ५।।

**सती –** गर्भाधान लग्नापासून स्त्री पुरूषांचे अशुभ योग

१) गर्भधानाचे वेळी जर मंगळ आणि शनि हे दोन्ही ग्रह सूर्यापासून ७ व्या (सातव्या) स्थानी असतील तर वडीलासाठी तो गर्भ रोगदायक ठरतो.

२) गर्भधानाचे वेळी जर मंगळ आणि शनि हे दोन्ही ग्रह चंद्रपासून ७ व्या (सातव्या) स्थानी असतील तर आईसाठी तो गर्भ रोगदायक ठरतो.

३) जर मंगळ आणि शनिच्या मध्ये सूर्य असेल तर त्या वडीलाचा मृत्यु होतो. आणि शनि आणि मंगळाच्या मध्ये चंद्र असेल तर प्रसुतीच्या आधीच बाळाच्या आईचा मृत्यु होतो.

४) शनि आणि मंगळ यापैकी कोणत्याही एका ग्रहाने युक्त आणि दुसऱ्या ग्रहाने दृष्ट सूर्य असेल तर त्या पुरूषाचा मृत्यु होतो. तसेच शनि किंवा मंगळ यापैकी कोणत्याही एका ग्रहाने युक्त आणि दुसऱ्या ग्रहाने दृष्ट चंद्र असेल तर स्त्रीचा मृत्यु होतो.

**गर्भाचे स्वरूप, १० महिन्याचे स्वामी आणि त्यांचे फळ**

*कललघनावयवास्थित्वग्रोमस्मृतिसमुद्भवाः क्रमशः।*
*मासेषु शक्रकुजजीवसूर्यचन्द्रार्किसौम्यानाम्।। ६।।*
*अशनोद्वेगप्रसवाः परतो लग्नेशचन्द्रसूर्याणाम्।*
*कलुषैः: पीडा पतनं निपीडितैर्निर्मलैः पुष्टिः।। ७।।*

**भट्टोत्पल :** कललघनेति। आधानमासादारभ्य माससप्तकाधिपतीन् ग्रहानाह–गर्भः प्रथमे मासे कललरूपो भवति शुक्रशोणितमिश्रीभूतः तत्र गर्भस्य प्रथमें मासे शुक्रोऽधिपतिः। द्वितीये शुक्रशोणितस्य घनत्वं भवति तत्र कुजोऽधिपतिः। तृतीये मासे गर्भस्य हस्ताद्यवयवोत्पत्तिर्भवति तत्र जीवोऽधिपतिः। चतुर्थे मासि गर्भस्यास्थिसम्भवो भवति तत्राऽर्कोऽधिपतिः। पञ्चमे मासी त्वक् चर्मसम्भ्वो भवति तत्राधिपतिश्चन्द्रः। षष्ठे रोमाणि जायन्ते तत्र शनिरधिपतिः। सप्तमे स्मृतिसमुद्भवश्चैतन्यं भवति तत्र बुधोऽधिपतिः। अतः क्रमेण मासत्रये गर्भस्य लक्षणं मासाधिपतीन् मासाधिपतिप्रयोजनमाह–तत्राष्टमे मासी गर्भो मातुर्भुक्तमश्नाति तत्र तस्याधानलग्नस्य अधिपतिः स्वामी। नवमे मासी तस्य गर्भस्योद्वेगो भवति तत्र चन्द्रोऽधिपतिः। दशमे मासी प्रसवो भवति तत्राऽर्कः स्वामी। प्रयोजनमाह–कलुषैरिती। अधानकाले यः कलुषो विवर्णस्तस्य सम्बन्धिनि मासी गर्भस्य पीडा वक्तव्या। निपीडितैरिती। ग्रहेणान्येन ग्रहयुद्धे विजिते शिखिशिखाध्वस्ते उल्काहते वा ग्रहे तस्मिन्मासि गर्भपतनं वक्तव्यम्। निर्मलैः रश्मिसंयुक्तैर्गर्भेस्य पुष्टिर्वक्तव्या।। ६-७।।

**सती –** गर्भधारणेपासून पहिल्या महीन्यात

१) शुक्र – पहिल्या महिन्यात – स्त्री बीजांड–शुक्राणु यांचे फलन (द्रवरूप)

२) मंगळ – दुसऱ्या महिन्यात – पिण्डरूप धारण होते.

३) गुरू – तिसऱ्या महिन्यात – हात, पाय आणि त्याचे अवयव होतात.

४) रवि – चौथ्या महिन्यात – हाडे तयार होतात.

५) चंद्र – पाचव्या महिन्यात – कातडी तयार होते.

६) शनि – सहाव्या महिन्यात – केस तयार होतात.

७) बुध – सातव्या महिन्यात – चेतना युक्त शरीर बनते

वरील एक ते सात महिन्यात अनुक्रमे खालील प्रमाणे सात महिन्याचे स्वामी असतात.

| **महिना** | **स्वामी** |
|---|---|
| १ ला महिना – शुक्र | २ दुसरा महिना – मंगळ |
| ३ तिसरा महिना – गुरू | ४ चौथा महिना– रवि |
| ५ पांचवा महिना – चंद्र | ६ सहावा – महिना – शनि |
| ७ सातवा – महिना – बुध | |

आठव्या महिन्यापासून आई द्वारे खाल्लेल्या अन्नापासून रस–स्वाद– निर्माण होतात. नवव्या महिन्यात गर्भाचे बाहेर निघण्याच्या हालचाली सुरू होतात. आणि दहाव्या महिन्यात प्रसुती होते. या तीन महिन्याचे स्वामी आठव्या महिन्याचा स्वामी–लग्नेश असतो. नवव्या महिन्याचा स्वामी–चंद्र आणि दहाव्या महिन्याचा स्वामी–सूर्य असतो. गर्भ काळात ज्या महिन्याचा स्वामी कलुषित ? (अस्त इत्यादी) असेल तर त्या महिन्यात गर्भाला त्रास, तसेच ज्या महिन्याचा स्वामी निपिडित/युध्दात पराजित झालेला असेल तर त्या महिन्यात गर्भपात होतो. ज्या महिन्याचा स्वामी निर्मळ असेल त्या त्या महिन्यात गर्भ सुदृढ आहे असे समजावे. अर्थात मासाधीपती स्वामी नुसार गर्भाची स्थीती समजावी.

## गर्भसंभावनेचे ज्ञान

**बलयुक्तौ स्वगृहांशेष्वर्कसितावुपचयर्क्षगौ पुंसाम्।**
**स्त्रीणां वा कुजचन्द्रौ यदा तदा गर्भसम्भवो भवति।। ८।।**



**भट्टोत्पल :** बलयुक्तावितौ गर्भसम्भवासम्भवज्ञानमाह–यत्र कुत्र राशौ स्वराश्यंश कस्थावादित्यशुक्रौ बलयुक्तौ पुरूषस्य जन्मलग्नाज्जन्मराशेर्वा उपचयस्थाने भवतो यदा

तदा गर्भस्य सम्भवो वक्तव्यः। यदा अङ्गारकचन्द्रौ स्वराशिनवांशस्थौ भवतः स्त्रियश्चोपचयर्क्षगौ भवतो तदाऽपि गर्भसम्भवो भवति।। ८।।

**सती** – स्वराशि व स्वनवमांशात स्थित बलवान सूर्य आणि शुक्र जर पुरूषाच्या जन्म लग्नापासून किंवा जन्म राशीत, उपचय स्थानात (३, ६, १०, ११) मधे असेल किंवा (२) स्वराशि व स्वनवमांशात स्थीत बलवान चंद्र आणि मंगळ जर स्त्रीच्या जन्म लग्न किंवा जन्म चंद्र राशि पासून उपचय स्थानात (३, ६, १०, ११) असेल तर गर्भधारणा झाली समजावे. कारण अशा योगात गर्भधारणा होत असते.

*लग्ने बलिनी गुरौ वा नवपञ्चमसंस्थितेऽपि वा भवति।*
*योगा हतबीजानामफला वीणेव बधिराणाम्।। ९।।*

**भट्टोत्पल** : लग्ने बलिनीती। गर्भसम्भवयोगनिष्फलत्वं चाह–अथवा यदा लग्नपचमनवमानामेकस्मिन् स्थाने बलवान् बृहस्पतिर्भवति तदा गर्भसम्भवो वाच्यः। अथवाऽऽदित्यचन्द्रशुक्राङ्गारकाः सर्वे एव यदि स्वभागगाः स्त्रीपुंसोश्चोपचयस्था भवन्ति तदाऽपि गर्भसम्भवो भवति। यदुक्तं च वराहेन–रवीन्दुशुक्राव–निजैरिती। हतबीजानां मध्ये स्त्रीपुंसोः अन्यतमो हतबीजो भवति तस्मिन् हतबीजे इमे योगा निष्फला ज्ञेयाः। किमिवेत्याह–यथा वीणा बधिराणां वाद्यमाना श्रुतिसुखं न जनयति तथैतेऽपि योगाः। षण्ढानां संयुक्तानामपि गर्भसम्भवं न कुर्वन्ति।। ९।।

**सती** : बलवान गुरू लग्नात असता किंवा नवव्या, पांचव्या घरात असेल तर गर्भसंभावना होते. हा योग नपुसक लोकांसाठी काही कामाचा नाही. ज्याप्रमाणे वीणेतून निघालेला ध्वनी बहीऱ्याच्या काही कामाचे नसतात.

**गर्भातील बाळाचे मुलगा/मुलगी बद्दल ज्ञान**

*विषमर्क्षे विषमांशे संस्थिताश्च गुरूशशाङ्कलग्नार्काः।*
*पुञ्जन्मकराः समभेषु योषितां समनवांशगताः।। १०।।*

**भट्टोत्पल** : विषमर्क्ष इति। अथ गर्भसम्भवज्ञानानन्तरं गर्भज्ञानमाह–विषमस्थैर्मेष मिथुनादिस्थैर्यथासम्भवं सर्वैरैव बृहस्पतिचन्द्रार्कलग्नैः न केवलं, यावत् प्रदर्शितराशिसम्बन्धि नवांशकगतैर्ग्रहैर्गर्भे पुरूषसम्भवो वक्तव्यः। समभेष्विति। एत्ते बृहस्पतिचन्द्रलग्नार्का यदि समराशिषु वृषादिषु स्थितास्तदा स्त्रीजन्म कथनीयम्। न केवलं यावत्तत्सम्बन्धिनवांशकगता यदा भवेयुः तदाऽपि योषितां जन्मकरा भवन्ति। यथाऽभिहिता उभयविकल्पे यत्रैव बहवः स्थितास्तल्लिङ्गासम्भव निर्देशः साम्ये च बलाधिकवशात्। उक्तच बृहज्जातके– 'ओजर्क्षे

पुरूषांशकेषु बलिभिर्लग्नार्कगुर्विन्दुभिः। पुंजन्म प्रवदेत् समांशसहितैर्युग्मेषु तैर्योषितः'।। इति।। १०।।

**सती –** गर्भाधान लग्नात किंवा प्रश्न लग्नात जर गुरू, चंद्र लग्न आणि सूर्य हे विषम राशित किंवा विषम राशिच्या नवमांशात असतील तर पुरूष जन्मकारक स्थिति असते अशावेळी मुलगा होतो. आणि गुरू, चंद्र लग्न आणि सूर्य गर्भ लग्न किंवा प्रश्न लग्नात सम राशीत आणि सम राशीच्या नवमांशात असतील तर स्त्री जन्म कारक स्थिति असते अशावेळी मुलगी होते.

**पुरूष, स्त्री आणि यमल जन्म योग**

*बलिनौ विषमऽर्कगुरू नरं स्त्रियं सभगृहे कुजेन्दुसिताः।*
*यमलं द्विशरीरांशेष्विन्दुजदृष्टाः स्वपक्षसमम्।। ११।।*

**भट्टोत्पल :** बलिन इति। पुनरपि गर्भलिङ्गाज्ञानं यमलसम्भवज्ञानं चाह–विषमराशि गतौ यथासम्भवमादित्यबृहस्पति बलयुक्तौ भवतस्तदा नरो गर्भस्थो वाच्यः। समराशिष्वेवं यथासम्भवं सर्वे एव कुजचन्द्रशुक्रा बलिनो यदा भवन्ति तदा स्त्रीगर्भश्चेति वक्तव्यम्। यमलौ द्विशरीरांशेष्विति। द्विशरीरराशिनवांशकस्था आदित्यगुरूकुजेन्दुसिता बुधदृष्टाः यमलौ स्वपक्षे कुर्वन्ति। एतदुक्तं भवति चत्वारो द्विःस्वभावा मिथुनमीनकन्याधन्विनः। तत्र मिथुनधन्विनौ पुरूषांशकौ कन्यामीनौ स्त्र्यंशकौ तेन यथासम्भवं मिथुनधन्वंशगतावादित्यगुरू यदि बुधेन यत्र तत्रावस्थितेन दृश्यन्ते तदा यमलौ द्वौ पुरूषौ वाच्यौ। एवं यथासम्भवं कन्यामीनांशगताः कुजेन्दुसिता यत्र तत्रावस्थितेन बुधेन दृश्यन्ते तदा यमले द्वे कन्ये वाच्ये। अथ दर्शितग्रहपञ्चकमपि द्विःस्वभावराशिसंस्थं यथा बुधः पश्यति तदा एकः पुरूषो वक्तव्य एका च कन्या वक्तव्या।। ११।।

**सती –** जर विषम राशित (१, ३, ५, ७, ९, ११) किंवा विषम राशिच्या नवमांशात जर बलवान सूर्य आणि गुरू असेल तर मुलगा जन्मेल असे सांगावे आणि जर सम राशि किंवा सम नवमांशात (२, ४, ६, ८, १०, १२) बलवान मंगळ, चंद्र आणि शुक्र स्थीत असतील जर स्त्रीचा जन्मकारक योग असतो. मुलगी होईल असे सांगावे. वरील ग्रह जर द्विस्वभाव राशि किंवा द्विस्वभाव नवमांशात असतील आणि बुधाने दृष्ट असेल तर जुळे मुलं होतील असे सांगावे



मिथुन, कन्या, धनु आणि मीन या चारही व्दिस्वभाव राशि आहेत. यामधे मिथुन व धनु ह्या पुरूष राशि आहेत. तर कन्या व मीन ह्या स्त्री राशि आहेत. सांगायचे हे कि,

जर सूर्य आणि गुरू हे विषम राशित असून व्दिस्वभाव (मिथुन,धनु) नवमांशात राहून त्यावर बुधाची दृष्टी असेल तर जुळव्यात दोन मुले होतील असे सांगावे. याचप्रमाणे चंद्र, मंगल आणि शुक्र बलवान असून सम राशित असतील आणि व्दिस्वभाव सम नवमांशात (कन्या,मीन) तसेच बुधाने दृष्ट असेल तर जुळव्यात दोन मुली जन्मतील असे सांगावे. मात्र कोणताही एक पुरूष व्दिस्वभाव नवमांशात (मिथून, धनू) आणि एक स्त्री व्दिस्वभाव नवमांशात (कन्या, मीन) आहे अशी स्थिति असेल तर मिश्र फळ मिळेल म्हणजे जुळव्यात एक मुलगाा आणि एक मुलगी होईल असे समजावे.

**पुरूष, स्त्री और यमल जन्म योग में विशेष**

*लग्नाद्विषमोपगतः शनैश्चरः पुत्रजन्मदो भवति।*
*निगदितयोगबलाबलमवलोक्य विनिश्चयो वाच्यः।। १२।।*

**भट्टोत्पल :** लग्नाद्विषमेति। पुञ्जन्मयोगान्तरं स्त्रीपुरूषयोगयोर्द्वयोरपि सम्भवो सति निश्चयो वाच्य इत्याह- लग्नं भुक्त्वा विषमर्क्षगः सौरिः लग्नात् तृतीयपचमसप्तमनवमैकादशस्थानानामन्यतमस्थानस्थो यदा भवति तदा पुत्रजन्मदो भवति। एतान्योगान्दृष्ट्वा जन्मसमये प्रश्नकाले वा नरोत्पत्तिर्विज्ञेया। निगदितेत्यादि-यत्र पुरूषयोगसम्भः स्त्रीजन्मसम्भवश्च तत्र यो योगो बलवद्ग्रहाभिनिवृत्तस्तद्वशादेकतमस्य सम्भवो वक्तव्यः।। १२।।

**सती -** लग्नापासून (म्हणजे गर्भधान लग्न किंवा प्रश्न लग्नापासून) विषम स्थानात (१,३, ५, ७, ९, ११) शनि असेल तर पुत्र जन्मकारक असतो.

अशाप्रकारे सांगीतलेल्या योगांचे बलाबला पाहून जो योग बलवान असेल त्यानुसार पुरूष किंवा स्त्री असा जन्मकारक योग समजावा.

या अध्यायातील श्लोक ३ व ४ चे भट्टात्पल उपलब्ध नसल्याने लिहीले नाही.

**अध्याय ५वा संपला.**

* * * * * * * *

(६)

अध्याय सहावा

# सूतिकाध्याय

## ग्रहांचे सत्व, रजो आणि तमोगुण

*गुरूशशिरवयः सत्त्वं रजः सितज्ञौतमोऽर्कसुतभौमौ।*
*एतेऽन्तरात्मनि स्वां प्रकृतिं जन्ताः प्रयच्छन्ति।। १।।*

**भट्टोत्पल :** गुरूशशिती। ग्रहांणा सात्त्विकादिविभागमाह–बृहस्पतिचन्द्रादित्याः सात्त्विकाः, बुधशुक्रौ राजसौ शनैश्चराङ्गारकौ, तामसौ एते ग्रहाः जन्तोः स्वामात्मीयां प्रकृतिं प्रयच्छन्ति। पूर्वोक्तविधिना त्रिशांशे यस्य भास्करः तादृक् इति। ननु चन्द्रार्कयोः सात्त्विकत्वेन किं प्रयोजनमुच्यते तयोर्गुणमात्रमेव।। १।।

**ग्रहांचे सत्वगुण, रजोगुण आणि तमोगुण**

**सती –** १) गुरू,चंद्र,रवि – हे तिन्ही ग्रह सत्वगुणी आहेत.
२) शुक्र,बुध – हे ग्रह रजोगुणी आहेत
३) शनि,मंगळ – हे ग्रह तमोगुणी आहेत.
हे ग्रह प्राणीमात्राचा अंतकरणात आपल्या गुणानुसार सत्व, रजः, तमोगुण देतात.

## जातकाचे सत्वादी गुण, आकृती तसेच स्वरूप याचे ज्ञान

*सत्त्वं रजस्तमो वा त्रिंशांशे यस्य भास्करस्तादृक्।*
*बलिनः सदृशी मूर्तिर्बुध्वा वा जातिकुलदेशान्।। २।।*
*पूर्वविलग्ने यादृग् नव भागस्तादृशी भवति मूर्तिः।*
*यो वा ग्रहो बलिष्ठस्तत्काले तादृशी वाच्या।। ३।।*

**भट्टोत्पल :** सत्वमिती। अथ सूतिकाध्यायं व्याख्यास्यामस्तत्रादावेव जातस्य सात्त्विक राजस तामसत्वनिरूपणाय शरीराकारज्ञानमाह यस्य जन्मकाले भास्कर आदित्यः सात्त्विकत्रिंशांशे व्यवस्थितस्तदा सात्त्विको जात इति वक्तव्यम्। एवं राजसादौ। बलिनः

सदृशी मूर्तिरिती पुरूषस्य जन्मसमये यो ग्रहोऽतिबलवांस्तस्य सदृशी 'चतुरस्त्रो नात्युच्चः', इत्यादीप्रदर्शितमिती तस्य यथाविधमेव वक्तव्यं अथवा लग्ननवांशस्याधिपतेस्तुल्या मूर्तिर्वक्तव्या। उक्तं च–'लग्ननवांशपतुल्यतनुः स्याद्वीर्ययुतग्रहतुल्यतनुर्वेति बुध्वा वा जातिकुलदेशानिति पूर्वमूर्तिनिर्देशः। श्वपाकशबरनिषादा ज्ञातित एव कृष्णा भवन्ति। तेषामेव निर्देशः। कस्मिन् कुले कोऽसौ जातो गौराणां कृष्णानां वा देशं च बुध्वा मूर्तिनिर्देशः। कस्मिन् देशे कोऽयं जात इति यथा कर्णाटकाः सर्वे एव कृष्णा भवन्ति। वैदेहाः सर्वे एव श्यामाः काश्मीराः सर्वे गौरा एव।। २–३।।

**सती –** जातकाच्या जन्माच्यावेळी ज्या ग्रहाच्या त्रिशांशात सूर्य असेल त्याच ग्रहाच्या सत्वादि गुणानुसार जातकाचे सत्वगुण, रजोगुण किंवा तमोगुण समजावे. जसे ज्याच्या जन्मवेळी सूर्य सात्विक त्रिंशाशांत असेल तर जातक सात्विक होतो. अशाप्रकारे राजसी त्रिंशाशात किंवा तामशी त्रिंशाशात सूर्य असेल तर जातक राजसी किंवा तामसी स्वभावाचा होतो. जन्माच्या वेळी जो ग्रह जन्म लग्न चक्रात सर्वात बलवान असेल त्याच्या नुसारच जातकाची स्वरूप समजावे. जर एका पेक्षा जास्त ग्रह बलवान असतील तर त्यांच्या वर्णासमान  आकृती समजावी. किंवा लग्न नवमांशाचा स्वामीनुसार जातकाचे स्वरूप समजावे.

ज्या ग्रहाच्या नवमांश असेल त्याच ग्रहाच्या स्वरूपानुसार जातकाचे स्वरूप समजावे. किंवा जन्माच्या वेळी जो ग्रह बलवान असेल. त्या ग्रहासारखे स्वरूप समजावे. फलादेशाचे वेळी वेळ आणि जन्मस्थानाचे ध्यान अवश्य ठेवावे. तसेच त्यासोबतच जातकाची जात,वंश, देश हे लक्षात ठेवून जातकाच्या आकृति ईत्यादि बद्दल सांगावे.

**वडिलांच्या गैर हजेरीत जन्म**

*चन्द्रे लग्नमपश्यति मध्ये वा शुक्रसौम्ययोश्चन्द्रे।*
*जन्म परोक्षस्य पितुर्यमोदये वा कुजे वाऽस्ते।। ४।।*

**भट्टोत्पल :** चन्द्र इति। जातस्य पितुः सन्निधानमसमन्निधानं चाह–यस्य जन्मलग्नं चन्द्रो न पश्यति तस्य पितुः परोक्षे जन्म वक्तव्यं, शुक्रसौम्ययोर्मध्यगते चन्द्रे सति पितुः परोक्षे जन्म वक्तव्यम्। यस्त जन्मलग्नस्थः शनैश्चरो भवति तस्य पितुः परोक्षे जन्म वक्तव्यम्। यस्य लग्नाद् भौमः सप्तमो भवति तस्यापि पितुः परोक्षे जन्म वक्तव्यम्।। ४।।



**सती –** जातकाच्या जन्माविषयी ज्ञान.

खालील योगात पित्याच्या गैरहजेरीत मुलाचा जन्म होतो असे समजावे.
१) चंद्राची लग्नावर दृष्टी नसेल तर
२) चंद्र हा शुक्र आणि बुध यांच्यामध्ये असेल तेंव्हा
३) शनि लग्नात असतांना.
४) लग्नापासून सातव्या स्थानी मंगळ असेल तर

अशाप्रकारे या चार योगापैकि कोणताही एक योग असेल तर जातकाचा जन्म वडिलाच्या गैरहजेरीत झाला असे समजावे.

## दुसऱ्यापासून जन्म होण्याचे ज्ञान

*पापयुतोऽर्कः सेन्दुः पश्यति होरां न चन्द्रमपि जीवः।*
*पश्यति सार्क नेन्दुं यदि जीवो वा परैर्जातः।। ५।।*

**भट्टोत्पल :** पापयुतोऽर्क इति। अथ परजातस्य ज्ञानमाह-चन्द्रार्कावेकराशिगतौ तत्र पापग्रहोऽङ्गारकः शनैश्चरो वा भवति तदा परजातो वक्तव्यः। अथवा चन्द्रे लग्नं बृहस्पतिर्नोभयं पश्यति न दृश्यते तदाऽपि परजातो वक्तव्यंः। अथवाऽर्कचन्द्रावेकराशिगतौ जीवो न पश्यति तदाऽपि परजातो वक्तव्यंः।।। ५।।

**सती -** जन्माच्या वेळी सूर्य आणि चंद्र हे पापग्रहाने (शनि, मंगळाने) युक्त असून एका राशित असतील तर त्या जातकाचा जन्म पर पुरूषापासून होतो. किंवा जन्माच्या वेळी लग्न किंवा चंद्र यांच्यावर गुरूची दृष्टी नसेल तर तो जातक परक्या पासून जन्मतो. सूर्ययुक्त चंद्रावर गुरूची दृष्टी नसेल तर जातकाचा जन्म दुसऱ्या माणसापासून होतो. परजात म्हणजे दुसऱ्या माणसापासून होतो.

## प्रसुति ग्रहाचे दार आणि दिव्याचे ज्ञान

*द्वारं वास्तुनि केन्द्रोपगाद् ग्रहादसति वा विलग्नर्क्षात्।*
*दीपोऽर्कादुदयाद् वर्तिरिन्दुतः स्नेहनिर्देशः।। ६।।*

**भट्टोत्पल :** द्वारमिती। सूतिकागृहज्ञानं दीपज्ञानं चाह-'प्राच्यादीक्षाः', इत्यादीना या दिक् यस्य ग्रहस्योक्ता तस्यिन् ग्रहे केन्द्रोपगते तद्दिगभिमुखद्वारं सूतिकागृहं वक्तव्यम्। बहुषु केन्द्रगतेषु यो बलवांस्तद्दिगभिमुखं वाच्यम्। अन्ये लग्नद्वादशांशराशिदिगभिमुखं वर्णयन्ति। अन्ये तदधिपदिगभिमुखं कथयन्ति। असति वा विलग्नर्क्षादिति। शून्येषु केन्द्रषु लग्नराशेर्या

दिगभिहिता तद्दिगभिमुखं द्वारं सूतिकागृहं वक्तव्यम्ः। दीपोऽ र्कादिति-चरराशिव्यवस्थितऽर्के सञ्चार्यमाणो दीप आदेश्यः। स्थिरराशिस्थेऽर्के एकदेशस्थः द्विस्वभावराशिस्थे चालितः

स्थापितश्चेति। उदयाद्वर्तिः आदेश्या। लग्नारम्भक्षणे क्षिप्तैका वर्तिः। लग्नावसाने सर्वा दग्धा। अन्तरालेऽनुपाततो वर्तिदग्धप्रमाणं वक्तव्यम्। इन्दुतः स्नेहनिर्देश इति। यत्र राशौ चन्द्रमा व्यवस्थितः तत्र यदि प्रारम्भ एव स्थितो भवति तदा स्नेहभाजनं पूर्ण वक्तव्यम। यद्यन्तिमभागे तदा दीपभाजनं स्नेहान्तं वक्तव्यं मध्येऽर्धम्, अन्यत्रानुपातः।। ६।।

**सती –** जन्म लग्न किंवा प्रश्नलग्नात केंद्रस्थानी (१,४,७,१०) जो ग्रह असेल त्या ग्रहाच्या दिशेला प्रसुति ग्रहाचे दरवाजा असेल असे समजावे. जर एकापेक्षा अनेक ग्रह केंद्रात असतील तर त्यापैकी जो ग्रह बलवान असेल त्या ग्रहाच्या दिशेला प्रसुति ग्रहाचा दरवाजा असतो. जर अनेक ग्रह बलवान असतील. त्या बलवान ग्रहांच्या संखेइतके प्रसुति गृहाला दरवाजे आहेत असे समजावे. जर केंद्रात एकही ग्रह नसेल तर लग्न राशिची दिशा समजावी. काही अचार्यांच्यामते लग्नाच्या व्दादशांसानुसार दिशा ओळखावी. काही आचार्य त्या व्दादशांश राशिच्या स्वामीची दिशा सांगतात. सूर्याच्या स्थितीवरून दिव्याचे ज्ञान होते. जर लग्नाच्या जवळच्या भावात (१२, १, २) सूर्य असेल तर प्रसुती स्थानाच्या पूर्वेस दिवा असतो. जर सातव्या घराच्या जवळचा (६, ७, ८) भावात सूर्य असेल तर पश्चिम दिशेला दिवा असतो. जर चौथ्या घराजवळ (३, ४, ५) सूर्य असेल तर उत्तर दिशेला दिवा असतो. आणि जर दहाव्या घराजवळ (९, १०, ११) सूर्य असेल तर दक्षिण दिशेला दिवा आहे. असे समजावे. जर सूर्य चर राशित असेल तर चालता फिरत्या दिव्याचा प्रकाश असतो. सूर्य स्थिर राशित असेल तर स्थिर (एका ठिकाणी ठेवलेला) दिव्याचा प्रकाश असतो. व्दिस्वभाव राशित सूर्य असेल तर स्थिर तसेच फिरत्या दिव्याचा प्रकाश असतो. सूर्य, राशि आणि घरावरून दिव्याच्या दिशेचे ज्ञान होते. लग्नावरून दिव्याच्या वातीच्या स्थितीची कल्पना येते.

जन्म लग्नाच्या अंशानुसार दिव्यात वात आहे असे समजावे. जसे लग्न राशिच्या सुरवातीच्या अंशात जन्म होत असेल तर पूर्ण दिव्याचा प्रकाश समजावा (नुकताच दिवा लावलेला समजावा) जर लग्न राशीच्या शेवटच्या अंशांत जन्म होत असेल तर विझायला आलेला दिवा समजावा. अशाप्रकारे चंद्राच्या गत अंशानुसार दिव्यात तेल किती याचे ज्ञान समजावे. म्हणजे सुरवातीचा अंशात असता तेल भरपूर आणि शेवटच्या अंशात चंद्र असता तेल संपत आले आहे. असे समजावे.

**दिशेचे ज्ञान :** लग्नभाव/पहीले घर – पूर्व दिशा, दहावा घर, दक्षिण दिशा, सातवे घर पश्चिम दिशा, चौथे घर उत्तर. तसेच ईतर भावावरून ईतर दिशा जाणाव्या. जसे ११–१२ या भावावरून पूर्व दक्षिण म्हणजे आग्नेय दिशा. ८–९ भावावरून दक्षिण पश्चिम दिशा

म्हणजे नैऋत्य दिशा, ५-६ घरावरून पश्चिम उत्तर म्हणजे वायव्य दिशा, आणि २-३ घरावरून उत्तर पूर्व म्हणजे ईशान्य दिशा समजावी.

## प्रसुति ग्रह आणि आजू बाजूच्या घरांचे स्वरूप

***अदृढं नवमथ दग्धं चित्रं सुदृढं मनोरमं जीर्णम्।***
***गृहमर्कादिकवीर्यात् प्रतिभवनं सन्निकृष्टैश्च।। ७।।***

**भट्टोत्पल :** अदृढमिती। सूतिकागृहस्वरूपज्ञानमाह-अर्काद्यैर्ग्रहैर्वीर्याद् बलाधिक्यात् सूतिकागृहं वाच्यम्। तत्र सर्वग्रहेभ्याऽर्के बलवति सति सूतिकागृहमदृढं वाच्यम्। चन्द्रे बलवति नवं, भौमे दग्धं, बुधे चित्रं, बृहस्पतावत्यन्तदृढं, शुक्रे मनोरमं, शनैश्चरे जीर्णम्। प्रतिभवनं सन्निकृष्टैश्चेति-सन्निकृष्टैः प्रतिभवनं वक्तव्यम्। गृहदातृग्रहस्य पुरतः पश्चाद्वा ये ग्रहाः स्थितास्तेनैव क्रमेण सूतिकागृहात् प्रतिभवनं वाच्यम्।।। ७।।

**सती -** जन्माचे वेळी सर्वात बलवान **सुर्य केंद्रात** असेल तर प्रसुतिघर हे अगदी कमजोर, जीर्ण आहे. असे समजावे.
जन्माचे वेळी बलवान **चंद्र केंद्रात** असेल तर प्रसुति ग्रह हे नवीन आहे. असे समजावे.
जन्माचे वेळी बलवान **मंगळ केंद्रात** असेल तर ते प्रसुति घर जळालेले असेल.
जन्माचे वेळी बलवान **बुध केंद्रात** असल्यास अनेक रंगांनी युक्त असे प्रसुति घर असते.
जन्माचे वेळी बलवान **गुरू केंद्रात** असता मजबूत प्रसुति घर आणि
जन्माचे वेळी बलवान **शुक्र केंद्रात** असता प्रसुति घर अतिशय सुंदर रंगीबेरंगी असते.
जन्माचे वेळी मात्र बलवान **शनि केंद्रात** असता. प्रसुति घर जूने आणि जीर्ण झालेले आहे. असे समजावे.

## प्रसुति घराच्या मजल्याचे ज्ञान

**गुरूरूच्चो दशमस्थो द्वित्रिचतुर्भूमिकं करोति गृहम्।**
**धनुषि सबलस्त्रिशालं द्विशालमन्येषुयमलेषु।। ८।।**

**भट्टोत्पल :** गुरूरूच्च इति-गृहभूमिकाशालाज्ञानमाह-बृहस्पतिरूच्चस्थो लग्नाद्यदि दशमस्थाने भवति तदा द्वित्रिचतुर्भूमिकं गृहं वक्तव्यम्। कथमुच्यते-यदा परमोच्चभागान् पञ्चतिक्रम्य स्थितो भवति तदा द्विभूमिकं करोती गृहम्। यदा भागः पञ्चमादर्वाक् भवति तदा त्रिभूमिकं करोति। यदा पञ्चभागे भवति तदा चतुर्भूमिकं करोती। धनुषीत्यादि-धनुर्धरस्थे जीवे बलोपेते तदा त्रिशालं वक्तव्यम्। द्विशालमन्येषु यमलेषु। यमलर्क्षेषु मिथुनकन्यामीनेष्वेवस्थिते जीवे बलोपेते द्विशालं गृहं वक्तव्यम।। ८।।

सती – जर उच्चराशित गुरू म्हणजे कर्केचा गुरू दहाव्या घरात असेल तर प्रसुति घर हे २–३–४ मजल्यावर आहे असे समजावे अर्थात कर्क राशिच्या ५° अंशात गुरू असेल तर ४था मजला, ५° अंशापेक्षा कमी असता ३ रा मजला आणि ५ अंशापेक्षा जास्त अंशात गुरू असेल तर प्रसुतिघर हे दूसऱ्या मजल्यावर असते असे समजावे. बलवान गुरू जन्माचेवेळी धनु राशित असता प्रसुति घर तीन मजला आणि मिथुन, कन्या किंवा मीन राशित असेल तर दोन मजली घर समजावे.

**बाळांतीणीच्या पलंगाचे स्वरूप**

*षट्त्रिनवान्त्याः पादाःखट्वाङ्गान्यन्तरालभवनानि।*
*विनतत्वं यमलर्क्षैः क्रूरैस्तत्तुल्य उपघातः।। ९।।*

**भट्टोत्पल** : षट्त्रिनवेति। खट्वाङ्गास्वरूपज्ञानमाह–लग्नात्षट्तृतीयनवमद्वादशराशयः खट्वायाः पादा वक्तव्याः। एतदुक्तं भवति। येन लग्नेन प्रसवस्तदुक्तायां दिशि शय्यायाः शिरः। लग्नात् द्वादशतृतीयौ पूर्वपादौ। तत्रापि तृतीयो दक्षिणः द्वादशो वामः। षट्नवमौ पश्चिमौ तत्रापि षष्ठो दक्षिणः नवमो वामः। खट्वाङ्गन्यन्तरालभवनानि। लग्नं द्वितीयं शीर्षे, चतुर्थ पञ्चम दक्षिणङ्गे, सप्ताष्टौ पादभागे, दशैकादशौ वामाङ्गे। दस्य प्रयोजनं विनतत्वमित्यादि। यस्मिन् खट्वाङ्गे यमलौ द्विःस्वभावराशिर्भवति तस्मिन् भागे विनतत्वं नम्रत्वं वाच्यम्। यस्मिन् खट्वाङ्गे क्रूरग्रहो भवति तस्मिन्नङ्गे ग्रहतुल्य उपघातो वक्तव्यः। यत्रार्को भवति तदङ्गमदृढं यत्र भौमस्तद्दग्धं यत्र शनैश्चरस्तज्जीर्णमिती। अत्रापि यमलर्क्षे सौम्यग्रहः स्वामियुक्तोऽप्यविनतत्वं पापग्रहोऽपि स्वोच्चत्रिकोणस्थो मित्रगृहस्थे नोपघातः।।९।।

**सती** – जन्मवेळीच्या लग्नापासून ३, ६, ९, १२ हया भावातील राशि यावरून बाळांतीणीच्या पलंगाचे चार पाय समजावे. ज्या लग्नात जन्म हातो त्या लग्न राशिची दिशा म्हणजे पलंगाचा डोक्याकडील भाग समजावा. अर्थात तिसऱ्या भावातील राशि उजवा पाय तर १२ व्या भावातील राशि डावा पाय समजावा. ६ व्या घरातील राशि पलंगाचा खालचा उजवा पाय आणि ९ व्या भावातील राशि, पलंगाचा डावा पाय समजावे. आणि राहिलेल्या राशि ह्या पलंगाचे इतर अंग समजावे. अर्थात लग्न द्वितीय डोक्याकडे, ४–५ राशि उजवा भाग, ७–८ ची राशि पायाकडील भाग आणि दशम–एकादश राशि हे डावा भाग समजावे. ज्या भागात द्विस्वभाव राशि असेल तो भाग झुकलेला तसेच ज्या भावात पापग्रह असतील तो भाव कमजोर, जळालेला समजावा.




नाळवेष्टीत जन्म

### नाळवेष्टीत जन्माचे ज्ञान

*छागे सिंहे वृषे लग्ने तत्स्थे सौरेऽथवा कुजे।*
*राश्यंशसद्दशे गात्रे जायते नालवेष्टितः।। १०।।*

**सती –** जर जन्म लग्न मेष, वृषभ किंवा सिंह चे असेल, आणि लग्नात शनि किंवा मंगळ असेल जर लग्नाच्या नवमांश राशी च्या अनुसार काल पुरूषाचा जो भाग असेल, जातकाच्या त्या भागात नाळ गुंढाळलेली असते.

### बाळांतीणीचे शरीर आणि घरातील द्रव्याचे ज्ञान

*ज्ञेयानि ताम्रमणिहेमशुक्तिरौप्याणि मौक्तिकं लोहम्।*
*अर्काद्यैर्बलवद्भिः स्वस्थाने हेम जीवेऽपि।। ११।।*

**भट्टोत्पल :** ज्ञेयानीति। सूतिकागृहे द्रव्यज्ञानार्थमाह–सर्वग्रहेभ्योऽर्के बलवति सूतिकागृहे ताम्रं वक्तव्यम्। चन्द्रे बलवति मणयः, भौमे सुवर्ण, बुधे शुक्तिरिति कांस्यादि, बृहस्पतौ रौप्यं, शुक्रे मुक्ताफलानि, शनैश्चरे लोहम्। स्वस्थाने हेम जीवेऽपि इति। धनुर्धरमीनयोरन्यतरराशिव्यवस्थिते जीवे सर्वग्रहेभ्यो बलवति रौप्यं न वक्तव्यं सुवर्ण वक्तव्यमिती।। ११।।

**बाळांतीणीचे शरीर आणि घरातील द्रव्याचे ज्ञान**

**सती –** जन्म लग्नाच्या आधारे बलवान ग्रहानुसार बाळांतीनीजवळ कोणत्या धातुचे दागीने आहेत ते सांगावे.

जन्माचे वेळी जर



१) सुर्य बलवान असेल तर तांब्याचे

२) चंद्र बलवान असेल तर मणि

३) मंगळ बलवान असेल तर सोने
४) बुध बलवान असेल तर कासे-पितळ
५) गुरू बलवान असेल तर चांदी
६) शुक्र बलवान असेल तर मोती
७) शनि बलवान असेल तर लोखंड

गुरू स्वघरात धनु किंवा मीन राशिचा असेल तर चांदीच्या ऐवजी सोने समजावे. वरीलप्रमाणे प्रसुतिघरात आणि बांळांतीणीच्या अंगावर दागीने घातले आहेत असे समजावे जर एकापेक्षा जास्त ग्रह बलवान असतील तर ताम्र, मणि, सोने, इत्यादी आणखी दागीने समजावे जर गुरू धनु किंवा मीन राशिचा असेल तर सोने सुध्दा समजावे. यावरून आपल्या स्वविवेकाने निर्णय घ्यावा.

**जन्माचे वेळी प्रसुतिघरात उपप्रसुति घराचे ज्ञान**

*शशिलग्नान्तरसंस्थग्रहतुल्याश्चोपसूतिका ज्ञेयाः।*
*उदगर्धेऽभ्यन्तरगा बाह्याश्चक्रस्य दृश्येऽर्धे।। १२।।*

**भट्टोत्पल :** शशिलग्नेति। उपसूतिकाज्ञानमाह-लग्नादारभ्य चन्द्रमा यस्मिन् राशौ व्यवस्थितस्तदन्तरे यावन्तो ग्रहा व्यवस्थितास्तावत्संख्या उपसूतिका वक्तव्यां:। वक्ष्यमाणायुर्दायाध्यायात् तासां द्वित्रिगुणत्वादि वक्तव्यम्। वक्ष्यमाणवर्गोत्तम स्वराशिद्रेष्काणनवांशे द्विगुणं वक्रोच्चयोस्त्रिगुणितं द्वित्रिगुणत्वे सकृत् त्रिगुणमिती सूतिकानामुपसूतिकानां ग्रहरूपजातिवयोवर्णरूपादयो वक्तव्याः। उदगर्ध इत्यादी-उत्तरदिग्व्यवस्थितमुदगर्धम् अदृश्यमित्यर्थः। तस्मिन्नदृश्येऽर्थे लग्न चन्द्रान्तरगतानां मध्ये यावन्तो ग्रहा व्यवस्थितास्तावन्त्य उपसूतिका आगारे एव वक्तव्याः। चन्द्रलग्नान्तरगतानां ग्रहाणां मध्ये यावन्तो ग्रहा दृश्ये चक्रस्यार्द्धे व्यवस्थितास्तावन्त्य उपसूतिकाः सूतिकागाराद्बहिर्वक्तव्याः।। १२।।

**सती -** जातकाचे जन्म लग्न आणि चंद्र यांच्या मध्ये जेवढे ग्रह असतील तेवढे उपप्रसुति घर समजावे. त्या उपप्रसुति घरात सुध्दा जेवढे ग्रह अदृश्य चक्रार्धात (म्हणजे लग्नाच्या भोग्यांशा पासून सुरू करून सप्तमाच्या भक्तांशापर्यत राशी) असतील तेवढे घराच्या आत आणि जेवढे ग्रह दृश्य चक्रार्धात (म्हणजे सप्तमाच्या भोग्यांशापासून सुरू करून लग्नाच्या भुक्तांशा पर्यत ६ राशि) असतील तेवढे घराच्या बाहेर राहतील असे उपप्रसुति घर समजावे. याचा सुक्ष्म विचार आयुर्दाथ अध्यायात केला आहे.

**अध्याय ६ वा संपला.**



या अध्यायात श्लोक १० ची संस्कृत भट्टोत्पल टीका उपलब्ध नाही.

* * * * * * * *

(७)

अध्याय सातवा

# अरिष्टाध्याय

## बाल संकट विचार

*षष्ठेऽष्टमेऽपि चन्द्रः सद्यो मरणाय पापसन्दृष्टः।*
*अष्टाभिः शुभदृष्टो वर्षैर्मिश्रैस्तदर्धेन।। १।।*

**भट्टोत्पल :** षष्ठेऽष्टमेऽपीती। अथारिष्टाध्यायं व्याख्यास्यामः। तत्रारिष्टयोगमाह-यस्य जन्मलग्नात् षष्ठस्थाने यदि चन्द्रमा भवति अथवाऽष्टमे। सौम्यग्रहैरदृश्यमानः पापग्रहैर्दृश्यते तदा जातस्य सद्यो मरणं वक्तव्यम्। अथवा षष्ठाष्टमे चन्द्रमाः पापग्रहेण न दृश्यते सौम्येन दृश्यते तदा जातस्य वर्षाष्टमे मरणं वक्तव्यम्। अथवा षष्ठाष्टमे चन्द्रमाः सौम्येन दृश्यते पापेन च दृश्यते तदा जातस्य वर्षचतुष्टयेन मरणं वक्तव्यम्। अथ षष्ठाष्टमगश्चन्द्रमाः न कश्चिद् दृश्यते तदा योग एव न भवति।। १।।

**सती -** जर जन्मलग्नापासून ६/८ व्या स्थानात (शत्रु स्थान आणि मृत्यु स्थान) चंद्र असेल व त्यावर पापग्रहाची दृष्टी असेल आणि शुभ ग्रहाची दृष्टी नसेल तर ताबडतोब बालकाचा मृत्यु होतो. परंतू जर ६ किंवा ८ व्या घरातील चंद्रावर शुभ ग्रहाची दृष्टी असेल तर आठ वर्षात बालकाचा मृत्यु होतो. मात्र शुभ ग्रह आणि पापग्रह दोघांची चंद्रावर दृष्टी असेल तर ४ वर्षात मरण होते.

- जर चंद्रावर कोणत्याही शुभ किंवा अशुभ ग्रहाची दृष्टी नसेल तर मृत्युभय राहत नाही. तसा अरिष्ट योग होत नाही.

*शशिवत्सौम्याः पापैर्वक्रिभिरवलोकिता न शुभदृष्टाः।*
*मासेन मरणदाः स्युः पापजितो लग्नपश्चास्ते।। २।।*

**भट्टोत्पल :** शशिवत्सौम्या इति। अरिष्टान्तरमाह-शशिना तुल्यः शशिवत्सौम्या एतदुक्तं भवति लग्नात् षष्ठे स्थाने अष्टमेऽपि वा कश्चित् सौम्यग्रहो भवति स च पापग्रहेण वक्रगतेन दृश्यते वक्रग्रहण[illegible] दृश्यते न चाप्येकेन सौम्यग्रहेण दृश्यते तदा जातस्य मासेन मरणं वक्तव्यम्। पापजितो लग्नपश्चास्त इति यस्य जन्मलग्नाधिपतिः पापसमागतो पापग्रहगेहे दृश्यते वा जिताः स लग्नात् सप्तमे यदि भवति

तदा मासेन मरणं वक्तव्यम्। जितलक्षणमुच्यते– 'दक्षिणदिक्स्थः पुरूषो वेपथुरप्राप्य सन्निवृत्तोऽणुः। अधिरूढोऽविकृतोऽनिःप्रभोऽविवर्णश्च यः स जितः' इति।। २।।

**सती –** चंद्रासारखा दूसरा तुल्यबल शुभग्रह जन्मलग्ना पासून ६/८ स्थानी असून त्यावर वक्री पापग्रहाची दृष्टी असेल आणि शुभग्रहांची दृष्टी नसेल तर बालकाचे मरण १ महिन्यात होते. तसेच पापग्रहाने पराजीत लग्रेश सातव्या स्थानी असेल तरी सुध्दा १ महिन्यात मरण होईल असे समजावे. कोणताही ग्रह वक्री असेल तर तो अती बलवान होत असतो. विजयी ग्रह त्याला म्हणतात जो दक्षिण दिशेला असतो, असे ग्रह युध्दात पाहण्यात येते.

*राश्यन्तस्थैः पापैः सन्ध्यायां हिममयूखहोरायाम्।*
*मृत्युः प्रत्येकस्थैः केन्द्रेषु शशाङ्कपापैश्च।। ३।।*

**भट्टोत्पल :** राश्यन्तस्थैरिती। अरिष्टान्तरमाह–यत्र यत्र राशौ पापग्रहो व्यवस्थितः स नवमे नवांशके स्थित एवं सर्वे ग्रहाः पापा यदा राश्यन्तस्था भवन्ति सन्ध्याकालश्च भवति तदा जातस्य मृत्युर्भवति। सन्ध्यालक्षणम्–

अर्धास्तसमयात् स्न्ध्या व्यक्तीभूता न तारका यावत्।
तेजः परिहानिमुखाद्भानोरर्धोदयं यावत् ।। इति।।

तस्मिन्सन्ध्याकाल इति प्रत्येकस्र्थैः केन्द्रेषु शशाङ्कपापश्चेति चतुर्षु केन्द्रेषु यथा तथाऽर्कचन्द्रभौमशनैश्चराणामन्यतमो भवति तदा जातस्य मृत्युर्वक्तव्यः।। ३।।

**सती –** सर्व पापग्रह राशीच्या शेवटच्या नवमांशात असून संध्या काळातील (सूर्योदय/सूर्यास्त) जन्म लग्न असून चंद्राचा होरा असता जातकाचा लवकर मृत्यु होतो. तसेच प्रत्येक केंद्रात (१, ४, ७, १०) चंद्र आणि पापग्रह (सूर्य,मंगल,शनि) असतील तर जातकाचा लवकर मृत्यु होतो. प्रत्येक केंद्र भावात ग्रह असून, पैकी कोणत्याही एक केंद्र भावात चंद्र असून ईतर ३ केंद्र स्थानी पाप ग्रह असतील तसेच सूर्योदय किंवा सूर्यास्ताच्या वेळेचा संधीकाल असेल तर जातकाचा मृत्य लवकर होतो.

*चक्रप्राक्पश्चार्द्धे पापशुभैः कीटभोदये मृत्युः।*
*निधनचतुष्टयगैर्वा क्रूरैः क्षीणे शशिन्युदये।। ४।।*

**भट्टोत्पल :** चक्रप्रागिती। अरिष्टयोगद्वयमाह–यावानंशो लग्नस्याऽभ्युदितस्तावत् संख्याकाद्दशम– राशेरंशादारभ्या यावच्चतुर्थस्यैव राशेस्तावत्संख्यैर्वांशस्तावच्चक्रस्य पूर्वार्द्धं द्वितीयमपरार्ध ज्ञेयम्। यत्र यदा चक्रस्य पूर्वार्द्धे सर्वे पापा व्यवस्थिता भवन्ति वृश्चिक–कीटयोरन्यतमं च लग्नं भवति तदा जातस्य मृत्युर्भवति। निधनचतुष्टयेत्यादि। अष्टमकेन्द्रगैर्यथा

तदा: पापैः क्षीणे चन्द्रमसि लग्ने सति यस्य जन्म भवति स म्रियते।। ४।।

**सती –** जन्माच्यावेळी राशि चक्राच्या पूर्वार्धात सर्व पापग्रह आणि उत्तरार्धात सर्व शुभग्रह असून, जन्म लग्न कर्क किंवा वृश्चिक राशिचे असेल तर जातकाचा लवकर मृत्यु होतो. तसेच सर्व पापग्रह ८, १, ४, ७, १० या स्थानी असून क्षीण चंद्र लग्नात असला तरीही जातकाचा मृत्यु होतो. चक्र म्हणजे ३६० अंश– १२ राशि अर्ध चक्र म्हणजे १८० अंश– ६ राशि. ईथे पुर्व चक्राध्र्द म्हणजे १० व्या भावापासून ते ४ थ्या भावापर्यंत आणि पश्चिम चक्राध्र्द म्हणजे ४ थ्या भावापासून ते १० व्या भावापर्यंत समजावे.

**दशम लग्न –** भोग्यांश आणि ११/१२/१/२/३ भाव आणि चतुर्थ लग्न भुक्तांश हे सर्व पूर्व कपालस्थ असल्याने पूर्वार्ध म्हणतात तसेच चतुर्थ लग्न भोग्यांश आणि ५/६/७/८/९ भाव, दशमाचे भुक्तांश आह. सर्व पश्चिम कपालस्थ असल्याने त्यांना पश्च्यार्ध असे म्हणतात.

*सप्ताष्टान्त्योदयगे शशिनि सपापे शुभेक्षणवियुक्ते।*
*न च कण्टकेऽस्ति कश्चिच्छुभस्तदा मृत्युरादेश्यः।। ५।।*

**भट्टोत्पल :** सप्ताष्टेति। अरिष्टान्तरमाह–सप्ताष्टद्वादशानामेकतमेऽपि स्थाने लग्ने वा चन्द्रः पापग्रहयुतो भवति। शुभग्रहेण बुधगुरूशुक्राणामेकतमेनापि न दृश्यते न च युक्तो न च केन्द्रेषु शुभग्रहः कश्चिदेवंविधे योगे जातस्य मरणमादेश्यम्।। ५।।

**सती –** जर जन्माच्यावेळी पापग्रह युक्त चंद्र ७, ८, १२, १ या घरात असता शुभ ग्रहाची त्यावर दृष्टी नसेल किंवा कोणताही शुभग्रह केंद्रात नसेल तर जातकाचा लवकर मृत्यु होतो.

*चतुरस्त्रे सप्तमगः पापान्तस्थः शशी मरणदाता।*
*उदयगतो वा चन्द्रः सप्तमराशिस्थितैः पापैः।। ६।।*

**भट्टोत्पल :** चतुरस्त्र इति। अरिष्टयोगद्वयमाह–लग्नाच्चन्द्रमाश्चतुर्थे स्थानऽष्टमे वा सप्तमे वा स्थितस्तत्र च पापग्रहयोर्मध्यगतस्तदा जातस्य मरणं करोति इत्यर्थः। उदयगतो वेत्यादि। लग्ने चन्द्रमा भवति सप्तमस्थाः पापाश्च भवन्ति तदा जातस्य मृत्युर्वक्तव्यः।। ६।।

**सती –** जर २ पापग्रहांच्या मध्ये चंद्र हा लग्नापासून ४, ८, किंवा ७ व्या घरात असेल तर मृत्युकारक असतो. किंवा लग्नात चंद्र, आणि सातव्या घरात पापग्रह असेल तरीही मृत्युकारक असतो. म्हणजे जातकाचा मृत्यु होतो.



*क्षीणेन्दौ द्वादशगे लग्नाष्टमराशिसंस्थितैः पापैः।*
*सौम्यरहिते च केन्द्रे सद्यो मृत्युर्विनिर्देश्यः।। ७।।*

**भट्टोत्पल :** क्षीणेन्दाविती। अरिष्टान्तरमाह–यस्य जन्मलग्नाद् द्वादशस्थाने क्षीणश्चन्द्रो भवति लग्नाष्टमराशौ यदि पापा व्यवस्थिताः सौम्यरहितानि केन्द्राणि भवन्ति तदा जातस्य सद्यो मरणं वक्तव्यम्।। ७।।

**सती –** जन्मलग्न कुंडलीत केंद्रात शुभग्रह नसता क्षीण चंद्र हा १२ व्या घरात आणि पापग्रह लग्न, आठव्या घरात असेल तर लवकरच मृत्यु होईल असे सांगावे.

*सोपप्लवे शशाङ्के सक्रूरे लग्नगे कुजेऽष्टमगे।*
*मृत्युर्मात्रा सार्द्ध चन्द्रवदर्के च शस्त्रेण।। ८।।*

**भट्टोत्पल :** सोपप्लव इति। अरिष्टान्तरमाह–सह उपप्लवेन वर्तते सोपप्लवः चन्द्रग्रहणकाले लग्नगते चन्द्रमसि तत्रैव शनैश्चरे पापे व्यवस्थिते लग्नादष्टमगते च भौमे जातः शिशुर्म्रियते मात्रा सहैव। चन्द्रवदर्के सशस्त्रेणेति। चन्द्रेण तुल्यं चन्द्रवत् एतदुक्तं भवति आदित्यग्रहणकाले अर्को लग्नगतो भवति तत्रैव शनैश्चरःपापग्रहः अष्टमो भौमः तदा जातस्य तन्मातुश्च शस्त्रतो मृत्युर्भवति।। ८।।

**सती –** जर राहुने ग्रस्त चंद्र (ग्रहणात) पापग्रहा सोबत लग्नात असेल आणि आठव्या स्थानी मंगळ असता आईसोबत जातकाचाही मृत्यु होतो. जर चंद्रासारखा सूर्य लग्नात आहे आणि तो केतुने ग्रस्त असून तो पापग्रहासोबत लग्नात असेल आणि आठव्या घरात मंगळ असता आईसोबत बाळाचाही मृत्यु शस्त्राने होतो.

*लग्न-द्वादश-नवमाऽष्टमसंस्थैश्चन्द्र- सौरि-सूर्याऽऽरैः।*
*जातस्य भवति मरणं यदि न बलयुतः पतिर्वचसाम्।। ९।।*

**भट्टोत्पल :** लग्नद्वादशेति। अरिष्टान्तरमाह–यस्य जन्मनि लग्नगतश्चन्द्रमा भवति द्वादशस्थः शनैश्चरः नवमोऽर्क अष्टमो भौमो भवति जीवश्च बलवान्न भवति तदा जातस्य मरणं भवति।। ९।।

**सती –** जर लग्नात चंद्र, १२ व्या घरात शनि, नवव्या घरात सूर्य आणि आठव्या घरात मंगळ असेल तसेच गुरू बलहिन असेल तर जातकाचा मृत्यु होतो. मात्र बलयुक्त गुरू कुंडलीत कोणत्याही घरात असता मरण येत नाही.

*सुतमदननवान्त्यलग्नरन्ध्रेष्व शुभयुतो मरणाय शीतरश्मिः।*
*भृगुसुतशशिपुत्रदेवपूज्यैर्यदि बलिभिर्न युतोऽवलोकितो वा।। १०।।*



**भट्टोत्पल :** सुतमदनेति। अरिष्टान्तरमाह–लग्नात्पञ्चम सप्तमनवम

द्वादशाष्टमस्थाना नामन्यतमस्थानस्थ: लग्नस्थो वा चन्द्रो भवति स च पापग्रहयुतो भवति शुक्रबुधबृहस्पतिनामन्यतमेन बलिना न युक्तो न दृश्यते वा तदा जातस्य मरणाय भवति।। १०।।

**सती –** जर पापग्रहाने युत चंद्र ५, ७, ९, १२, १, ८ या घरात असेल तर जातकाचा मृत्यु होतो. मात्र चंद्रावर बलवान शुक्र, बुध, गुरू ने युक्त किंवा दृष्ट नसेल तर जातकाचा मृत्यु होतो. जर बलवान शुक्र, बुध आणि गुरू युक्त किंवा दृष्ट असेल तर मरण होत नाही.

**योगे स्थानं गतवति बलिनश्चन्द्रे स्वं वा तनुगृहमथवा।**
**पापैर्दृष्टे बलवति मरणं वर्षस्यान्तः किल मुनिगदितम्।। ११।।**

**भट्टोत्पल :** योगे स्थानमिती। अनुक्तमरणकालानामरिष्टानां कालज्ञानमाह–यस्मिन्नरिष्टयोगे जातस्य मरणकालविधिर्नोक्तस्तस्मिन् योगे जातस्य ये योगकर्तारो ग्रहास्तेषां मध्ये यो बलवान स यस्मिन्राशौ जन्मकाले व्यवस्थितस्तत्र चारक्रमाच्चन्द्रमसि प्राप्ते जातस्य मरणं वक्तव्यम्। स्वम् आत्मीयं स्थानं वा गते चन्द्रमसि जातकाले यत्र राशौ चन्द्रमा व्यवस्थितस्तमेव राशि पुनरपि गते चन्द्रमसि तस्य मरणं वक्तव्यम्। तनुगृहं लग्नं तत्र चारक्रमात् गते चन्द्रमसि तस्य मरणं वक्तव्यम्। कदेत्युच्यते वर्षस्यान्तः संवत्सरस्यान्तरे। एतदुक्तं भवति अनुक्तमरणकालमारभ्य जातो वर्षमतिक्रमतीति तत्र प्रतिमासमेवैतानि चन्द्रमस्थराशित एवावगन्तव्यानि। तद्वर्षाभ्यन्तरे तस्य कदा मरणं वक्तव्यमित्यत आह–पापैदृष्टे बलवति। दर्शितराशित्रये एकस्मिन् राशौ यदा बलवान् चन्द्रो भवति पापैश्च दृष्टो भवति तदा तस्य मरणं वक्तव्यं न केवलगतमात्र एव चन्द्रे। किल मुनिगदितं किलेत्यागमसूचना। मुनिगदितमरिष्टलक्षणमित्यागमपारम्पर्येण श्रूयत इति।। ११।।

**सती –** ज्या अरिष्ट योगात मरणाची वेळ सांगीतली नसेल त्या योगांमध्ये मृत्यूकारक ग्रहात जो ग्रह बलवान आणि ज्या राशित असतो त्या राशित गोचरीचा चंद्र जेंव्हा येतो त्यावेळी जातकाचा मृत्यू होतो. तसेच जन्माच्यावेळी स्वस्थित राशित पुन्हा जेंव्हा चंद्र येतो तेंव्हा एक वर्षाच्या आत मृत्यू होतो. जेंव्हा चंद्र बलवान असेन स्वराशित किंवा सर्वात बलवान ग्रहाच्या स्थानात असेल किंवा लग्न राशित जेंव्हा जाईल आणि त्यावर पाप ग्रहाची दृष्टी असेल त्यावेळी मृत्यू होईल असे समजावे असे आचार्यांनी सांगीतले आहे.

**अध्याय ७ वा संपला**



* * * * * * * *

(८)

अध्याय आठवा

# अरिष्टभंगाध्याय

## संकट निवारण विचार

*सर्वानिमानतिबलः स्फुरदंशुजालो लग्नस्थितः प्रशमयेत् सुरराजमन्त्री।*
*एको बहुनि दुरितानि सुदुस्तराणि भक्त्या प्रयुक्त इव शूलधरप्रणामः।। १।।*

**सती –** बलवान आणि डोळे दिपवून टाकेल अशा तेजाने युक्त गुरू लग्नात असेल तर मात्र संपूर्ण संकटाचा नाश करतो, जसे भक्ति पूर्वक वंदन एकवेळ जरी शिवजी ला केले असता, सर्व पापांचा नाश होतो त्याप्रमाणे संकटाचा नाश होतो.

*लग्नाधिपोऽतिबलवानशुभैरदृष्टः*
*केन्द्रस्थितैः शुभखगैरवलोक्यमानः।*
*मृत्युं विधूय विदधाति सुदीर्घमायुः*
*सार्द्ध गुणैर्बहुभिरूर्जितया च लक्ष्म्या।। २।।*

**सती –** बलवान लग्नेशावर पापग्रहाची दृष्टी नसेल आणि केंद्रातील शुभ ग्रहांची त्यावर दृष्टी असेल तर सर्व संकटाचा नाश होतो. एवढेच नाही तर सर्व प्रकारचे गुण, संपत्ती मिळते आणि दीर्घायुष्य प्राप्त होते.

*लग्नादष्टमवर्त्यपि बुधगुरूभार्गवदृकाणगश्चन्द्रः।*
*मृत्युं प्राप्तमपि नरं परिरक्षत्येव निर्व्याजम्।। ३।।*

**सती –** चंद्र जन्म लग्नापासून आठव्या भावात असूनही जर बुध, गुरू किंवा शुक्राच्या द्रेष्काणांत असेल (३,६,९,१२,२,७ राशित) तर अनेक संकट असतांनाही जातकांचे सर्व प्रकारे रक्षण होते.पहीला द्रेष्काण त्याच राशिचा असतो, दुसरा द्रेष्काण ५ वे राशिचा तर तिसरा द्रेष्काण ९ व्या राशिचा असतो.

*चन्द्रः सम्पूर्णतनुः सौम्यर्क्षगतः स्थितःशुभस्यान्तः:।*
*प्रकरोति रिष्टभङ्ग विशेषतः शुक्रसन्दृष्टः।। ४।।*

**सती –** पूर्ण चंद्र जर शुभ ग्रहाच्या राशित असून दोन शुभ ग्रहांच्या मध्ये असेल तर संकटांचा नाश करतो. आणि जर तोच चंद्र शुक्राने दृष्ट असेल तर विशेषकरून मृत्यू संकट टळते.

*बुधभार्गवजीवानामेकतमः केन्द्रमागतो बलवान्।*
*क्रूरसहायो यद्यपि सद्यो रिष्टस्य भङ्गाय।। ५।।*

**सती –** बुध, गुरू, शुक्र यापैकी कोणताही एक ग्रह बलवान असून केंद्रात (१,४,७,१०) असेल आणि पापग्रहांनी युत किंवा दृष्ट नसेल तर लवकरच संकटांचा नाश करतो.

*रिपुभवनगतोऽपि शशोगुरूसितचन्द्रात्मजदृकाणस्थः।*
*गरूड इव भोगिदष्टं परिरक्षत्येव निर्व्याजम्।। ६।।*

**सती –** लग्नापासून सहाव्या घरात चंद्र जर बुध, गुरू किंवा शुक्राच्या द्रेष्काणांत (९,१२,२,७,३,६ या राशित) असेल तर जातकाचे रक्षण करतो. जसे सर्पामुळे भयभीताचे गरूड रक्षण करतो.

*सौम्यद्वयमध्यगतः सम्पूर्णः स्निग्धमण्डलः शशभृत्।*
*निःशेषारिष्टहन्ता भुजङ्गलोकस्य गरूड इव ।। ७।।*

**सती –** दोन शुभ ग्रहांच्या मध्ये जर पूर्ण चंद्र असेल तर सर्व संकटांचा नाश करतो. जसे सर्पांच्या सर्व समुहाचा नाश गरूड करतो.

*शशभृति पूर्णशरीरे शुक्ले पक्षे निशाभवे काले।*
*रिपुनिधनस्थे रिष्टं प्रभवति नैवात्र जातस्य।। ८।।*

**सती –** जर एखाद्याचा जन्म शुक्लपक्षातील पौर्णिमेच्या रात्री झाला असेल आणि पूर्ण चंद्र लग्नापासून सहा किंवा आठव्या स्थानात असेल तरीही जातकाला कुठलेही मृत्यूचे संकट येत नाही.

*प्रस्फुरितकिरणजाले स्निग्धामलमण्डले बलोपेते।*
*सुरमन्त्रिणि केन्द्रगते सर्वारिष्टं शमं याति।। ९।।*



**सती –** जर जन्माचे वेळी प्रकाशमान बलवान गुरू केंद्रात (१,४,७,१०)असेल तर तो सर्व संकटांचा नाश करतो. म्हणजेच सर्व संकटे जातात.

*सौम्यभवनोपयाताः सौम्यांशकगाः सौम्यदृकाणस्थाः।*
*गुरूचन्द्रकाव्यशशिजाः सर्वेऽरिष्टस्य हन्तारः:।। १०।।*

सती – गुरू, चंद्र, बुध आणि शुक्र हे जर शुभ राशित असतील आणि हे ग्रह शुभ सौम्य भावात (२,३,४,६,७,९,१२) स्थित असतील राशिच्या नवमांश वर्गात तसेच शुभ द्रेष्काणात असतील तर संपूर्ण संकटांचा नाश होतो.

*चन्द्राध्यासितराशेरधिपः केन्द्रे शुभग्रहो वाऽपि।*
*प्रशमयति रिष्टयोगं पापानि यथा हरिस्मरणम्।। ११।।*

**सती –** एक जरी शुभ ग्रह किंवा चंद्राने युक्त राशिस्वामी केंद्रात असेल तर संकट योगाचा नाश करतो. जसे विष्णू भगवंताचे स्मरण केल्याने पाप नाहीसे होते.

*पापाः यदि शुभवर्गे सौम्यैर्द्रष्टाः शुभेशवर्गस्थैः।*
*निघ्नन्ति तदा रिष्टं पतिं विरक्ता यथा युवतिः।। १२।।*

**पाप ग्रहांव्दारे अरिष्टांचा नाश**

**सती –** जर अरिष्ट कारक पापग्रह शुभ ग्रहांच्या वर्गात (होरादि षडवर्ग) असेल आणि शुभ वर्गात स्थिर शुभ ग्रहाने दृष्ट असेल तरही सर्व संकटांचा नाश होतो. जसे पर पुरूषात आसक्त असली स्त्री आपल्या पतीचा नाश करते.

*राहुस्त्रिषष्ठालाभे लग्नात् सौम्यैर्निरीक्षितः सद्यः।*
*नाशयति सर्वदुरितं मारूत इव तूलसङ्घातम्।। १३।।*

**राहू ग्रहा व्दारे अरिष्टांचा नाश**

**सती –** जन्म लग्नापासून ३, ६, ११ व्या घरात जर राहू असून तो शुभा ग्रहाने दृष्ट असेल तर तो संपूर्ण संकटांचा नाश करतो. जसे कापसाच्या गंजाला अग्नी भस्म करून टाकते.

*शीर्षोदयेषु राशिषु सर्वे गगनाधिवासिनः सूतौ।*
*प्रकृतिस्थश्चारिष्टं विलीयते घृतमिवाग्निस्थम्।। १४।।*

**सती –** जन्माचे वेळी जर सर्व ग्रह (शुभ व पाप ग्रह) शीर्षोदय राशीत (३,५,६,७,८,११) असतील, तर जन्म संकटांचा नाश अशा प्रकारे होतो. जसे अग्नी तुपाचा नाश करते.

*तत्काले यदि विजयी शुभग्रहः शुभनिरीक्षिताऽवश्यम्।*
*नाशयति सर्वारिष्टं मारूत इव पादपान् प्रबलः।। १५।।*

**सती -** जन्माच्या वेळी एकजरी ग्रह ग्रहयुध्दात विजयी होत असेल आणि शुभ ग्रहाची त्यावर दृष्टी असेल तर तो ग्रह संपूर्ण संकटांचा नाश करतो जसे वादळ, लतावेली आणि झाडांचा नाश करतो.

*पक्षे सिते भवति जन्म यदि क्षपायां*
*कृष्णे तथाऽहनि शुभाशुभऽदृश्यमानः।*

*तं चन्द्रमा रिपुविनाशगतोऽपि यत्ना-*
*दापत्सु रक्षति पितेव शिशुं न हन्ति।। १६।।*

**सती -** जर एखाद्याचा जन्म शुक्ल पक्षातील रात्री होत असेल आणि चंद्रावर शुभग्रहाची दृष्टी असेल किंवा जर एखाद्याचा जन्म कृष्णपक्षातील दिवसाचा झाला असेल आणि चंद्रावर पापग्रहांची दृष्टी असेल तर चंद्र सहाव्या, आठव्या घरात असून सुध्दा चंद्र वडीलांप्रमाणे जातकाचे रक्षण करतो. म्हणजेच संकटांचा नाश करतो. आणि मरू देत नाही.

**अध्याय ८ वा संपला.**

* * * * * * * *

(९)

अध्याय नववा

# आयुर्दायाध्याय

## ग्रहाच्या आयुष्यमानाचे ज्ञान

*राश्यंशकला गुणिता द्वादशनवभिर्ग्रहस्य भगणेभ्यः।*
*द्वादशहृतावशेषेऽब्दमासदिननाडिका क्रमशः।। १।।*

**भट्टोत्पल :** राश्यंशकलेति। अथायुर्दायाध्यायं व्याख्यास्यामस्तत्र पूरूषजन्मकाले स्फुटगणितेन विशेषकर्मणा स्फुटाग्रहास्तात्कालिकाश्च कर्तव्याः लग्नं च तात्कालिकं कर्तव्यं तात्कालिकस्यैवार्कस्यायुर्दायः कर्तव्यः। तत्करणोपायमाह–तात्कालिकग्रहस्य राश्यंशकलाविकलाः पृथक् द्वादशभिर्गुणितास्ततो नवभिर्गुणिता एवमष्टाधिकशतेन, गुणिताः कार्याः विलिप्तानां मध्ये व्युत्क्रमेण षष्ट्या भागमपहृत्यावाप्तं कलासु योज्यं यदवशिष्टं पलानि। कलाभ्यो षष्टया भागमपहृत्यावाप्तं अंशेषु योज्यं ज्ञेयं घट्यः ततो भागेषु त्रिंशता भागमपहृत्यावाप्तं राशिषु योज्यं शेषं दिवसाः। ततो राशिषु द्वादशभिर्भागमपहृत्यावाप्तं ते भगणाः शेषं मासाः। भगणानामपि द्वादशभागमपहृत्यावाप्तं त्याज्यं शेषानि वर्षाणि। एवमब्दमासदिननाडिकाः क्रमश इति। उदाहरणम्। तद्यथा–स्फुटग्रहः ३/२९/५९/५९ अस्य 'राश्यंशकलाविकला द्वादशभिर्गुणिता जातं ३६/३४८/७०८/७०८ पुनरपि नवभिर्गुणिता ३२४/ ३१३२/६३७२/ ६३७२ ततो विलिप्तिकासु एतासु षष्ट्या भागमपहृत्यावाप्तं १०६ तत्कलातु योजितं ६४७८ शेषं १२ पलानि ताभ्यो षष्टिभागमपहृत्यावाप्तं १०७ अंशेषु योजितं ३२३९ शेषम् ५८ एता घट्यः। एषु त्रिंशता लब्धं १०७ तद्राशिषु युक्तं ४३१ शेषं २९ एते दिवसाः पुनाः राशौ द्वादशभागेन लब्धं ३५ एते भगणाः शेषं ११ एते मासाः भगणेभ्यो द्वादशभागेन लब्धं २ निरूपयोगत्वात्त्याज्यं शेषम् ११ वर्षाणि। वर्षमासदिनघटीपलादेरधोऽधः स्थापना कार्या। एवं सर्वेषां ग्रहाणां करणीयम्। एवं कृते आयुर्दायो भवति।। १।।

**ग्रहांचे आयुष्यमान साधन**

**सती –** ग्रहाच्या राश्यादि म्हणजे राशि, अंश, कला आणि विकला यांना १२ व ९ ने गुणल्यावर (१२९ = १०८ ने गुणावे) येणाऱ्या गुणकाराच्या भगण स्थानाला १२ ने भाग दिल्यास जे शिल्लक राहिल त्याला क्रमशः वर्ष, महिने, दिवस, घटिका आणि पळे असे ग्रहायुर्दाय होते. हे स्पष्टपणे समजण्यासाठी खालील उदाहरण पाहूया:

**उदाहरण :** स्पष्ट सूर्य ५/१५/२०/२५ याला १०८ (राशि, अंश, कला, विकला) ने गुणल्यानंतर राश्यादि ५४०/१६२०/२०६०/२७०० होईल. याचे सवर्णन (कोणत्याही एका परिमाणात/युनीट मधे रूपांतर करणे) केल्यानंतर भगण (राशिसमुह) ४९/७/५/५/० होईल. या भगणाला १२ ने भागीतल्यानंतर जे शिल्लक राहिल त्याला वर्ष, महिना दिवस, घटिका,

आता आपण दूसरे उदाहरण पाहू:

स्पष्ट सूर्य – ३/२९/५९/५९ ( राशि अंश कला विकला ) × १०८ ( १२ × ९)

| | | |
|---|---|---|
| ३२४<br>+ १०७ | ३१३२<br>+ १०७ | ६३७२<br>+ १०६ |
| १२)४३१(३५<br>– ४२० | ३०)३२३९(१०७<br>– ३२१० | ६०)६४७८(१०७<br>– ६४२० |
| ११ | २९ | ५८ |

६०)६३७२(१०६
– ६३६०
१२ म दि घ प

गुणनफलाचे/गुणाकाराचे सवर्णन केले असता– ३५/११/२९/५८/१२

ईथे ३५ ला १२ ने भागीतल्यावर ११ शिल्लक राहतात

म्हणजे सूर्याचे आयुष्य ११ वर्षे ११ महीने २९ दिवस ५८ तास १२ पळे होईल.

अशाप्रकारे सर्व ग्रहांचे आयुष्य काढता येते.

६० प्रतिपल = १ पल ६० पल = १ घटी.



६० घटी = १ अंश (एक दिवस) ३० अंश = १ राशि (३० दिवस)

१ राशि = १ महिना (३० दिवस) १२ महिने = १ वर्ष

## लग्नायुर्दाय ज्ञान

*होरादायोऽप्येवं बलयुक्ताऽन्यानि राशितुल्यानि ।*
*वर्षाणि सम्प्रयच्छत्यनुपाताच्चांशकादिफलम्।। २।।*

**भट्टोत्पल :** होरादाय इति। लग्नायुर्दायमाह–होरा लग्नं तद्दायः यथा ग्रहस्यायुर्दायः कृतस्तथा लग्नस्य कार्यः। सा होरा यदि बलयुक्ता तदाऽन्यानि वर्षाणि राशितुल्यानि प्रयच्छति। लग्नस्य यावन्तो भुक्तराशयः तत्समानानि वर्षाणि ददातितानि आयुर्दाये योज्यानि अनुपाताच्चांशकादिफलम् अनुपातस्त्रैराशिकगणितमभिधीयते। लग्नस्य राशीनपास्य भागादिलीप्तापिण्डः कार्यः तल्लिप्तापिण्डं द्वादशभिः सङ्गुण्य अष्टादशभिः शतै (१८००) र्विभज्यावाप्तं मासाः मासशेषं त्रिंशता ३० सङ्गुण्य अष्टादशशतविभागेन लब्धं दिवसाः। दिनशेषं षष्टिगुणितं कृत्वा अष्टादशशतैर्लब्धं घटिका शेषं षष्टिगुणं कार्यम् अष्टादशशतैर्लब्धं पलानि। एवमनुपातेन लब्धो मासादिर्लग्नस्यायुर्दायो ज्ञेयः।। २।।

**सती –** ज्याप्रकारे ग्रहाच्या राश्यादि (राशि अंश, कला विकला ई.) वरून ग्रहाचे आयुष्यमान साधन केल्या जाते. त्याप्रकारे लग्नाचे सुध्दा आयुर्दाय साधन केले पाहिजे. विशेषताः लग्न जर बलवान असेल (म्हणजे बुध, गुरू,शुक्र किंवा स्वतःच्या स्वामीने दृष्ट किंवा युत) असेल तर लग्नाच्या राशि संख्या इतके वर्ष तसेच अंशादिचे आयुर्दाय साधन केल्याने येणाऱ्या महिन्यादि (महिने, दिवस, घटिका, पळे, ई.) यांना आयुष्यमानात मिळविल्यास (बेरीज केल्यास) लग्नाचे आयुष्यमान निघते.

**उदाहरण :**

लग्न राश्यादि ३ राशि १० अंश १० कला ५ विकला याला पूर्वी सांगीतल्याप्रमाणे १०८ ने गुणल्यास गुणाकार (राश्यादि) ३२४/१०८०/१०८०/५४० इतका येतो. त्याचे सवर्णन केल्यावर भगणादि ३०/०/१८/९/० इतका होतो. या भगणाला १२ ने भागतिल्यास शिल्लक जे राहील म्हणजे वर्षादि (वर्ष, महिने, दिवस ई.) त्याला लग्नायुर्दाय म्हणावे. इथे लग्नायुर्दाय, ६ वर्ष, ० महिने, १८ दिवस ९ घटिका ० पळे हे लग्नायुर्दाय होईल. अर्थात लग्न जर बलवान नसेल तर लग्नायुर्दाय वर्षादि. ६/०/१८/९/० असेल. मात्र लग्न बलवान राहिल्यास अंशादी ने अनुपात केल्यावर (१०°/१०'/५'' १२ =१२०/१२०/६०) दिनादि १२०/१२०/६० झाले पुन्हा सवर्णन केल्यानंतर मासादि ४/२/१/० इतके आले. राशि संख्येइतके वर्ष जोडल्यावर म्हणजे ३ वर्ष जोडल्यावर वर्षादि ३/४/२/१/० झाले. पुर्वी काढलेल्या लग्नायुर्दायात हे जोडल्याने.

म्हणजे ६/०/१८/९/०   पूर्व साधित
+ ३/४/२/१/०   लग्नायुर्दाय
९/४/२०/१०/०   वर्षादि लग्नायुर्दाय असे होईल.

**आता दुसरे उदाहरण पाहू या :**

५।१५।३०/३०×१०८ = ४९।६।२४।४५।००
(सवर्णन केल्यावर)

४९ ÷ १२ = १ वर्ष बाकी जसेच्या तसे
म्हणजे १ वर्ष ६ महिने २४ दिवस ५४ घटी ०० पल
हे लग्नायुर्दाय झाले.

लग्न बली असल्याने अंशादि १५°।३०'।३०"
× १२
१८०।३६०।३६०

सवर्णन केल्यावर दिनादि १८६ / घटी ६ / पल ००
किंवा ६ महीने ६ दिवस ६ घटी ० पल

यात राशि संख्या वर्ष ५ मिळविल्यास

वर्षादि   ५ वर्ष ६ महीने ६ दिवस ६ घटी ० पल
(लग्नायु) + १   ६   २४   ५४
६   १२   ३०   ६०

म्हणजेच ७ वर्ष १ महिना १ दिवस ० पल हे लग्नायुर्दाय होईल.

बलवान लग्न म्हणजे लग्न राशि आपल्या स्वामीने युत किंवा दृष्ट किंवा शुभग्रहानी (बुध, गुरु, शुक्र) युत किंवा दृष्ट असणे.

## स्वराशि-स्वोच्चादि स्थित ग्रहांचे आयुष्य

*वर्गोत्तम स्वराशि द्रेष्काण नवांशके सकृद्द्विगुणम्।*
*वक्रोच्चयोस्त्रिगुणितं द्वित्रिगुणत्वे सकृत्त्रिगुणम्।। ३।।*

**भट्टोत्पल :** वर्गोत्तमेति। ग्रहायुर्दायविशेषमाह–यो ग्रहों वर्गोत्तमस्थितः तदायुर्दायो द्विगुणः कार्यः। य स्वराशौ भवति स्वद्रेष्काणं स्वनवांशके भवति तद्दत्तायुर्दायो द्विगुणः कार्यः। वस्तु वक्री भवति तद्दत्तायुर्दायस्त्रिगुणः वस्तूच्चराशौ भवति तस्यापि त्रिगुणः कार्यो द्वित्रिगुणत्वे सकृत्त्रिगुण सकृदेकवारं त्रिगुणं वक्तव्यम्।।

**सती** – जर कोणता ग्रह वर्गोत्तम नवमांश, स्वराशि स्वद्रेष्काण किंवा स्वनवमांश या चार पैकी कोणत्याही एका, दोन किंवा ३ स्थितीत असेल तर त्या ग्रहाचे आयुर्दायला (आयुष्यमानाला) दुप्पट केले पाहिजे आणि जर कोणता ग्रह वक्री किंवा स्वउच्चीचा असेल किंवा दोन्ही स्थितीत असेल तर त्या ग्रहाचे आयुष्य तिनपट करावे. आणि जर एखादा ग्रह स्वराशित आणि स्वोच्च, दोन्ही असेल, म्हणजेच दुप्पट आणि तिप्पट दोन्ही प्राप्त होत असेल तर त्या ग्रहाचे आयुर्दायला. त्रिगुणित म्हणजे तिनपट करावे.

## शत्रुच्या राशित नीचस्थ आणि अस्त ग्रह असतांना हानी

*त्र्यंशमवक्रो रिपुभे नीचेऽर्धं सूर्यलुप्तकिरणश्च।*
*क्षपयति स्वायुर्दायान्नास्तं यातौ रविजशुक्रौ।। ४।।*

**भट्टोत्पल** : त्र्यंशमवक्र इति। शत्रुक्षेत्रस्थित ग्रहायुर्दायहानिमाह–भौमं वर्जयित्वा शत्रुराशिव्यवस्थितो ग्रहः स्वदत्तायुषस्त्रिभागमपहरति। यश्च स्वनीचराशौ भवति स स्वदत्तायुषोऽर्धमपहरति। अस्तगतो ग्रहोऽर्धं हरति। शुक्रशनैश्चरौ अस्तंगतावपि नार्धं हरतः।। ४।।

**सती** – मार्गी असलेला ग्रह जर शत्रूच्या घरात असेल तर त्याचे आयुष्यमांन १/३ नाश पावते आणि जर, जो ग्रह निचीचा असेल किंवा अस्त असेल तर त्या ग्रहाच्या आयुष्यमानाचा अर्धा नाश होतो. मात्र शुक्र आणि शनिच्या अस्त राहिल्याने सुध्दा आयुष्यमानाचा नाश होत नाही. अर्थात शुक्र आणि शनि पूर्ण आयुष्य प्रदान करतात.

## आयुष्यमानात चक्रार्थ हानी

*सर्वार्धत्रिचतुर्थेन्द्रियर्तुभागान् व्ययाद्धरन्त्यशुभाः।*
*सन्तोऽर्धमतो वामं बलवानेकर्क्षगेष्वेकः।। ५।।*

**भट्टोत्पल** : सर्वार्धेति। चक्रपातेनाप्यायुषो हानिमाह–अशुभाः पापग्रहा वामं विपरीतं सप्तमभवनं यावल्लग्नाद् द्वादशे स्थिताः ते सर्वमायुर्दायं हरन्ति। य एकादशे ते अर्धम्, ये दशमे ते त्रिभागमः, ये नवमे ते चतुर्थांशं येऽष्टमे ते पञ्चमांशं, सप्तमस्थाः षड्भागमेवं हरन्ति। शुभास्तु सौम्यग्रहा लग्नाद्द्वादशस्थाः स्वायुषोऽर्धं हरन्ति, एकादशस्थाश्चतुर्भागं, दशमस्थाः षड्भागं नवमस्थाऽष्टमभागं, अष्टमस्था दशमभागं सप्ताष्टमस्था द्वादशभागं,

द्वादशैकादशदशमनवमाष्टमसप्तमेषु यावत् बहुषु ग्रहेषु एकर्क्षगेषु यो बलवान् स एव यथोक्तं स्वायुर्दायमपहरति नान्यः।। ५।।

**सती –** जर पापग्रह लग्नापासून १२ व्या घरात असेल तर तो आपले सर्व आयुष्य नाश करतो. अकराव्या घरात असेल तर अर्ध, दहाव्या भावात असेल तर तृतीयांश, नवव्या घरात असेल तर चतुर्थांश, आठव्या घरात असेल तर पंचमांश, आणि सातव्या घरात असेल तर षष्ठांश आयुष्यांचा नाश करतो.

जर या भावांमध्ये शुभ ग्रह असेल. तर पापग्रहपेक्षा अर्ध आयुष्याचा नाश होतो. जर एकाच घरात एकापेक्षा आधिक ग्रह स्थित असतील तर त्यापैकी जो सर्वात बलवान असेल. तो आपल्या आयुष्यमाना एवढ्याा भागाचा नाश करतो.

**अध्याय ९ वा संपला.**

* * * * * * * *

(१०)

अध्याय दहावा

# दशा-अन्तर्दशाध्याय

## ग्रहांची दशा

*शोध्यक्षेपविशुद्धः कालो यो येन जीविते दत्तः।*
*स विचिन्त्या तस्य दशा स्वदशासु फलप्रदाः सर्वे।। १।।*

**भट्टोत्पल :** शोध्यक्षेपेति। अथ दशाप्रमाणमाह–प्रथमं ग्रहस्यायुर्दायः कर्तव्यः। ततस्तस्य चक्रपातेन हानिर्या भवति सा कार्या। यत्र द्वित्रिगुणितं भवति तदपि कार्यम्। एवं कृते शोध्यक्षेपविशुद्धः कालो भवति। शोध्यो हानिः क्षेपो गुणना तेन शुद्धः कालो येन ग्रहेण जीविते दत्तस्तावत्कालं तस्य ग्रहस्य सम्बन्धिनी दशा भवेदेवं विचिन्त्य शुभाऽशुभफलं ग्रहाणां दशाजं बोध्यम्।। १।।

**सती –** पूर्वीच्या अध्यायात सांगीतल्यानुसार राशि,अंश,कला, विकला यावरून आयुष्य साधन करून त्यात आयुष्य हानि (नष्ट होणे) द्विगुणित, त्रिगुणित जशी स्थिती असेल ती पूर्ण करून वर्ष निश्चित केले पाहीजे. इथे शोध्यचा अर्थ हानि व क्षेपचा अर्थ गुणणे असा आहे. अशा प्रकारे जो ग्रह जेवढे आयुष्य देतो. तेच त्या ग्रहाची वर्षादि दशा समजावी. म्हणजेच आयुष्य साधन केल्यानंतर ज्या ग्रहाचा जेवढा काळ शिल्लक आहे. तेवढीच (तेवढाच काळ) त्या ग्रहाची दशा समजावी. सर्व ग्रह आपापल्या दशा, अंतर्दशेत आपापले शुभाशुभ फल देतात. (शुभ ग्रह शुभ फल देतात, तर अशुभ ग्रह अशुभ फळे देतात.)

## दशेचा क्रम

*लग्नार्कशशाङ्कानां यो बलवांस्तद् दशा भवेत् प्रथमा।*
*तत्केन्द्रपणफरापोक्लिमगतानां बलाच्छेषाः।। २।।*

**भट्टोत्पल :** लग्नार्केति। ग्रहदशाप्रमाणे क्रममाह–लग्नार्कचन्द्राणां मध्ये यो बलवांस्तस्य प्रथमा दशा भवेत्। ततः प्रथमदशापतेर्यावन्तो ग्रहाः केन्द्रस्था भवन्ति तेषां बलाधिक्येन भवेद्दशा। एवं सर्वेषां केन्द्रस्थानां कल्पयित्वा ततः पणफरस्थानामनेन क्रमेण कर्तव्या। ततः

आपोक्लीमस्थानगतानां तेनैव क्रमेण दशा भवति शेषाणां बलात् ज्ञातव्याः।। २।।

**सती -** लग्न, सुर्य आणि चंद्र यांच्यात जो बलवान असेल प्रथम त्याच ग्रहाची दशा असेल. पुन्हा केंद्रात असलेल्या ग्रहांची, त्यानंतर पणफर स्थानी असलेल्या ग्रहांची आणि शेवटी अपोक्लिम स्थानी असलेल्या ग्रहांची दशा बलाप्रमाणे क्रमवार असते.

**विशेष :** जर ग्रहांमध्ये समान बलवानता असेल तर ज्या ग्रहाची दशा वर्ष संख्या अधिक असेल त्या ग्रहाची दशा पहिल्यांदा होते. आणि वर्षातही समानता असेल. तर प्रथम उदित ग्रहाची पूर्व दशा असते. पणफर स्थाने म्हणजे २,५,८,११ आणि अपोक्लिम स्थाने म्हणजे ३,६,९,१२ ही होत.

## ग्रहांची दशा आणि शुभाशुभत्व

*मित्रोच्चस्वगृहांशोपगतानां शोभना दशाः सर्वाः।*
*स्वोच्चाभिलाषिणामपि न तु कथितविपर्ययस्थानाम्।। ३।।*

**भट्टोत्पल :** मित्रोच्चेति। एवं दशापतौ ज्ञाते तद् दशाशुभाशुभज्ञानमाह-जन्मकाले यो ग्रहों मित्रक्षेत्रस्थः यश्च स्वोच्चस्थः, यश्च स्वक्षेत्रस्थः,स्वनवांशगतः तस्य दशा शोभना। उच्चाद् द्वादशराशौ नवमनवांशस्थ उच्चाभिलाषी तस्यापि दशा शोभना। न तु विपरीतगतानां। जन्मकाले यो ग्रहः शत्रुक्षेत्रस्थः शत्रुनवांशस्थः नीचस्थः नीचाभिलाषी तस्य दशा दुष्टा अशुभा अन्यस्थानस्थितस्य ग्रहस्य मध्या दशा भवति।। ३।।

**सती -** जन्माच्या वेळी ग्रह आपल्या मित्राच्या घरात असेल,उच्चीचा असेल, स्वराशीत किंवा स्वनवमांशात असेल तसेच जो ग्रह उच्च स्थानी जाणारा असेल त्या ग्रहाची संपूर्ण दशा शुभ फलदायक असते. आणि या ऊलट जो ग्रह स्वतःच्या नीच क्षेत्री, शत्रुच्या घरात, किंवा अस्त असेल तर त्या ग्रहाची संपूर्ण दशा अशुभ फलदायक असते.

## लग्न दशाचे शुभाशुभ फळे

*होरादशा दृकाणैः पूजितमध्याधमा चरे क्रमशः।*
*द्विशरीरे विपरीता स्थिरे तु पापेष्टमध्यफला।। ४।।*

**भट्टोत्पल :** होरादशेति। होरा लग्नं तस्य दशा द्रेष्काणैः शुभाशुभा ज्ञेया। तत्र चर-राशौ लग्नगते प्रथमद्रेष्काणे जातस्य पूजिता दशा भवेत्। द्वितीये मध्यफला, तृतीये अधमा नेष्टा। अनुक्रमेण द्विशरीरे विपरीता तेन द्विःस्वभावराशौ लग्नगते प्रथमद्रेष्काणे अधमा, द्वितीयद्रेष्काणे मध्यफला, तृतीयद्रेष्काणे पूजिता शुभा। स्थिरे स्थिरराशौ लग्नगते प्रथमद्रेष्काणे पापा, द्वितीये

इष्टफला, तृतीये द्रेष्काणे मध्यफला बोध्या।। ४।।

**सती –** होरा दशा म्हणजे लग्न दशा. जर चर लग्न असेल तर पहिल्या द्रेष्काणात लग्न दशाफळ शुभ असते. दुसऱ्या द्रेष्काणात मध्यम दशाफळ तर तिसऱ्या द्रेष्काणात दशाफळ अशुभ समजावे.जर द्विस्वभाव लग्न असेल तर लग्न दशा फळ विपरीत समजावे. अर्थात पहिल्या द्रेष्काणात अशुभ, द्वितीय द्रेष्काणात मध्यम तसेच तिसऱ्या द्रेष्काणात शुभ फळ मिळते. जर स्थीर लग्न असेल तर पहिल्या द्रेष्काणात अशुभ फळ, दुसऱ्या द्रेष्काणात शुभ फळ, आणि तिसऱ्या द्रेष्काणात मध्यम फल मिळेल. असे समजावे.

**विशेष :** लग्नस्थानी १) मेष, कर्क, तुला, मकर राशि असता ती चर लग्न होत.
२) वृषभ, सिंह, वृश्चिक, कुंभ ती स्थिर लग्न होत.
३) मिथुन, कन्या, धनू, मी ती द्विस्वभाव लग्न होत.

### अन्तर्दशेचा स्वामी

*एकर्क्षेऽर्ध त्र्यंशं त्रिकोणयोः सप्तमे तु सप्तांशम्।*
*चतुरस्त्रयोस्तु पादं पाचयति गतो ग्रहः स्वगुणैः।। ५।।*

**भट्टोत्पल :** एकर्क्षेऽर्धमिती। अन्तर्दशामाह–येन ग्रहेण यो ग्रहः एकर्क्षे स्थितःस तद्दत्तदशाया अर्धमपहृत्य स्वैर्दशागुणैः पाचयति। दशापते स्त्रिकोणयोः स्थितो ग्रहःदशापतिदत्तदशायाः त्र्यशं पाचयति। दशापतेः सप्तमे स्थाने स्थितो ग्रहो दशापतिदत्तदशाकालात्सप्तममांशं स्वर्गुणैः पाचयति। दशापतेश्चतुर्थस्थानस्थोऽष्टमस्थानस्थो वा ग्रहपांद चतुर्थांशं दशपतिदत्तकालादपहृत्य स्वगुणैः पाचयति। न केवलं ग्रहाल्लग्नादपि एतेषु स्थानेषु समवस्थितो ग्रहः यथोक्तमंशं पाचयति। यद्येकस्था बहवो भवन्ति तदा तेषु मध्ये तो बलवान् स एव पाचयति नान्यः।। ५।।

**सती –** दशा स्वामी सोबत राहणारा ग्रह आपल्या स्वभावानुसार दशा स्वामीच्या दशा वर्षाच्या अर्ध्या अन्तर्दशेचा अन्तर्दशा स्वामी असतो. एकापेक्षा जास्त ग्रह जर दशा स्वामी सोबत असतील तर जो ग्रह बलवान असेल तो अन्तर्दशा स्वामी होईल. दशापतिपासून त्रिकोणात (५,९ घर) जो ग्रह बलवान असेल तो तृतीयांश वर्षमानाचा अंतर्दशा स्वामी असतो. दशा स्वामी पासून चतुरस्त्र म्हणजे ४ था, ८ व्या घरात जो ग्रह असेल तो ग्रह १/४ थांश वर्षमानाचा अन्तर्दशा स्वामी असतो. आणि जो ग्रह सातव्या घरात असेल तो ग्रह १/७ मांश वर्षमानाचा अन्तर्दशा स्वामी असतो. दशा व अंतर्दशेचा अधिपती आपल्या

काळात स्वताःच्या स्वभावानुसार फळ देतो. जर त्या स्थानात एकापेक्षा जास्त गंह असतील तर त्यापैकी जो ग्रह बलवान असेल तो अधिपती असेल व फळं देईल. वरील स्थानाव्यतिरिक्त

ईतर स्थानात असलेले ग्रह अन्तर्दशापती होत नाहीत. यावरून लग्नासंबंधी असेच समझावे.

### अन्तर्दशा साधन

*भागाः सदृशच्छेदैर्विवर्जिताः संयुता दशाच्छेदाः।*
*प्रत्यंशा गुणकाराः पृथक् पृथक् चान्तर्दशास्ताः।। ६।।*

**भट्टोत्पल :** भागा इति। भागादौ तु सदा रूपं विन्यस्य सदृशीकृतम्।
सर्वच्छेदांशसंयोगैश्छिन्द्यादन्तर्दशा फलम् ।।
रूपस्थानगतैरंशैर्यल्लब्धं सङ्गुणीकृतम्।
दशा ह्यन्तर्दशा प्रोक्ता नित्यं यवनसूरिभिः।।

दशापतेरेकर्क्षेऽर्ध त्र्यंशं त्रिकोणयोरित्यादि दर्शितस्थानेषु यो ग्रहो भवति तत्स्थानोक्तसंस्था भागाः रूपस्याधः स्थाप्याः दशापतेरादावेव रूपं परिकल्पयेत्। ततः परस्परच्छेदहता कार्याः, एकैकं प्रत्येकेन छेदेन गुणयेत्। एवं कृते भागाः सदृशच्छेदा भवन्ति। उपरिगता राशयो दशापिण्डस्य पृथक् पृथक गुणकारा भवन्ति। एकीकृताश्च सर्वेषां एक एव भागहार एव गुणितविभक्ता ग्रहदत्तायुः १/१/१/१/१ पिण्डात् पृथक् पृथक अन्तर्दशा लभ्यते। तद्यथा- १/२/३/७/४ एत्ते भागाः परस्परच्छेदेन हताः सांशाः कार्या यावत्सर्व एवं समच्छेदा भवन्ति कृता एवंविधा १६८/८४/५६/२४/४२ जाताः एते एव संयुक्ता जाताः ६८/१६८/१६८/ १६८/१६८/३७४ छेदाः ग्रहदत्तायुः पिण्डं, वर्षमासदिवसघटिकान्तं संस्थाप्य् पृथक् पृथक गुणकारेण गुणयेत् घटिकानां षष्टया भागमपहृत्य दिवसेषु क्षिपेत्, दिवसानां त्रिंशता भागमपहृत्यमासेषुक्षिपेत् मासानां द्वादशभिर्भागमपहृत्य वर्षेसु क्षिपते्, अवशेषं सर्व स्थाप्य ततो वर्षस्थानेषु भागहारेण ३७४ भागमपहृत्यावाप्तं वर्षाणि। शेषं द्वादशभिः सगुण्यावस्थितान् मासान् संयोज्य छेदेन विभज्य अवाप्तं मासाः वर्षाणामधः स्थाप्याः। तदेवं शेषं त्रिंशता संगुण्यावस्थितानि दिनानी संयोज्य छेदेन विभज्यावाप्तं दिवसाः ते मासानामधः स्थाप्याः तदेवं शेषं षष्टया सङ्गुण्यावस्थिता घटिकाः संयोज्य छेदेन विभाज्यावाप्तं घटिका दिवसानामधः स्थाप्याः। एवं यथासम्भवं सर्वेषां ग्रहाणामन्तर्दशाः कार्याः। दशाविभागक्रमेणैवान्तर्दशाविभागकल्पना कर्तव्या। विदशोपदशाविभागोऽप्येवमेव।। ६।।

**सती -** पूर्वीच्या श्लोकानुसार जेवढ्या ग्रहांचे अन्तर्दशाधिकार मिळतील ते आणि दशा स्वामीच्या सर्व भागांना एकत्र करून त्याला समच्छेद द्यावा. ज्या संख्येने भाग (छेद) दिला संख्या सोडून द्यावी.आणि राहीलेले अंश त्यांची बेरीज केल्यावर जी संख्या येईल ती

भाजक असते. आणि प्रत्येक अंश हा वेगवेगळा गुणक असतो. अशाप्रकारे दशामानाला (प्रत्येकाचे असलेले वेगवेगळे अंश) वेगवेगळया गुणकाने गुणल्यानंतर येणाऱ्या संखेला भाजकाने भाग दिल्यानंतर अन्तर्दशा प्राप्त होते. हे खालील उदाहरणावरून सिध्द होईल. आता आपण अन्तर्दशा कशी काढावी ते पाहूया.

**उदाहरणार्थ –** जर लग्न बलवान असेल आणि त्याचे दशमान ५ वर्षे असेल, तसेच त्रिकोणात मंगळ गंह बलवान असेल ( त्रिकोण म्हणजे पंचम किंवा नवू स्थान), चतुरस्त्रात (म्हणजे ४ व ८ स्थान) गूरू बलवान असेल आणि सातव्या घरात शुक्र बलवान असेल तर सुत्रानूसार मंगळाचा १/३ भाग, चतुरस्त्र गुरूचा १/४ भाग आणि शुक्राचा १/७ भाग असेल.

आता पुर्ण दशा लग्नाचा १ अंश आणि त्या महादशेत अन्तर्दशेच्या त्या अंशाची बेरीज करू या. जसे लग्नाचा एक अंश, मंगळ ग्रहाचा १/३ अंश, गुरूचा १/४ अंश, शुक्राचा १/७ अंश यांची बेरीज करून त्याचा समच्छेद करू या

१ अंश (ल) + १/३(मं) + १/४(गु)+ १/७(शु) याचा लघुत्तम साधारण विभाजक काढू या तो

म्हणजे ८४ आता... $\dfrac{८४ + २८ + २१ + १२}{८४}$

इथे भाजक ८४ हा हर/छेद झाला म्हणून त्याला विचारात घेवू नये. आता अंश राहीले ते असे....

८४ (ल) + २८ (मं) + २१ (गु) + १२ (शु) हे अनुक्रमे त्या त्या ग्रहांचे गुणांक झालेत. या सर्वांची बेरीज केली असता १४५ इतकी येते. इथे १४५ ही संख्या भाजक झाली.

आता लग्न बलवान असून त्याचा दशामान ५ आहे आता अन्तर्दशा काढू या.

$\dfrac{\text{५ (लग्न दशमान)} \times \text{८४ (लग्न अंश)}}{\text{१४५}}$ म्हणजे $\dfrac{\text{४२०}}{\text{१४५}}$

४२० ला १४५ ने भाग दिल्यावर



१४५) ४२०(२ वर्ष

१३०
× १२ महिने
१४५) १५६०( १० महिने
− १४५०
०११०
× ३० दिवस
१४५) ३३०० ( २३ दिवस

अशाप्रकारे लग्नाची अन्तर्दशा २ वर्ष १० महीने २३ दिवस राहील

आता वरील पध्दतिप्रमाणे मंगळाची अन्तर्दशा काढू या.

५ (लग्न दशमान) × २८ (मंगळ अंश) भागीला १४५ = ० वर्ष ११ महीने १७ दिवस

शुक्राची अन्तर्दशा ५ × १२ (शुक्र अंश) भागीला १४५ = ० वर्ष ४ महीने २९ दिवस

पूर्ण दशमान ५ वर्ष.............

| | | | |
|---|---|---|---|
| लग्न अन्तर्दशा | २ | १० | २३ |
| मंगळ अन्तर्दशा | ० | ११ | १७ |
| गुरू अन्तर्दशा | ० | ०८ | २१ |
| शुक्र अन्तर्दशा | ० | ०४ | २९ |
| | ५ | ०० | ०० |

काल्पनिक उदाहरणावरून वरील अन्तर्दशा काढली आहे. आता वेगळयाप्रकारे अन्तर्दशा काढूया.

लग्नदशा १ असून लग्नात सूर्य आणि गुरू बलवान ग्रह आहेत.

लग्नदशा १ आणि त्यात सुर्याची अन्तर्दशा १/३ आणि गुरूची अन्तर्दशा १/४ आहे या तिघांची बेरीज करून त्याचा समच्छेद केला असता तो असा येतो

१ + १ + १ याचा लघुत्तम साधरण विभाजक १२ येतो
१ ३ ४

१२ ४ ३
१२ + ४ + ३ छेद/ हर १२ हा सोडून दिला
१२



१२ + ४ + ३ याची बेरीज १९ येते. (१९ हा भाजक झाला)

यावरून लग्न अन्तर्दशा काढूया............

लग्नाची दशा... वर्षादि ... १०। ५। २०। १५। ० आहे.

वरील प्रमाणे लग्न गुणांक १२ आहे

सूर्य गुणांक ४ आहे

गुरू गुणांक ३ आहे

लग्न अन्तर्दशा काढूया.. १०। ५। २०। १५ । ० गुणेला १२

= १२०। ६०। २४०। १८०। ० याला १९ ने (भाजक) भाग देउया

६। ६। ४१। १२। ३८ ही झाली लग्न अन्तर्दशा

सूर्य अन्तर्दशा काढूया.. सूर्य गुणांक ४ आहे

१०। ५। २०। १५ । ० गुणेला ४

= ४०। २०। ८०। ६०। ० याला १९ ने (भाजक) भाग देउया

२। २। १३। ४४। १३ ही झाली सूर्य अन्तर्दशा

गुरू अन्तर्दशा काढूया.. गुरू गुणांक ३ आहे

१०। ५। २०। १५ । ० गुणेला ३

= ३०। १५। ६०। ४५। ० याला १९ ने (भाजक) भाग देउया

१। ७। २५। १८। ९ ही झाली गुरू अन्तर्दशा

पडताळा :

६। ६। ४१। १२। ३८ लग्न अन्तर्दशा

२। २। १३। ४४। १३ सूर्य अन्तर्दशा

१। ७। २५। १८। ९ गुरू अन्तर्दशा

१०। ५। २०। १५ । ० पूर्ण दशा

विषेश : दशास्वामि पासून १। ५। ९। ७ । ४। ८ या स्थानात राहणारे ग्रह अन्तर्दशा स्वामि असतात.

**अध्याय १० संपला.**

* * * * * * * *

(११)

अध्याय अकरावा

# अष्टकवर्गाध्याय

## सूर्याष्टकवर्ग

*केन्द्रायाष्टद्विनवस्वर्कः स्वादार्किभौमतश्च शुभः।*
*षट्सप्तान्त्येषु सितात् षडायधीधर्मगो जीवात्।। १।।*
*उपचयगोऽर्कश्चन्द्रादुपचयनवमान्त्यधीगतः सौम्यात्।*
*लग्नादुपचयबन्धुव्ययस्थितः शोभनः प्रोक्तः।। २।।*

**भट्टोत्पल :** केन्द्रायेति। अथाष्टकवर्गः जन्मकाले यत्रार्को व्यवस्थितः तस्मात्स्थानात्केन्द्रायाष्टद्विनवसु १/४/७/१०/११/८/२/९ अर्कः शुभः, आर्किभौमाभ्यां एतेषु स्थानेषु शुभः। षट्सप्तान्त्येषु सितात् ६/७/१२ एतेषु शुक्राच्छुभः। षडायधीर्धमगो जीवात् ६/११/५/९ एतेषु स्थानेषु गुरोः सकाशाच्छुभः। चन्द्रादुपचयगाः ३/६/११/१०एतेषु चन्द्राच्छुभः। सौम्यादुपचयनवान्त्यधीयुतः ३/६/११/१०/९/१२/५ एतेषु सौम्याच्छुभः। लग्नादुपचयबन्धुव्ययस्थितः ३/६/११/१०/४/१२/एतेषु लग्नात् शुभः। इति सूर्यः ।। १-२।।

**सती -** सूर्य खालील स्थानी शुभ फळे देतो.

१) सूर्य आपल्या स्थानापासून आणि शनि, मंगळाच्या स्थानापासून १/४/७/१०/११/८/२/९ या स्थानी असता शुभ असतो.

२) सूर्य शुक्राचा स्थानापासून ६/७/१२ व्या स्थानी असता शुभ असतो.

३) सूर्य गुरूच्या स्थानापासून ६/११/५/९ या स्थानी असता शुभ असतो.

४) सूर्य चंद्र स्थानापासून ३/६/१०/११ या उपचय स्थानी असेल तर शुभ फलदायक असतो.

५) सूर्य हा बुध स्थानापासून ३/६/१०/११/९/१२/५ या स्थानी असेल तर शुभ असतो.



६) सूर्य हा लग्न स्थानापासून ३/६/१०/११/४/१२ या स्थानी असता शुभ फलदायक असतो.

## चन्द्राष्टकवर्ग

*शश्युपचयेषु लग्नात्साद्यमुनिः स्वात्कुजात्स्वनवधीषु।*
*सूर्यात् साष्टस्मरगस्त्रिषडायसुतेषु सूर्यसुतात्।। ३।।*
*ज्ञात् केन्द्रत्रिसुतायाष्टगो गुरोर्व्ययायमृत्युकेन्द्रेषु।*
*त्रिचतुः सुतनवदशमद्युनायगश्चन्द्रमाः शुक्रात्।। ४।।*

**भट्टोत्पल :** शश्युपचयेष्विति। चन्द्रो लग्नात् ३/६/११/१० एतेषु शुभः। स्वात् स्वस्थानात् प्रथम्सप्तमसहितेषूपचयेषु ३/६/१०/११/१/७ एतेषु शुभः। कुजात्स्वनवधीसहितेषूपचयेषु ३/६/१०/११/२/९/५ एतेषु शुभः। सूर्यात्साष्टस्मरगः ३/६/१०/११/८/७ एतेषु शुभः। शनैश्चरात् त्रिषडायसुतेषु ३/६/११/५ एतेषु शुभः। बुधात् केन्द्रत्रिसुतायाष्टगः १/४/७/१०/३/५/११/८ एतेषु शुभः। गुरोः व्ययायमृत्युकेन्द्रेषु १२/११/८/१/४/७/१० शुभः। शुक्रात् त्रिचतुःसुतनवमदशद्युनायगः ३/४/५/९/१०/७/११ एतेषु शुभः। इति चन्द्रः।। ३–४।।

**सती –** चंद्र खालील स्थानी असता शुभ असतो आणि शुभ फळे देतो.

१) लग्नापासून ३/६/१०/११ या स्थानी चंद्र हा शुभ असतो.
२) चंद्र आपल्या स्थानापासून ३/६/११/१०/१/७ या स्थानी शुभ असतो.
३) चंद्र हा मंगळाच्या स्थानापासून ३/६/११/१०/२/९/५ या स्थानी शुभ असतो.
४) सूर्यच्या स्थानापासून ३/६/११/१०/८/७ या स्थानी चंद्र असता तो शुभ असतो.
५) शनि पासून ३/६/११/५ हया स्थानी चंद्र असता तो शुभ असतो.
६) बुधा पासून १/४/७/१०/३/५/११/८ या स्थानी चंद्र असता शुभ असतो.
७) गुरू पासून १२/११/८/१/४/७/१० या स्थानी चंद्र असता तो शुभ असतो. तसेच
८) शुक्रा पासून ३/४/५/९/१०/७/११या स्थानी चंद्र असता चंद्र शुभ असतो व शुभफले देतो.

## भौमाष्टकवर्ग

*भौमः स्वादायस्वाष्टकेन्द्रगस्त्र्यायषट्सुतेषु बुधात्।*
*जीवाद् दशाय-शत्रु-व्ययेष्विनादुपचय-सुतेषु।। ५।।*
*उदयादुपचयतनुषु त्रिषडायेष्विन्दुतः समो दशमः।*
*भृगतोऽन्त्यषडष्टायेष्वसितात् केन्द्रायनववसुषु ।। ६।।*



**भट्टोत्पल :** भौम इति। भौमः स्वस्थानतः ११/२/८/१/४/७/१० एतेषु शुभः। बुधात् ३/११/६/५ एतेषु शुभः। जीवात् १०/११/६/१२ एतेषु शुभः। सूर्यादुपचयसुतेषु ३/६/१० /

११/५ एतेषु शुभः। भौमो लग्नात् ३/६/१०/११/१ एतेषु शुभः। इन्दुतः ३/६/११ एतेषु शुभः। चन्द्राद् दशमे समः न शुभो नाप्यशुभः। शुक्रात् १२/६/८/११ एतेषु शुभः। शनैश्चरात् १/४/७/१०/११/९/८ एतेषु शुभः। इति भौमः।। ५-६।।

**सती** - मंगळाष्टकवर्ग

**मंगळ खाली स्थानी असता शुभ फळे देतो.**

१) मंगळ आपल्या स्थानापासून ११/२/८/१/४/७/१० या स्थानात असता शुभ असतो.

२) मंगळ बुधापासून ३/११/६/५ या स्थानी असता शुभ असतो.

३) मंगळ गुरूपासून १०/११/६/१२ या स्थानी असता शुभ असतो.

४) मंगळ सूर्यापासून ३/६/११/१०/५ या स्थानी असता शुभ असतो.

५) मंगळ लग्नापासून ३/६/११/१०/१ या स्थानी असता शुभ असतो.

६) आणि मंगळ चंद्रापासून ३/६/११ या स्थानी असता शुभ असतो.

७) चंद्रपासून मंगळ दशम स्थानी असता तो सम शुभाशुभ फल रहित असतो.

८) मंगळ, शुक्रापासून १२/६/८/११ या स्थानी असता शुभ असतो.

९) आणि शनिपासून १/४/७/१०/११/९/८ या स्थानी मंगळ असता शुभ असतो.

**बुधाष्टकवर्ग**

*सौम्योऽन्त्यषण्णवायात्मजेष्विनात् स्वात् त्रितनुदशयुतेषु।।*
*चन्द्राद्द्विरिपुदशायाष्टसुखगतः स्वात् सादिषु विलग्नात्।। ७।।*
*प्रथमसुखायद्विनिधनधर्मेषु सितात् त्रिंधीसमेतेषु।*
*साशास्मरेषु सौरारयोर्व्ययायरिपुवसुषु गुरोः।। ८।।*

**भट्टोत्पल** : सौम्य इति। बुधः सूर्यात् १२/६/९/११/५ एतेषु शुभः। स्वस्थानात् १२/६/९/११/५/३/१/१० एतेषु शुभः। चन्द्रात् २/६/१०/११/८/४ एतेषु शुभः। लग्नात् २/६/१०/११/८/४/१ एतेषु शुभः। बुध शुक्रात् १/४/११/२/८/९/३/५ एतेषु शुभः। शनैश्चरात् १/४/११/२/८/९/३/५/१०/७ एतेषु शुभस्तथा शनैश्चराद् भौमाच्च १/४/११/२/८/९/३/५/१०/७ एतेषु शुभः। जीवात् १२/११/६/८ एतेषु शुभः। इति बुधः ।। ७-८।।

**बुधाष्टक वर्ग**

**सती** - बुध खालील स्थानी असता शुभ असतो आणि शुभ फळे देतो.



१) बुध, सूर्या पासून १२/६/९/११/५ या स्थानी असता शुभ असतो.

२) बुध आपल्या स्थानापासून १२/६/९/११/५/३/१/१० या स्थानी असता शुभ असतो.

३) बुध हा चंद्रापासून २/६/१०/११/८/४ या स्थानी असता शुभ असतो.
४) बुध हा लग्नापासून २/६/१०/११/८/४/१ या स्थानी असता शुभ असतो.
५) बुध हा शुक्रापासून १/४/११/२/८/४/३/५ या स्थानी असता शुभ असतो.
६) बुध हा शनि आणि मंगळापासून १/४/११/२/८/९/३/५/१०/७ या स्थानी असता शुभ असतो.
७) तसेच बुध हा गुरूपासून १२/११/६/८ या स्थानी असता शुभ असतो.

## गुरू अष्टकवर्ग

*जीवो भौमाद् द्व्यायाष्टकेन्द्रगोऽर्कात् सधर्मसहजेषु।*
*स्वात् सत्रिकेषु शुक्रान्नवदशलाभस्वधीरिपुषु ।। ९।।*
*शशिनः स्वरत्रिकोणार्थलाभगस्त्रिरिपुधीव्ययेषु यमात्।*
*नवदिक्सुखाद्यधीस्वायशत्रुषु ज्ञात् सकामगो लग्नात् ।। १०।।*

**भट्टोत्पल :** जीव इति। जीवो भौमात् २/११/८/१/४/७/१० एतेषु शुभः। सूर्यात २/११/८/१/४/७/१०/९/३ एतेषु शुभः। स्वस्थानात् २/११/८/१/४/७/१०/३ एतेषु शुभः। शुक्रात् ९/१०/११/२/५/६ एतेषु शुभः। जीवः शशिनः ७/९/५/२/११ एतेषु शुभः। शनैश्चरात् ३/६/५/१२ एतेषु शुभः। बुधात् ९/१०/४/१/५/२/११/६ एतेषु शुभः। लग्नात् ९/१०/४/१/५/२/११/६/७ एतेषु शुभः। इति गुरूः ।। ९-१०।।

**सती –** गुरू खालील स्थानी असता शुभ असतो
१) गुरू हा मंगळापासून २/११/८/१/४/७/१० या स्थानी असेल तर शुभ असतो.
२) गुरू हा सूर्यापासून २/११/८/१/४/७/१०/९/३ या स्थानी असता शुभ असतो.
३) गुरू हा स्वतःच्या स्थानापासून २/११/८/१/४/७/१०/३ या स्थानी असता शुभ असतो.
४) गुरू हा शुक्रपासून ९/१०/११/२/५/६ या स्थानी असता शुभ असतो.
५) गुरू हा चंद्रापासून ७/९/५/२/११ या स्थानी असता शुभ असतो.
६) गुरू हा शनिपासून ३/६/५/१२ या स्थानी असता शुभ असतो.
७) गुरू हा बुधापासून ९/१०/४/१/५/२/११/६ या स्थानी असता शुभ असतो.
८) गुरू हा लग्नापासून ९/१०/४/१/५/२/११/६/७ या स्थानी असता शुभ असतो.

## शुक्राष्टकवर्ग

*शुक्रो लग्नादासुतनवाष्टलाभेषु सव्ययश्चन्द्रात्।*

*स्वात् सादिगासितात् त्रिसुखात्मजाष्टादिग्धर्मलाभेषु ।। ११।।*
*वस्वन्त्यायेष्वर्कान्नवदिग्लाभाष्ट धीस्थितो जीवात्।*

*ज्ञात् त्रिसुतनवायारिष्वायसुतापोऽक्लिमेषु कुजात् ।। १२।।*

**भट्टोत्पल :** शुक्र इति। शुक्रो लग्नात् १/२/३/४/५/९/८/११ एतेषु शुभः।, चन्द्रात् १/२/३/४/५/९/८/११/१२ एतेषु शुभः, स्वात् स्वस्थानात् १/२/३/४/५/९/८/११/१० एतेषु शुभः।, शनैश्चरात ३/४/५/८/१०/९/११ एतेषु शुभः। शुक्रः सूर्यात् ८/१२/११ एतेषु शुभः। जीवात् ९/१०/११/८/५ एतेषु शुभः। ज्ञाद् बुधात् ३/५/९/११/६ एतेषु शुभः। भौमात् ११/५/३/६/९/१२ एतेषु शुभः। इति शुक्रः।। ११-१२।।

**सती :** शुक्र खालील स्थानी असता शुभ असतो

१) शुक्र लग्नापासून १/२/३/४/५/९/८/११ या स्थानी असता शुभ असतो.

२) शुक्र हा चंद्रपासून १/२/३/४/५/९/८/११/१२ या स्थानी असता शुभ असतो.

३) शुक्र हा स्वतःच्या स्थानापासून १/२/३/४/५/९/८/११/१० या स्थानी असता शुभ असतो.

४) शुक्र हा शनिपासून ३/४/५/८/१०/९/११ या स्थानी असता शुभ असतो.

५) शुक्र हा सूर्यापासून ८/१२/११ या स्थानी असता शुभ असतो.

६) शुक्र हा गुरूपासून ९/१०/११/८/५ या स्थानी असता शुभ असतो.

७) शुक्र हा बुधापासून ३/५/९/११/६ या स्थानी असता शुभ असतो.

८) शुक्र हा मंगळापासून ११/५/३/६/९/१२ या स्थानी असता शुभ असतो.

### शन्यष्टकवर्ग

*स्वात् सौरिस्त्रिसुतायारिगः कुजादन्त्यकर्मसहितेषु।*
*स्वायाष्टकेन्द्रगोऽर्काच्छुक्रात् षष्ठान्त्यलाभेषु।। १३।।*
*त्रिषडायगः शशाङ्कादुदयात् ससुखाद्यकर्मगोऽथ गुरोः।*
*सुतषट्व्ययायगो ज्ञात् व्ययायरिपुदिङ्नवाष्टस्थः ।। १४।।*

**भट्टोत्पल :** स्वात्सौरिरिति। शनिः स्वस्थानात् ३/५/११/६ एतेषु शुभः।, कुजात् ३/५/११/६/१२/१० एतेषु शुभः।, सूर्यात् २/११/८/१/४/७/१० एतेषु शुभः।, शुक्रात् ६/१२/११ एतेषु शुभः।, चन्द्रात् ३/६/११ एतेषु शुभः।, लग्नात् ३/६/११/४/१/१० एतेषु शुभः।, जीवात् ५/६/१२/११ एतेषु शुभः, बुधात् १२/११/६/१०/९/८ एतेषु शुभः।, इति शनिः।। १३-१४।।

**सती :** शनि खालील स्थानी असता शुभ असतो



१) शनि आपल्या स्थानापासून ३/५/११/६ या स्थानी असता शुभ असतो.

२) शनि हा मंगळापासून ३/५/११/६/१२/१० स्थानी असता शुभ असतो.

३) शनि हा सूर्यापासून २/११/८/१/४/७/१० या स्थानी असता शुभ असतो.
४) शनि हा शुक्रापासून ६/१२/११ या स्थानी असता शुभ असतो.
५) शनि हा चंद्रापासून ३/६/११ या स्थानी असता शुभ असतो.
६) शनि हा लग्नापासून ३/६/११/४/१/१० या स्थानी असता शुभ असतो.
७) शनि हा गुरूपासून ५/६/१२/११ या स्थानी असता शुभ असतो.
८) शनि हा बुधापासून १२/११/६/१०/९/८ या स्थानी असता शुभ असतो.

**अष्टकवर्ग-फल**

*स्थानेष्वेतेषु शुभाः शेषेष्वहिता भवन्ति चाष्टानाम्।*
*अशुभशुभविशेषफलं ग्रहाः प्रयच्छन्ति चारगताः।। १५।।*

**भट्टोत्पल :** स्थानेष्वेतेषु शुभा इति। ते ग्रहा एतेषु स्थानेषु पूर्वोक्तेषु हिताः शेषेषु अशुभाः। तत्र शुभाऽ शूभविशेषमन्तरं कृत्वा यद्विशिष्यते तद्वशात् शुभाऽशुभं वाच्यम्। तदेव ग्रहाः राशौ राशौ चारतः फलं प्रयच्छन्ति। एतदुक्तं भवति। केन्द्रायाष्टद्विनवस्वित्यनेन पाठेन यान्युक्तानि तेषु शोभनं फलं शेषेपु अशोभनम्। यानि शुभस्थानानि गदितानि तानी बिन्दूपलक्षितानि कार्याणि यानि अशुभानि तानि रेखोपलक्षितानी, ततः इष्टानिष्टयोर्विशेषं कृत्वा यदधिकं भवति, तत्फलं ज्ञेयम्। एकमेकत्र मिश्रितानि अष्टौ फलानि भवति। यत्र शुभाऽशुभयोः साम्यं तत्र समत्वं ज्ञेयम्। यत्र बिन्द्वष्टकं जातं तत्र शुभं पूर्णम्। यत्र षड्बिन्दवः तत्र पादोनं फलम्। यत्र बिन्दुचतुष्टयं तत्रार्धम्। यत्र बिन्दुद्वयं तत्र पादफलं ज्ञेयम्। एवमष्टकवर्गैः सर्वेषां विचारः करणीयः।

*'बिन्दोरधिके शुभदं रेखाऽधिके नैव शोभनं भवति।*
*विफलं गोचरगणितमष्टकवर्गेण निर्दिष्टम्।। १५।।'*

**अष्टकवर्ग फल**

**सती :** या पूर्वी वर सांगीतलेल्या घरात जर ग्रह असेल तर शुभ फले देतो आणि इतर स्थानी असता अशुभ फले देतो. अशाप्रकारे आठही स्थानांना शुभ आणि अशुभ असे चिन्ह लिहून ज्या स्थानात गोचरीचे चार वंश ग्रह जेंव्हा जातो त्यावेळी अशुभ फळे देतो. आणि ज्या स्थाना शुभ ग्रह आधिक असतील त्या स्थानात गोचरीत चार वंश ग्रह जेंव्हा जातो त्यावेळी तो ग्रह शुभ फळ देतो.

**अध्याय ११ वा संपला.**



* * * * * * * *

(१२-क)

अध्याय बारावा

# प्रकीर्णाध्याय

## क ) योग आणि प्रवज्या योग

### अनफा, सुनफा, दुरूधरा आणि केमद्रुम योग

*रविवर्ज्यं द्वादशगैरनफा चन्द्राद् द्वितीयगैः सुनफा।*
*उभयस्थितैर्दुरूधरा केमद्रुमसंज्ञकोऽतोऽन्यः।। १।।*

**भट्टोत्पल :** रविवर्ज्यमिति। अथ प्रकीर्णाध्यायं व्याख्यास्यामः। तत्रादौ चन्द्रयोग प्रकरणम्। रविवर्ज्यं सूर्य वर्जयित्वा चन्द्राद् द्वादशे स्थाने भौमबुधजीवसित सौराणामन्यतमो भवति तदा अनफा नामयोगो भवति। अत्र रविवर्ज्यमित्युक्तम्। तत्रादित्यौ योगकर्तृकग्रहगणनया न गण्यते। अथ तेषामेव ग्रहाणां मध्ये कश्चिच्चन्द्राद् द्वितीयस्थाने भवति तदा सुनफानाम योगो भवति। अथ चन्द्राद् द्वितीयद्वादशे स्थाने त एव ग्रहा भवन्ति तदा दुरूधरायोगः। यदा चन्द्राद् द्वितीयद्वादशयोः स्थानयोरूभयोरपि भौमादीनां मध्ये कश्चिन्न भवति तदा केमद्रुमयोगो भवति।। १।।

**सती –** सूर्याला सोडून जर कोणताही ग्रह चंद्राच्या बाराव्या घरात असेल तर अनफा योग होतो.






अनफा योग

**२ ) सुनफा योग :** सूर्य सोडून चंद्राच्या दूसऱ्या घरात इतर ग्रह किंवा इतर ग्रहांपैकी एक ग्रह असेल तर सुनफा योग होतो.




**सुनफा योग**

सूर्य सोडून चंद्राच्या दुसऱ्या स्थानी इतर ग्रह

**३ ) दुरूधरा योग :** चंद्राच्या दूसऱ्या आणि बाराव्या घरात सूर्य सोडून इतर ग्रह असल्याने दुरूधरा योग होतो.

चंद्राच्या दूसऱ्या आणि बाराव्या घरात सूर्य सोडून इतर ग्रह






**दुरूधरा योग**

**४ ) क्रेमदुम योग :** चंद्राच्या दूसऱ्या आणि  बाराव्या घरात कोणताच ग्रह नसेल तर क्रेमदुम योग होतो.




**क्रेमदुम योग**

दूसऱ्या आणि  बाराव्या घरात कोणताच ग्रह नाही : क्रेमदुम योग

**अनफादि चारही योगांची फळे**

*सच्छीलं विषयसुखान्वितं प्रभुं ख्यातियुक्तमनफायाम्।*
*सुनफयां धीधनकीर्तियुक्तमात्मार्जितैश्चर्यम्।। २।।*
*बहुभृत्यकृटुम्बारम्भं सुखभोगान्वितं च दौर्धरिके।*
*भृतकं दुःखितमधनं जातं केमद्रुमे विद्यात्।। ३।।*

**भट्टोत्पल :** सच्छीलमिती। शोभशीलं विषयसुखान्वितं इन्द्रियसुखान्वितं प्रभुं समर्थ ख्यातियुक्तं कीर्तियुक्तं एवंविधमनफायां भवति। सुनफायां धीः बुद्धिः, धनं अर्थः, कीर्तिः ख्यातिः एभिर्युक्तमात्मार्जितैश्चर्य स्वयमर्जितार्थ विद्यात्। एवंविधं सुनफायोगे जातो भवति। अथ दुरूधराकेमद्रुमयोर्जातस्य स्वरूपमाह–बहुभृत्यं बहुकुटुम्बं बहुकायरिम्भं नित्योद्विग्नचित्तं एवंविधं दुरूधरायोगे जातं जानीयात्। भृतकमिती। भृतकं कर्मकरं दुःखितं दुखान्वितमधनं दरिद्रम् एवंविधं केमद्रुमे जातं विद्यात्।। २–३।।

**सती –**

१) अनफा योगात जन्मलेला जातक सुशील, सर्व सुखांनी युक्त, सामर्थ्यवान, प्रभु स्वामी किर्तिवान यशस्वी असतो.



२) सुनफा योगात जन्मलेला जातक बुध्दिमान, धनवान यशस्वी तसेच स्वतःच्या सामथर्याने/

स्वकष्टावर धनार्जन करणारा असतो.

३) दुरूधरा योगात जन्मलेला जातक अनेक नोकरांनी युक्त, मोठ्या कुटुंबाचा, अनेक कार्य करणारा तसेच सर्व प्रकारचे सुख मिळविणारा असतो.

४) क्रेमदुम योगात जन्मलेला जातक नोकरी करणारा, दुःखी आणि धनहीन असतो.

**अनफादि योग कारक ग्रहांचे फल**

*भौमः शूरश्चण्डो महाधनो ज्ञानवान् बुधो निपुणः।*
*ऋृध्दः शुक्रः सुखितो गुरूर्गुणाढ्यो नृपतिपूज्यः।। ४।।*

*बह्वारम्भः सौरिर्बहुभृत्याः पूजितो गुणैर्विद्धः।*
*एषां गुणैः समगुणा ज्ञेया योगोद्भवाः पुरूषाः।। ५।।*

**भट्टोत्पल :** भौम इति। यदा सुनफानफादुरूधराणां भौमो योगकर्ता भवति तदा चौरश्चण्डश्च भवति। चण्डस्तीक्ष्णः। बुधश्चेत् तदा महाधनो ज्ञानवान् निपुणश्च। शुक्रश्चेत् तदा ऋृध्दः ईश्वरः सुखी। गुरूश्चेत् तदा गुणाढ्यो राजपूज्यश्च। सौरिश्चेत् तदा बहुकार्यारम्भी बहुभृत्यः बहुसेवकः पूजितः सर्वैः सेवितः, गुणैर्वृद्धश्च। एषां गुणैरिती–एषां ग्रहाणां गुणैः समगुणा ज्ञेयाः। तत्र यदेव ग्रहस्य रूपमुक्तं तत्कृते अनफासुनफादुरूधरायोगे जातः पुरूषः तादृशो भवति। द्वाभ्यां कृते द्वयोर्गुणसम्बन्धं प्राप्नोति। बहुभिः कृते बहुसम्बन्धी भवति।। ४–५।।

**सती –** चंद्रापासून बनणारे अनफा,सूनफा ई. योगांचे फळ ग्रहानुसार

– मंगळ ग्रह योगकारक असेल तर जातक हा प्राक्रमी साहसी आणि महाधनवान

– बुध हा ग्रह योगकारक असेल तर जातक महाधनवान, ज्ञानी तसेच कार्य संपादन करण्यात हुशार आहे.

– शुक्र हा ग्रह योगकारक असेल तर जातकाला समृध्दि देणारा आणि सुखी ठेवणारा असतो.

– गुरू हा ग्रह योगकारक असेल ती जातक गुणवान तसेच राजाकडून सन्मानित असतो.

– शनि हा ग्रह योगकारक असेल तर जाकत नोकरांनी युक्त आणि अनेक कार्याची सुरूवात करणारा आहे. स्वतःच्या गुणामुळे पुजल्या जाणारा असतो.

वरीलपैकी जो ही ग्रह अनफा,सुनफा,दुरधरा, केमद्रूम योग कारक असेल त्या ग्रहाच्या गुणानुसार जातकात तसे गुण येतात. जर एकापेक्षा अधिक ग्रह या योगात असतील तर त्यांचे मिश्रीत फळ मिळते.

## सूर्य पासून दूसरे स्थान

*सूर्याद् द्वितीयमृक्षं वेशिस्थानं प्रकीर्तितं यवनैः।*
*तच्चेष्टग्रहयुक्तं जन्मनि चेष्टासु च विलग्नम्।। ६।।*

**भट्टोत्पल :** सूर्यादिति। यस्मिन् राशावादित्यो व्यवस्थितस्याद्यो द्वितीयो राशिस्तस्य वेशीति संज्ञा यवनैः प्रकीर्तिता कथिता वेशिस्थानं जन्मनीष्टग्रहयुक्तं प्रशस्तं, चेष्टासु यात्रासु च विलग्नं तदा वेशिस्थानं प्रशस्तमिष्यते।। ६।।

**सती** – सूर्य ज्या धरात असेल त्यापासून दुसऱ्या स्थानाला यवनाचार्यांनी वेशिस्थान म्हटले आहे. जर जन्माच्या वेळी वेशीस्थानात शुभ ग्रह असेल, स्वस्वामीने युत किंवा दृष्ट असेल तर शुभ कारक होतो. तसेच यात्रेच्या वेळी लग्नापासून वेशीस्थान शुभ ग्रहाने युक्त किंवा टृष्ट असेल तर शुभकारक असतो.

## दोन ग्रहांच्या योगाव्दारे मिळणारे फळ

*यन्त्रज्ञं पापरतं निपुणं क्रूरं च शस्त्रवृत्तिं च।*
*धातुज्ञं च क्रमशश्चन्द्रादिभिरन्वितः सूर्यः।। ७।।*

**भट्टोत्पल :** यन्त्रज्ञमिति। अथ द्विग्रहयोगप्रकरणम्–तत्रादावादित्ये चन्द्रादियुक्ते जातस्य स्वरूपमाह–चन्द्राद्यर्कयोगः आदित्ये चन्द्रमसा युक्ते जातं यन्त्रज्ञं ज्ञेयम्। यन्त्राणि शतघ्नीप्रभृतीनि जानाति। भौमेन पापरतम्। बुधेन निपुणं कार्ये सूक्ष्मदृष्टिम्। बृहस्पतिना क्रूरम्। शुक्रेण शस्त्रवृत्तिं क्षात्रवृत्तिम्। शनैश्चरेण धातुज्ञं सुवर्णादिज्ञम्।। ७।।

**सती –** जन्मकुंडलीत जन्माच्या वेळी

- सूर्य जर चंद्राने ने युक्त असेल तर जातक यांत्रीक म्हणजे यंत्र, मशीन ईत्यादी चे कामे जाणणारा असतो.
- सूर्य जर मंगळाने युक्त असेल तर जातक पापी असतो म्हणजे पाप कर्म करणारा असतो.
- बुधाने युक्त असेल तर कार्यात कुशल असतो.
- सूर्य जर गुरू ने युक्त असेल तर क्रूर स्वभावाचा असतो. आणि
- शुक्राने युक्त असेल तर शस्त्र अस्त्रा द्वारे कमाई करून जीवन जगणारा. त्याचे उपजीवीकेचे साधन म्हणजे शस्त्र असते.
- सूर्य जर शनिने युक्त असेल तर अष्ट धातुबद्दल त्याला जाणकारी असते. त्या धातूंपासून बनणाऱ्या वस्तुंचा व्यापार करतो.

*चन्द्रोऽङ्गारकपूर्वैः कूटज्ञं प्रश्रितं कुलाभ्यधिकम्।*
*वस्त्रव्यवहारज्ञं क्रमेण पौनर्भवं चापि।। ८।।*

**भट्टोत्पल :** चन्द्रोऽङ्कारकेति। चन्द्रोऽङ्गारकादियुक्ते जातस्य स्वरूपमाह–चन्द्रेऽङ्गारकेण युक्तः कूटज्ञः कुलकुशलहारी भवेत्। बुधेन युक्तः प्रसृतं वाक्यनिपुणं प्रियवादी भवेत्। जीवेन युक्तः कुलप्रसिद्धः भवेत्। शुक्रेण युक्तः वस्त्रविक्रयज्ञः भवेत्। शनैश्चरेण युक्तः पुनर्भूपुत्रः स्यात्।। ८।।

**सती –** जन्माचे वेळी चंद्र हा मंगळा सोबत असेल तर जातक मायावी असतो.

- बुधाने युक्त असेल तर जातक विनयशील असतो
- गुरू ने युक्त असल्यास जातक कुंटुबात श्रेष्ठ असतो.
- शुक्राने युक्त असल्यास जातक कापडाचा व्यापार करतो. त्यात कुशल असतो. आणि
- जर का चंद्र शनिने युक्त असेल तर जातक हा दुसरा पती करणाऱ्या स्त्रीचा मुलगा असतो.

*मल्लो रक्षोऽन्यस्त्रीसक्तो दुःखान्वितः कुजो ज्ञाद्यैः।*
*ज्ञो जीवाद्यैर्गीतज्ञं वाग्मिनं महेन्द्रजालज्ञम्।। ९।।*

**भट्टोत्पल :** मल्ल इति। अङगारके बुधेन युक्तः जातो मल्लो भवति। जीवेन रक्षकः। शुक्रेण परदाररतः। सौरेण दुःखान्वितो भवति। बुधे गुर्वादियुक्ते जातस्य स्वरूपमाह–बुधे जीवेन युक्तो गीतज्ञो भवति। शुक्रेण वाग्मी पण्डितो भवति। शनैश्चरेण युक्तो मायाज्ञः इन्द्रजालज्ञश्च भवति।। ९।।

**सती –** जन्माचे वेळी

- जर मंगळ हा बुधाने युक्त असेल तर जातक हा शुरवीर असतो.
- जर मंगळ हा गुरूने युक्त असेल तर तो दुसऱ्याचे संरक्षण करणारा असतो.
- जर मंगळ हा शुक्राने युक्त असेल तर जातक व्याभिचारी परस्त्री सोबत जीवन जगणारा असतो. तो चांगला वक्ता असतो
- मंगळ जर शनिने युक्त असेल तर तो दुःखी कष्टी असतो. सतत दुःख भोगणारा असतो.
- मंगळ हा जर बुध आणि गुरू ने युक्त असेल तर तो जातक संगीततज्ञ असतो.
- मंगळ शनिने युक्त असेल तर इन्द्रजालाचे ज्ञान असणारा असतो.

*जीवः सितेन बहुगुणमसितेन समन्वितोऽत्र घटकारम्।*
*स्त्रीस्वं मन्देन सितस्त्रिभिरप्येवं फलानि वदेत्।। १०।।*

**भट्टोत्पल :** जीव इति। सितादियुक्ते जातस्य स्वरूपमाह–जीवः सितेन युतो जातं बहुगुणं करोति। शनैश्चरेण समन्वितो यदा जीवः तस्मिन् योगे जातं घटकारं कुम्भकारं करोति। शुक्रशनैश्चरयोगे जाते स्त्रीधनं करोति। स्त्रीसकाशाद्धनमाप्नोति। अन्ये च स्त्रियो वल्लभत्वाद्धनं प्रयच्छन्ति। इति स्त्रीणां वल्लभत्वाद्धनागम इत्यर्थः। त्रिभिरप्येवं फलानि वदेत्। यदा ग्रहास्त्रय एव राशौ भवन्ति तदा द्विग्रहयोगवत् त्रयस्यापि फलं वक्तव्यम्। यदार्कचन्द्राङ्गारका एकराशिगतास्तदाऽऽ दित्यचन्द्रयोगवत्फलमुक्तं, चन्द्राङ्गारकयोगेन यत्फलमुक्तं, आदित्याङ्गारकयोगेन च यत्फलमुक्तं तत्फलं त्रयमपि वाच्यम्। एवं यथासम्भवं ग्रहत्रयस्य फलं वाच्यम्।। १०।।

**सती –** जन्माचे वेळी

- गुरू जर शुक्राने युक्त असेल तर तो जातक अत्यंत गुणवान असतो.
- गूरू जर शनिने युक्त असेल तर कुंभार असतो. मातीपासून बनविलेल्या वस्तू विकून चरीतार्थ चालविणारा असतो.
- जन्माचे वेळी शुक्र जर शनिने युक्त असेल तर तो जातक स्त्रीच्या द्वारे पैसा कमवणारा असतो. अशा प्रकारे तीन ग्रहांच्या योगद्वारे फलादेश समजून घ्यावा व सांगावा. युति चा अर्थ एकाच दोन ग्रह असणे.

## प्रव्रज्या योग

*चतुरादिभिरेकस्थैः प्रव्रज्यां स्वां ग्रहः करोति बली।*
*बहुवीर्यैस्तावत्यः प्रथमा वीर्याधिकस्यैव।। ११।।*

**भट्टोत्पल :** चतुरादिभिरिती। अथ चतुर्ग्रहयोगनिरूपणम्। यस्य जन्मनि ग्रहाश्चत्वार एकराशिगता भवन्ति स प्रव्रज्यामाप्नोति। तेषामेकराशिगतानां मध्ये यो बली भवति स स्वां प्रव्रज्यां करोति ग्रहः। बहुवीर्यैरिति–यदि बहवो ग्रहा बलिनो भवन्ति तदा बह्व्यः प्रव्रज्याः बहूनां सम्बन्धिनीः प्रव्रज्याः प्राप्नोति। एतेषां ग्रहाणां मध्ये योऽतिबली पूर्व तस्यैव प्रव्रज्या वक्तव्या। अन्येषां बलं विचार्य उत्तरोत्तरं प्रव्रज्या वक्तव्या। चतुरादिष्वेकस्थेषु यदि कश्चिद् ग्रहो न बली भवति तदा जातस्य प्रव्रज्या नैव वक्तव्या।। ११।।

**सती – प्रव्रज्या योग :** जर एका राशीत एकापेक्षा अनेक ग्रह असतील तर प्रव्रज्या (घर सोडणारा) योग होतो. हया ग्रहापैकी जो ग्रह अधिक बलवान असेल तो ग्रह आपली प्रव्रज्या करतो. जर अनेक ग्रह बलवान असतील तर अनेक प्रव्रज्या होतात. अनेक

प्रव्रज्या मध्ये प्रथम प्रव्रज्या अधिक बलवान ग्रहाची असते. त्यानंतर बलानुसार इतर ग्रहांची अनुक्रमे दुसरी,तिसरी ईत्यादी प्रव्रज्या होतात.

## सूर्यादि ग्रहांपासून प्रव्रज्या योग

*तापसवृद्धश्रावकरक्तवटाजीविभिक्षुचरकाणाम्।*
*निर्ग्रन्थानां वार्कात् पराजितैः प्रच्युतिर्बलिभिः।। १२।।*

**भट्टोत्पल :** तापसवृद्धेति। तत्र न ज्ञायते कस्य का प्रव्रज्या तदर्थमाह–चतुरादीनामेकस्थानां मध्यादर्के बलवति तापसो भवति। तापसो वानप्रस्थः। चन्द्रे बलिनी वृद्धः श्रावकः कापालिकः। भौमे बलिनि रक्तपटः। बुधे आजीवी एकदण्डी। गुरौ बलवति भिक्षुः त्रिदण्डी। शुक्रे बलिनी चरकः चक्रधरः। सौरे बलवति निर्ग्रन्थो नग्नः क्षपणकः प्रावरणरहित इत्यर्थः। अर्कादारभ्य क्रमेण पराजितैः प्रच्युतिबलिभिरिति। चतुर्णामेकस्थानां यो बली ग्रहः स चेत् ग्रहयुद्धऽन्येन ग्रहेण पराजितो भवति तदा ग्रहोक्तप्रव्रजितो भूत्वा नरस्तां त्यजति। एवं बहुषु बलवत्सु पराजितेष्षु बह्वीष्वपि प्रव्रज्यास्वस्थितस्तास्त्यजति।। १२।।

**सती –** सूर्यादि ग्रहांमुळे होणारे प्रव्रज्या योग.

प्रव्रज्या कारक ग्रहांमध्ये जर सूर्य बलवान तर वानप्रस्थ, चंद्र बलवान असेल तर जाकत कापालिक होतो.

मंगळ बलवान असेल तर लाल वस्त्र घालणारा म्हणजे शक्तीचे उपासना करणारा.
बुध बलवान असेल तर एकदण्डी
गुरू बलवान असेल तर त्रिदण्डी
शुक्र बलवान असेल तर चक्रधारी योगी.
शनि बलवान असेल तर दिगंबर होतो. अशाप्रकारे प्रव्रज्या योगाचे संम्प्रदाय भेद आहेत. प्रव्रज्या कारक ग्रह जर युध्दात पराजयी होत असेल तर प्राप्त प्रव्रज्या ला सोडून विजयी ग्रहाच्या प्रव्रज्येला धारण करतो. म्हणजे सम्प्रदाय बदलवतो.

**विशेष :** ग्रहांमध्ये राशी अंश कला, विकला एक होते त्या युध्द मानले जाते. उत्तरेला असलेला ग्रहाला विजयी तर दक्षिणेला असलेल्या ग्रहाला पराजयी समजावे.

## प्रव्रज्या योगात विशेषता

*दिनकरलुप्तमयूखैरदीक्षिता भक्तिवादिनस्तेषाम ।*
*याचितदीक्षा बलिभिःपराजितैरन्यदृष्टैर्वा ।। १३।।*



**भट्टोत्पल :** दिनकरलुप्तेति। अत्रैव विशेषमाह–चतुरादीनामेकास्थानानां यावन्तो बलिनो ग्रहास्तावन्तः प्रव्रज्यादायकास्तत्रापि बलिनां मध्ये यावन्तो रविलुप्तकिरणा अस्तमितास्तावन्तः

स्वां स्वां प्रव्रज्यां न प्रयच्छन्ति। किन्तु ग्रहप्रव्रज्यां प्रव्रजितानां मध्ये भक्तिं प्रयच्छन्ति। तत्र रविलुप्तकिरणोऽस्तमय एकस्मिन्नेव राशिगतेऽर्केण संयुक्तः अस्तमितो भवति। पृथग्राशिनामपि युक्तोऽस्तमितो भवति। याचितदीक्षा इति–चतुरादीनामेकस्थानां बली ग्रहः समागमेऽन्येन ग्रहेण निर्जितोऽन्येन च दृश्यते तदा प्रव्रज्यां याचमानोऽपि नाप्नोति। पूर्वोक्तैः बलिभिः पराजितैः प्रच्युतस्तदाऽन्यदृष्टैर्वेति विशेषणम्। वा शब्दश्च शब्दस्यार्थे।। १३।।

**सती –** प्रव्रज्या योग कारक ग्रह जर सूर्याच्या सानिध्यात अस्त होत असेल तर तो दीक्षा–हीन राहून प्रव्रज्या धर्मातच राहतो. जर योगकारक ग्रह बलवान ग्रहाकडून पराजित असेल किंवा इतर ग्रहाने दृष्ट असेल तर मात्र दीक्षेची याचना करतो. दीक्षित होऊ शकत नाही. चार किंवा जास्त ग्रह एका राशित असतील तर त्यापैकी बलवान ग्रह योगकारक असतो.

## ( १२-ख )
## राशिफल निरूपण

चर–स्थिर–द्विस्वभाव राशि आणि त्याची फळे

***अस्थिरविभूतिमित्रं चलनमटनं स्खलितनियममपि चरभे।***
***स्थिरभे तद्विपरीतं क्षमान्वितं दीर्घसूत्रं च।। १।।***
***द्विशरीरे त्यागयुतं कृतज्ञमुत्साहितं विविधचेष्टम्।***
***ग्राम्यारण्यजलोद्भवराशिषु विद्याच्च तच्छीलान्।। २।।***

**भट्टोत्पल :** अस्थिरेति। अथ राशिशीलनिरूपणम्। अस्थिरविभूतिं अनियतविभूतिं अस्थिरमित्रं चचलं कर्मस्वनवस्थितम्, अटनं परिभ्रमणशीलं स्वस्खलितनियमं चलितव्रतं एवंविधं चरराशौ स्थिते चन्द्रे जातं भवति। स्थिरभे तद्विपरीतमिति। स्थिरमित्रं अचलं नटनं नो स्खलितनियमं न केवलमेतत् क्षमान्वितं दीर्घसूत्रं चिरेण कार्यानुष्ठानं एवंविधं स्थिरराशौ चन्द्रे जातं भवति। द्विशरीरे त्यागयुक्तम्। दातारं कृतज्ञं प्रसिद्धं उत्साहितमुत्थानशीलं विविधचेष्टमनेकक्रियकारिणं एवंविधं द्विस्वभावराशौ चन्द्रे विद्यात्। ग्राम्यारण्येति। ग्राम्यराशयो मिथुनकन्यातुलाकुम्भाः धन्विपूर्वार्द्धम्, एतेषामन्यतमस्थे चन्द्रमसि जाता ग्रामशीला भवन्ति, ग्रामशीला ग्रामप्रिया अरण्यसलिलभीरवः। अरण्या मेषवृषसिंहाः धनुः पश्चिमार्ध मकरपूर्वार्द्धमत्र जाता अरण्यप्रिया भवन्ति,ग्रामसलिलभीरवश्च। जलोद्भवाः कर्कमीनमकरान्त्यभागा एतेषामन्यतमस्थे चन्द्रमसि जाता जलप्रिया भवन्ति, ग्राम्यारण्यभीरवश्च। वृश्चिकस्थे चन्द्रमसि जाता ग्राम्यारण्यशीला भवन्ति।। २।।

**सती –**



१) जन्माचे वेळी चंद्र जर चर राशीत (१,४,७,१०) असेल तर तो अस्थायी ऐश्वर्य, क्षणिक मित्रता देतो, चंचल प्रकृतिचा फिरणारा, आणि स्वतःच्या प्रतिज्ञेपासून निमुख

(विरूध्द) राहणारा असतो. आपलेच नियम तोडणारा असतो.

२) जर चंद्र हा स्थिर राशित (२,५,८,११) असेल तर चर राशित असतांनाच्या फळाच्या उलट फळे देतो. म्हणजे अंचल संपत्ती वाला, स्थीर मैत्री स्थीर स्वभाव आपल्या नियमाने चालणारा, क्षमाशील हळू हळू काम करणारा.

३) जन्मावेळी चंद्र जर द्विस्वभाव राशित (३,६,९,१२) असेल तर दानधर्म, त्यागी, कृतज्ञ करणारा, उत्साही आणि उद्योगी असतो. द्विपाद/ग्राम्य राशित (३,६,७,११ धनु पुर्वार्ध) चंद्र असेल तर तो जातक खेडेगांवात जीवन व्यतित करणारा करणारा, असतो.

४) चंद्र चतुष्पाद/अरण्य राशित (१,२,५,धनु उत्तरार्ध, मकर उत्तरार्ध) असता तो जातक जंगलात राहणारा असतो. तसेच

५) चंद्र जर जलचर राशित असेल तर पाण्याची आवड असणारा असतो तसेच वृश्चिक राशित जन्मलेल्या जातकाला गांव आणि जंगल दोन्ही प्रिय असतात.

## चंद्रावर दृष्टीची फळे

*क्षेत्राधिपसन्दृष्टे शशिनि नृपस्तत्सुहृद्भिरपि धनवान्।*
*द्रेष्काणांशकपैर्वा प्रायः सौम्यैः शुभं नाऽन्यैः।। ३।।*

**भट्टोत्पल :** क्षेत्राधिपेति। अथ दृष्टिफलविचारम्–यस्मिन् राशौ स्थितः चन्द्रस्तद्राशीश्वरेण दृष्टश्चन्द्रस्तत्कालजातः पुमान् राजा स्यात्। अथ चन्द्राक्रान्तराशिस्तस्याधिपमित्रेण दृष्टे चन्द्रे सञ्जातो धनवान् भवति। अर्थादेव क्षेत्राधिपशत्रुणा दृष्टे चन्द्रे दरिद्रो भवति। क्षेत्राधिपमध्यदृष्टिर्निष्फला भवति। द्रेष्काणांशकपैरिती–यस्मिन्द्रेष्काणे चन्द्रो व्यवस्थितः तस्य द्रेष्काणस्य स्वामिना दृष्टे जातो धनी भवति। अंत्राशकग्रहणे नवांशकेति सर्वाशकग्रहणम्। यस्मिन्नवांशे द्वादशांशे त्रिशांशे स्थिते चन्द्रे तेषां स्वामिभिश्च दृष्टे जातो धनी भवति। अर्थादेव द्रेष्काणांशस्वामी शत्रुभिर्दृष्टे चन्द्रे निर्धन इति। तन्मध्यदृष्टिर्निष्फलप्राया। सौम्यैरिती। क्षेत्राधिपो द्रेष्काणांशकपतिश्च यदि शुभग्रहो भवति तदा शुभकृद् भवति। अथाशुभोऽपि शुभकृत् किन्तु प्रायोग्रहणाद् शुभोऽपि फलदो भवति। पापग्रहः किचित्फलदः। यस्याद् बृहज्जातके पापानामपि क्षेत्रपानां दृष्टिफलं शुभमुक्तं न केवलं यावदन्येश्वरः स भवति।। ३।।

**सती –** जन्माचे वेळी ज्या राशित चंद्र असेल त्यावर जर त्या राशित स्वामी ची दृष्टी असेल तर जातक राजा होतो. किंवा चंद्रावर राशि स्वामीच्या मित्राची (मीत्र ग्रहाची) दृष्टी असेल तर जातक धनवान होतो. ज्या द्रेष्काणात, नवमांशात, द्वादशांशात किंवा त्रिशांशात चंद्र असेल आणि त्याचा स्वामी शुभग्रह असेल तर त्याच्या दृष्टीने सुध्दा शुभफल प्राप्त होते. आणि पापग्रह असेल तर तो जातक सामान्य होतो.

## भावांचें शुभ-अशुभत्व

*पुष्णान्ति शुभा भावान्मूर्त्यादीन् ध्नन्ति संस्थिताः पापाः।*
*सौम्याः षष्ठेऽरिघ्नाः सर्वेऽरिष्टा व्ययाष्टमगाः।। ४।।*

**भट्टोत्पल** : पुष्णन्तीति। भावफलविचारम्-लग्नादारभ्य तन्वादयो भावास्तत्र यस्मिन् भावे शुभग्रहाः व्यवस्थिताः तं भावं पुष्णन्ति वृद्धिं कुर्वन्ति। यस्मिन् भावे पापग्रहा व्यवस्थितास्तद्भावहानिकराः। सौम्या इति-षष्ठेऽरिघ्नाः सौम्याः षष्ठस्थानस्थाः शत्रुनाशकराः भवन्ति पापा अवश्यमेवेति। सर्वे नेष्टा व्ययाष्टमगाः पापाः सौम्याश्च कर्मवृद्धिं कुर्वन्ति षष्ठग्रहणमत्रोपचयस्थानोपलक्षणार्थ तेन तृतीयस्थाः सौम्याः पापाश्च सहजवृद्धिं कुर्वन्ति, दशमस्थाः सौम्याः पापाश्चकर्मवृद्धिं कुर्वन्ति, एकादशस्था सौम्याः पापाश्चायवृद्धिं कुर्वन्ति। यदक्तं। उपचयवर्ज्य सौम्यैर्यत्तत्पापैर्विपर्यस्तम् ।। ४।।

**सती -** स्थानाचे शुभाशुभ फल ज्या घरात शुभ ग्रह असतो त्या घरांना (क्रमशः लग्न भाव, धनभाव ई.) शुभकारक (वृध्दीकारक) असतो. आणि ज्या भावात पापग्रह असतो तो भाव अशुभकारक असतो. सहाव्या घरात शुभग्रह असेल तो सुध्दा शत्रुचा नाश करतो. १२ व्या घरात आणि आठव्या घरात शुभ किंवा पापग्रह कोणताही ग्रह असता तो अनिष्टकारकच असतो.

## लग्नात चंद्र असता मिळणारे फल

*कर्कवृषाजोपगते चन्द्रे लग्ने धनो सुरूपश्च।*
*विकलाङ्गजडदरिद्राः शेषेषु विशेषतः कृष्णे।। ५।।*

भट्टोत्पल : कर्कवृषेति। चन्द्रमसो लग्नगतस्य फलमाह-कर्कराशौ लग्नगते वृषे मेषे च लग्नगते तत्स्थे चन्द्रे जातो धनी सुरूपश्च कर्कवृषमेषान् वर्जयित्वा शेषराशौ लग्नगते चन्द्रे कृष्णपक्षे विशेषतोऽत्यर्थ विकलाङ्गजडदरिद्राणां जन्म भवति।। ५।।

**सती -** कर्क, वृषभ किंवा मेष राशिचा चंद्र लग्नात असेल तर तो जातक धनवान आणि रूपवान असतो. याच्या पेक्षा वेगळया राशीचा चंद्र लग्नात असता तर तो जातक अपंगत्व असलेला, मुर्ख आणि धनहीन असतो. त्यातही कृष्णपक्ष असेल तर विशेषकरून विकलांग/अपंग, मुर्ख आणि धनहीन असतोच.

## लग्नात आणि १२ व्या घरात सूर्य-चंद्र असता मिळणारे फल



*विकलक्षणोऽर्कलग्ने तिमिरिकोऽज स्वभे तु रात्र्यन्धः।*
*बुद्बुद्दृष्टिः कर्किणि काणो व्ययगे शशाङ्के वा।। ६।।*

**भट्टोत्पल :** विकलेक्षण इति। अर्कस्य लग्नगतस्य चन्द्रार्कयोश्च लग्नाद् द्वादशस्थानयोर्विशेषमाह–मेषसिंहकर्कटान् वर्जयित्वाऽन्यस्मिन् राशौ लग्नगते तत्रैव चार्के स्थिते विकलेक्षणो भवति। मेषराशौ लग्नगते तत्रैव चार्के स्थिते जातस्तैमिरिको भवति। तिमिराहतदृष्टि:, सिंहे लग्नगते तत्र चैवार्के स्थिते जातो रात्र्यन्धो भवति। कर्किणि लग्नगते तत्रैव चक्रार्के स्थिते जातो बुद्बुद्दृष्टिर्भवति पुष्पिताक्ष:। काणो व्ययगे शशाङ्के वा। लग्नगते द्वादशऽर्के जात: काणो भवति चन्द्रे वा द्वादशे काण:। यद्यपि सामान्येनोक्तं तथापि आदित्ये व्ययगते दक्षिणाक्ष्णाकाण: चन्द्रे व्ययगते बामाक्षिकाण:। उक्तं च–'व्ययगतश्चन्द्रो वामं हिनस्त्यपरं रवि:' इति।। ६।।

**सती –** जन्माच्या वेळी सूर्य जर लग्नात असेल तर जातकाचे डोळे कमजोर असतात म्हणजे जातकाची दृष्टी कमजोर असते. लग्नात सूर्य मेष राशीचा असेल तर जातकाला रात आंधळेपणाचा रोग (रतौंधी) असतो. सूय लग्नस्थ असून सिंह राशीचा असेल तर रात्री त्याला काहीच दिसत नाही. सूर्य लग्नस्थ कर्क राशीत असेल तर डोळयात फुली पडलेला असतो आणि १२ व्या भावात सूर्य किंवा चंद्र असेल तर त्या जातकाचा एक डोळा तिरपा असतो.

विशेष : सूर्य १२ व्या घरात असेल तर जातकाचा उजवा डोळा नसतो आणि १२ व्या घरात चंद्र असेल तर डावा डोळा नसतो.

### जन्मकालीन ग्रहांच्या भावफलात कमीअधिकता

*इष्टं पादविवृद्ध्या मित्रस्वगृहत्रिकोणतुङ्गेषु।*
*रिपुभेऽल्पं फलमर्कोपगतस्य पापं शुभं नैव।। ७।।*

**भट्टोत्पल :** इष्टमिती। भावफलम्–तद्द्विविधं शुभमशुभं च। तत्र यद्भावफलं शुभं तस्य फलस्य मित्रक्षेत्रस्थो ग्रह: पादं चतुर्थांशं प्रयच्छति। स्वगृहस्थोऽर्धम्। त्रिकोणस्थ: पादहीनम्। तुङ्ग: उच्चस्थ: सर्वम्। रिपुभेऽल्पमिति रिपुक्षेत्रस्थ: पादादप्यल्पम्। अर्कोपगताऽस्तङ्गतो न किचिदपि नीचस्थश्च। एवं शुभफलं प्रयच्छन्ति। पापफलमेवं तत्र पापस्य शुभफलेन व्याक्षेप:। तत्रास्तमितो नीचस्थश्चाशुभं सम्पूर्ण फलं ददाति, शत्रुक्षेत्रस्थ: पादोनं मित्रक्षेत्रस्थोऽर्द्धं स्वगृहस्थ: पादं त्रिकोणस्थ: पादादल्पम् उच्चस्थानस्थो न किञ्चिदपि।। ७।।

**सती –** मित्रगृह, स्वगृह, त्रिकोण आणि उच्चीच्या ग्रहाच्या इष्टभावात शुभफल अनुक्रमे पावलाच्या वृध्दीने होते. म्हणजेच जर ग्रह मित्र घरात असेल तर पहिल्या चरणाने शुभ भाव फल मिळते. स्वगृही असेल तर दोन चरणाने, त्रिकोणात असेल तर तीन चरणांनी आणि उच्चीचा असेल तर शुभभाव फल ४ चरणांनी मिळते. शत्रूच्या राशीत असता

१ चरणाने, कमी अस्त ग्रहाचा शुभ फलभाव होतो. पाप फळ पूर्ण मिळते. अर्थात भावाचे अशुभ फळ उलट समझावे.

## ( १२-ग )
## आश्रय योग निरूपण
## मेषादी नवमांश जातफल

*तस्करभोक्तृविचक्षणधनिनृपतिनपुंसकाऽभयदरिद्राः।*
*खलपापोग्रोत्कृष्टा मेषादीनां नवांशभवाः।। १।।*

**भट्टोत्पल :** तस्करेति। अथाश्रयनिरूपणं चाह–तत्रादावेव नवांशजातस्य स्वरूपमाह– यस्मिन् कस्मिन् राशौ लग्नगते मेषनवांशे जातस्तस्करो भवति। वृषनवांशके जातो भोक्ता, मिथुननवांशके जातो विचक्षणः, कर्कनवांशके जातो धनी, सिंहनवांशे जातो राजा, कन्यानवांशके जातो नपुंसकः, तुलानवांशके जातः शूरः, वृश्चिकनवांशके जातो दरिद्रो भवति। धन्विनवांशके जातः खलो दुष्टो भवति। मकरनवांशके जातः पापो भवति। कुम्भनवांशके जात उग्रो भवति क्रूर इत्यर्थः। मीननवांशके जात उत्कृष्टो भवति।। १।।

**सती –**

१) जन्माचेवेळी कोणत्याही लग्नात (लग्नात कोणतीही राशि) मेष नवमांश असेल तर जातक चोर असतो.

२) जन्माचेवेळी कोणत्याही लग्नात (लग्नात कोणतीही राशि) वृषभ नवमांश असेल तर भोग करणारा.

३) जन्माचेवेळी कोणत्याही लग्नात (लग्नात होणतीही राशि) मिथुन नवमांश असेल तर बुध्दीमान असतो.

४) जन्माचेवेळी कोणत्याही लग्नात (लग्नात कोणतीही राशि) कर्क नवमांश असेल तर धनवान असतो.

५) जन्माचेवेळी कोणत्याही लग्नात (लग्नात कोणतीही राशि) सिंह नवमांश असेल तर राजा असतो.

६) जन्माचेवेळी कोणत्याही लग्नात (लग्नात कोणतीही राशि) कन्या नवमांश असेल तर नपुसक असतो.

७) जन्माचेवेळी कोणत्याही लग्नात (लग्नात कोणतीही राशि) तुला नवमांश असेल तर निर्भय असतो.



८) जन्माचेवेळी कोणत्याही लग्नात (लग्नात कोणतीही राशि) वृश्चिक नवमांश असेल तर निर्धन असतो.

९) जन्माचेवेळी कोणत्याही लग्नात (लग्नात कोणतीही राशि) धनु नवमांश असेल तर दुष्ट असतो.

१०) जन्माचेवेळी कोणत्याही लग्नात (लग्नात कोणतीही राशि) मकर नवमांश असेल तर पापकर्म करण्यात पटाईत असतो.

११) जन्माचेवेळी कोणत्याही लग्नात (लग्नात कोणतीही राशि) कुंभ नवमांश असेल तर क्रुर असतो?

१२) जन्माचेवेळी कोणत्याही लग्नात (लग्नात कोणतीही राशि) मीन नवमांश असेल तर श्रेष्ठ असतो.

### स्वराशीत ग्रह असता फळ

*कुलतुल्यकुलाधिकबन्धुमान्यधनिभोगिनृपसमनरेन्द्राः।*
*स्वर्क्षगतैकविवृद्ध्या किञ्चिन्न्यूना सुहृद्गृहगैः।। २।।*

**भट्टोत्पल :** कुलतुल्येति। एकविवृद्ध्या स्वक्षेत्रगतैर्ग्रहैजातस्य स्वरूपमाह–यस्मिन् कस्मिन् राशौ ग्रहे स्वक्षेत्रे जातः स्वकुलसदृशो भवति। द्वयोः स्वक्षेत्रयोः स्वकुलाधिकः, त्रिषु बन्धुमान्यः, चतुर्षु धनी, पञ्चसु भोगी, षट्सु नृपसमः, सप्तसु राजा। किञ्चिन्न्यूनः सुहृद्गृहगैः एकस्मिन् भावे मित्रक्षेत्रगते ग्रहे परविभबोपजीवी, द्वयोः सुहृद्–विभवोपजीवी, त्रिषु जातिविभवोपजीवी, चतुर्षु बन्धुविभवोपजीवी, पञ्चसु गणस्वामी, षट्सु बलस्वामी, सप्तसु राजा। उक्तं च–'परविभवसुहृत्स्वबन्धुपोष्यागणबलेशनृपाश्च मित्रभेषु' इति।। २।।

**सती :** जन्माचे वेळी लग्नकुंडलीत स्वराशित एक ग्रह असेल तर जातक आपल्या कुळासारखा (म्हणजे वडिल, आजोबा ई.) सारखा असतो.

- जन्माचे वेळी स्वराशित दोन ग्रह असतील तर कुळात श्रेष्ठ असतो.
- जन्माचे वेळी स्वराशित चार ग्रह असतील तर जातक धनवान असतो.
- जन्माचे वेळी स्वराशित पाच ग्रह असतील तर जातक सुख उपभोगणारा असतो.
- जन्माचे वेळी स्वराशित सहा ग्रह असतील तर जातक राजा सारखा असतो.
- ज्या जन्माचे वेळी स्वराशित सात ग्रह असतील तर जातक श्रेष्ठ राजा/महाराजा (नरेंद्र) असतो.याच क्रमानुसार एकादी ( १ते ७ ग्रह) ग्रह मित्र राशित असतील तर वरील फळापेक्षा थोडे कमी फळ मिळते.
- एखादा ग्रह मित्र राशीत असेल तर जातक दुसऱ्याच्या आश्रयाने राहतो.



- २ ग्रह मित्र राशित असतील तर मित्राच्या आश्रयाने राहतो
- तीन ग्रह मित्र राशित असता वंशपरंपरेनुसार चालत आलेले काम करून जगणारा

- चार ग्रह मित्र राशित असता भावांव्दारे पोषण होणारा.
- ५ ग्रह मित्र राशित असता जातक एखाद्या संघटनेचा नेता असतो
- ६ ग्रह मित्र राशित असता जातक सेनापती असतो.
- ७ ग्रह मित्र राशित असता जातक राजा होतो

### स्वउच्चीच्या ग्रहांची फळे.

*त्रिप्रभृतिभीरूच्चस्थैनृपवंशभवा भवन्ति राजानः।*
*पञ्चदिभिरन्यकुलोद्भवाश्च तद्वत्त्रिकोणगतैः।। ३।।*

**भट्टोत्पल :** त्रिप्रभृतिभीरिति। यस्य जन्मनि त्रयो ग्रहाः उच्चगता भवन्ति स राजवंशजातस्तदा राजा भवति। यस्य चत्वारः सोऽपि राजवंशजो राजा भवति। यस्य जन्मनि पञ्च ग्रहा उच्चराशिगता भवन्ति स यदि अन्यकुलजातस्तदाऽपि राजा भवति। यस्य षड्ग्रहाः स अन्यकुलजातोऽपि राजा भवति। यस्य सप्त ग्रहाः सोऽपि। एकेनोच्चगतेन द्वाभ्यां च राजवंशतो राजा न भवति किं तर्हि धनी भवति। तत्रापि यथा यथोच्चस्था ग्रहा भवन्ति तथा तथाधिको धनी तद्वत्त्रिकोणगतैरपि त्रिचतुर्भिर्मूलं त्रिकोणगतैः राजवंशजो राजा भवति। पञ्च षष्ठसप्तभिर्मूलत्रिकोणगतैरन्यवंशजोऽपि राजा भवति। अल्पैर्मूलत्रिकोणगैर्धनी भवति। यथा यथा बहवो ग्रहा मूलत्रिकोणस्था भवन्ति तथा तथाऽधिको धनी भवति।। ३।।

**सती :** जन्माचे वेळी जर ३ किंवा ४ ग्रह उच्चीचे असतील तर राजकुळात जन्मलेला जातक राजा होतो. आणि ५ पेक्षा जास्त ग्रह उच्चीचे असतील तर इतर कुळात जन्मलेला जातक राजा होतो. अशा प्रकारे ३ किंवा ४ ग्रह मुल्रत्रिकोणात असतील तर राजवंशातील जातक राजा हातो. ५ किंवा जास्त ग्रह मुलत्रिकोणात असतील तर कुठल्याही वंशाता जातक राजा होतो. अशाप्रकारे त्रिकोणगत ग्रहांचे सुध्दा फळ समजावे.

ग्रह शत्रुराशी आणि नीचराशीत असता मिळणारी फळे

*निर्धनदुःखितमूढव्याधितबन्धाभितप्तवधभाजः।*
*एकोत्तरपरिवृद्ध्या नीचगतैः शत्रुगृहगैर्वा।।४।।*

**भट्टोत्पल :** निर्धनदुःखितेति। अथैकादिभिर्नीचगतैर्गृहैर्जातस्य स्वरूपमाह–यस्मिन् कस्मिन् राशौ एकस्मिन् ग्रहे नीचगते शत्रुक्षेत्रगते वा जातो निर्धनो भवति द्वाभ्यां नीचगताभ्यां दुःखितः, त्रिभिर्मूढो [illegible] चतुर्भिर्व्याधितः, पञ्चभिर्बन्धः षड्भिरभितप्तवाक् सप्तभिर्वधभाग्भवति ।। ४।।

**सती -** जन्माचे वेळी एकोत्तर म्हणजे अनुक्रमे १,२,३,४,५,६,७ ग्रह आपल्या नीच राशीत किंवा शत्रूच्या घरात असतील जातक क्रमानुसार नीर्धन इत्यादी होतो.

जन्माचे वेळी नीचराशीत किंवा शत्रूच्या घरात

१ ग्रह असता नीर्धन

२ ग्रह असता दुःखी

३ ग्रह असता मुर्ख

४ ग्रह असता रोगी

५ ग्रह असता कारागृहात बंदी असतो.

६ ग्रह असता तापाने पीडीत असतो.

७ ग्रह असता जातकाचा वध होतो.

## राजयोग

*एकोऽपि नृपतिजन्मप्रदो ग्रहःस्वोच्चगः सुहृद्दृष्टः।*
*बलिभिः केन्द्रोपगतैस्त्रिप्रभृतिभिरवनिपालभवः।। ५।।*

**भट्टोत्पल :** एकाऽपीति। अथ राजयोगं चाह-यस्य जन्मनि एकोऽपि ग्रहः स्वोच्चगः मित्रेण तत्काले दृष्टः नृपजन्मदो भवति। त्रयो ग्रहा बलयुताः केन्द्रगता भवन्ति स जातो राजा भवति। तत्र चत्वारश्च स राजा भवति। पञ्चादयो न गृहीतव्या यस्मात् पञ्चादिभिः केन्द्रगतैरबलवद्भिर्जातो राजा भवति। तत्रैव तज्जातं त्रिभिश्चतुर्भिर्वा स्वोच्चगतैर्न केवलं केन्द्रगतैर्बलवद्भि राजवंशे जातो राजा भवति।। ५।।

**सती :** स्वउच्चीचा एकही ग्रह जर जन्मावेळी आपल्या मित्र ग्रहाने दृष्ट असेल तर जातक राजा होतो. तसेच ३-किंवा ४ बलवान ग्रह केंद्रात (१,४,७,१०) असतील तर जातक राजकुलात जन्मलेला जातक राजा होतो. यावरून स्पष्ट होते की पाच पेक्षा जास्त निर्बल (बलहीन) ग्रह सुध्दा केंद्रात असतील तर राजकुळात जन्मलेला जातक राजा बनतो, तसेच ५ पेक्षा अधीक बलवान ग्रह केंद्रात असतील तर अन्य कुळातजन्मलेला जातक सुध्दा राजा होतो.

## अन्य राजयोग

*वर्गोत्तमगे चन्द्रे चतुराद्यैर्वीक्षिते विलग्ने वा।*

*नृपजन्म भवति राज्यं नृपयोगे बलयुतदशायाम्।। ६।।*

**भट्टोत्पल :** वर्गोत्तमगे इति। राजयोगान्तरमाह–यस्मिन् राशौ चन्द्रो व्यवस्थितः स चन्द्रो राशिसम्बन्धिनवांशके भवति तदा वर्गोत्तमस्थो भवति । यस्मिन वर्गोत्तमगते चन्द्रे चतुराद्यैग्रहैश्चतुःपञ्च षड्भिर्वीक्षिते तदा जातोऽन्यकुलजोऽपि राजा भवति। विलग्ने वा यस्य लग्नस्योदयस्तस्य चेत् स्वनवांशकोदयो भवति। तदा सलग्नो वर्गोत्तमस्थो भवति तस्मिन् लग्ने वर्गोत्तमगते चतुराद्यैर्ग्रहैः चन्द्रवर्तिजश्चतुःपञ्चषड्भिर्वीक्षितैर्यो जातः सोऽपि राजा भवति। तदुक्तं–'वर्गोत्तमगते चन्द्रे अथवा चन्द्रवर्जिते। चतुराद्यैर्ग्रहैर्दृष्टे नृपवंशोद्भवः स्मृतः'।। इति राज्यं नृपयोगे बलयुततद्दशायामिती। विद्यमाने राजयोगे बलयुतग्रहस्य दशायां तस्य राज्यप्राप्तिर्वक्तव्या।। ६।।

**सती :** जन्माचे वेळी जर चंद्र किंवा लग्न, वर्गोत्तम नवमांशात असेल आणि इतर ४,५ किंवा ६ ग्रहांनी दृष्ट असेल तर जातक राजा होतो. आणि योगकारक ग्रहांमध्ये जो ग्रह अधिक बलवान असेल त्याच्या दशेत म्हणजे, दशा, अंतर्दशा, मध्ये राज्य लाभ होतो.

### प्रकीर्णाध्यायचे विषय

*उडुपतियोगसमागममशीलसन्दर्शनानि भावाश्च।*
*आश्रयराज्यप्रभावाश्चाध्यायेऽस्मिन् क्रमेणोक्ताः।। ७।।*

**भट्टोत्पल :** उडुपतियोगेति। अथ प्रकीर्णकाध्यायोक्तप्रकरणसङ्ग्रहमाह इति। लघुजातक प्रकीर्णाध्याये–१ अनफासुनफादुरूधराकेमद्रुमाख्या राशियोगाः। २. द्विग्रहादि योगाः प्रव्रज्यायोगाश्च समागमाः। ३. अस्थिरविभूतिमित्राद्यानि राशिशीलानि। ४. क्षेत्राधिपसन्दृष्ट इत्येवमाद्यानि सन्दर्शनानि। ५. पुष्णन्ति शुभा भावानित्येवमाद्या भावाः। ६. अंशकस्वरूपकुलतुल्याद्याश्च योगाः। ७. 'एकोऽपि नृपतिजन्मप्रद' इत्याद्या राजयोगाः। एतस्मिन् प्रकीर्णाध्याये क्रमेणोक्ताः। ।। ७।।

या प्रकीर्णाध्यायात चंद्रयोग द्विग्रयोग,दृष्टी फल, भाव फल, आश्रय योग आणि राजयोग, क्रमानुसार सांगीतले आहे.

### अध्याय १२ वा संपला.

* * * * * * * *

(१३)

अध्याय तेरावा

# नाभसयोग

## रज्जू- मुसल - नलयोग ( आश्रययोग ) आणि त्याची फळं

*चरभवनादिषु सर्वेराश्रयजा रज्जुमुसलनलयोगाः।*
*ईर्ष्युर्मानी धनवान् क्रमेण कुलविश्रुताः सर्वे।। १।।*

**भट्टोत्पल :** चरभवनादिष्विति। अथ नाभसयोगाध्यायं व्याख्यास्यामः। तत्र नाभसयोगाश्चतुर्धा आश्रययोगा दलयोगौ आकृतियोगाः सङ्ख्यायोगाश्च। तत्र आश्रय योगास्त्रयः दलयोगौ द्वौ, आकृतियोगा विंशतिसंख्याः, संख्यायोगाः सप्त एवं द्वात्रिंशन्नाभसयोगाः। तत्राश्रययोगत्रयं तत्फलमाह–यदा सर्वे ग्रहाश्चरराशिगता भवन्ति, न केचित्, स्थिरराशिषु द्विःस्वभावेषु च भवन्ति, तदा रज्जुनाम योगो भवति। यदा सर्वे ग्रहाः स्थिरराशिषु भवन्ति, न कश्चिच्चरराशौ द्विःस्वभावराशौ वा भवति। तदा मुसलनामयोगो भवति। यदा सर्वे ग्रहाःद्विःस्वभावराशिषु भवन्ति, न कश्चिच्चरराशौ न च स्थिरराशौ भवति। तदा नलयोगः। एषां फलान्याह– रज्जुयोगे जात ईर्ष्युः परममत्सरी भवति। मुसले जातो मानी गर्वितो भवति। अनलाख्ये योगे जातो धनवान् भवति। क्रमेणैतानि फलानि कुलविश्रुताः। सर्वे आश्रययोगैः सर्वैर्जाताः कुलविश्रुताः कुलख्याताः। इत्याश्रययोगाः।। १।।

**सती –** सर्वचे सर्व सात ग्रह जन्माच्या वेळी जर चर राशीत (मेष (१), कर्क (४), तुला (७), मकर (१०) असतील तर तो रज्जू योग होतो.

- सर्व ७ ग्रह स्थीर राशीत (वृष (२), सिंह (५), वृश्चिक (८), कुंभ (११) असतील तर मुसलयोग होतो.
- सर्व ७ ग्रह द्विस्वभाव राशीत (मिथून (३), कन्या (६), धनु (९), मीन (१२) असतील तर नलयोग होतो. हे तिन्ही आश्रय योग आहेत.

**फळें**



- रज्जू योगात जन्मलेला जातक आपल्या कुळात प्रसिध्द, ईर्षा करणारा असतो.
- मुसलयोगात जन्मलेला जातक आपल्या कुळात स्वाभिमानी आणि प्रतिष्ठित असतो.

– आणि नलयोगात जन्मलेला जातक आपल्या कुळात धनवान असतो.

उदाहरण –

११
९
८
चंद्र
१०
शनि
१२
सूर्य
१
बुध
गुरु
७
शुक्र
२
४
मंगळ
६
३
५

रज्जू योग

उदाहरण –

४
चंद्र २
शुक्र
१
सूर्य ५
बुध
३
६
१२
७
९
११
मंगळ
गुरु
शनि
८
१०

मुसल योग

१०
८
७
सूर्य
९
शुक्र
११
चंद्र
६
गुरु
१२
शनि
मंगळ
३
बुध
१
५
२
४

नल योग

## सर्प, माला योग ( दलयोग ) आणि त्याची फळे.

*केन्द्रत्रयगैः पापैः शुभैर्दलाख्यावहिश्च माला च।*
*सर्पेऽतिदुःखितानां मालायां जन्म सुखिनां च।। २।।*

**भट्टोत्पल :** केन्द्रत्रयगैरिती। अथ दलयोगौ तयोर्जातस्य स्वरूपमाह–येषु केषु त्रिषु केन्द्रेषु च यदाः त्रयः पापग्रहा अर्कारसौरा भवन्ति न चैकस्मिन्नपि केन्द्रे सौम्य ग्रहो भवति तदा सर्पोनामदलयोगः। यदा येषु केन्द्रेषु सौम्यग्रहा बुधगुरूशुक्रा भवन्ति न कश्चित्केन्द्रे पापग्रहो

भवति तदा मालानामदलयोगो भवति। तत्र योगद्वये चन्द्रमा न ग्राह्यः। फलमाह–सर्पेति। सर्पे योगे दुःखिनां जन्म भवति। मालायोगे सुखिनां जन्म भवति। इति दलयोगौ।। २।।

**सती :**

दलयोग दोन प्रकारचे आहेत.

१) सर्प योग २) मालायोग

१) **सर्पयोग :** कोणत्याही तीन केंद्र स्थानात ३ पापग्रह म्हणजे सूर्य, मंगल आणि शनि असतील आणि एकही शुभग्रह केंद्रात नसेल तर तो सर्प नामक दलयोग होतो.

२) **मालायोग :** तसेच कोणत्याही तीन केंद्र स्थानात तीन शुभग्रह म्हणजे बुध, गुरू, आणि शुक्र असतील आणि एकही पापग्रह केंद्रात नसेल तर तो मालायोग होतो. या दोन्ही योगांना सर्प आणि माला योगांना दलयोग म्हटले आहे.

उदाहरण –




सर्प योग

उदाहरण –




माळा योग

**दलयोगाची फळं**

– सर्प योगात जन्मलेला जातक दुखी असतो.

– तर माला योगात जन्मलेला जातक सुखी होतो.

## आकृतियोग

### गदा, शकट, विहंग, श्रृंगारक नावाचे आकृति योग

*द्विरनन्तरकेन्द्रस्थैर्गदाविलग्नास्तसंस्थितैः शकटम्।*



*खचतुर्थयोर्विहङ्गः श्रृङ्गाटकमुदयसुतनवगैः।। ३।।*

**भट्टोत्पल :** द्विरनन्तरेति। अथाकृतियोगाः। तत्र गदाशकटविहङ्गश्रृङ्गाटकानां लक्षणं

तत्फलोपनयं चाह–द्विरनन्तरेति–द्वयोः केन्द्रयोःयदा सर्वे ग्रहा भवन्ति तदा गदायोगो भवति स चतुर्धा। लग्नचतुर्थस्थैरेकः, चतुर्थसप्तमस्थैर्द्वितीयः, सप्तम दशमस्थैस्तृतीयः, दशमलग्नस्थैश्चतुर्थः। विलग्नास्तसंस्थितैः शकटमिति–लग्ने सप्तमे च स्थाने यदा सर्वे ग्रहा भवन्ति तदा शकटाख्ययोगः। खचतुर्थयोर्विहङ्गः, दशमचतुर्थयोर्यदा सर्वे ग्रहा भवन्ति तदा विहङ्गयोगः। शृङ्गाटकमिति–लग्ने पञ्चमे नवमे च यदा सर्वे ग्रहा भवन्ति तदा शृङ्गाटको योगो भवति।। ३।।

**सती :** जन्माच्या वेळी जर कुंडलीत कोणत्याही एकमेकाला लागून दोन केंद्रस्थानी सर्व ग्रह असतील तर तो गदा योग होतो. जसे लग्न आणि चौथ्या स्थानी, चौथ्या आणि सातव्या, सातव्या आणि दहाव्या आणि दहाव्या व लग्न स्थानी सर्व ग्रह असतील तर गदा योग होतो.















**वरील सर्व गदा योग आहेत.**

– शकट योग संपूर्ण ग्रह लग्न व सातव्या घरात असतील तर तो शकट योग होतो.
– विहंग योग चौथ्या आणि दहाव्या घरात सर्व ग्रह असतांना स्थानात विहंग योग हातो
– श्रृङ्गाष्टक योग लग्न, पाचवे आणि नवव्या घरात सर्व ग्रह असतील तर तो श्रृङ्गाष्टक योग हातो.

उदाहरण –



शकट योग

उदाहरण –



विहंग योग



श्रृंगाष्टक योग

## हलयोग आणि गदा ईत्यादी योगांची फळे

*श्रृङ्गाटकतोऽन्यगतैर्हलमेतेषां क्रमात् फलोपनयः।*

*यज्वा शकटजीवी दूत्तश्चिरसौख्यभाक्कृषिकृत्।। ४।।*

**भट्टोत्पल :** श्रृङ्गाटक इति। लग्नं वर्जयित्वा यदान्यत्र स्थानत्रये परस्परं त्रिकोणगता ग्रहा

भवन्ति तदा हलाख्ययोगः। स च त्रिधा। द्वितीयषष्ठदशमस्थैरेकः, तृतीयसप्तमैकादशस्थैर्द्वितीयः, चतुर्थाष्टमद्वादशगैस्तृतीयः। अथास्य योगपञ्चकस्य क्रमात् फलोपनयः। गदायोगे जातो यज्वा भवति। शकटयोगे शकटाजीवी, विहङ्गयोगे दूतः, श्रृङ्गाटके चिरसौख्यभाक्, हलाख्ये कृषिकृत्।। ४।।

**सती :** यापूर्वी सांगीतले आहे की लग्नापासून त्रिकोणात म्हणजे १,५,९ या स्थानी सर्व ग्रह स्थीत असतील तर श्रृंङ्गाष्टक योग होतो. त्याचप्रमाणे दुसऱ्या, तिसऱ्या आणि चौथ्या स्थानापासून होणाऱ्या त्रिकोणात सर्व ग्रह असता जो योग होतो. त्याला हल योग म्हणतात.,

द्वितीय त्रिकोणः २,६,१० तृतीय त्रिकोण ३,७,११ चतुर्थ त्रिकोण ४,८,१२

उदाहरण –




हल योग

उदाहरण –




हल योग






हल योग

### हलयोग आणि गदा ईत्यादि योगांची फळे

- सती –गदायोगात जन्मलेला जातक यज्ञीक यश करणारा असतो.
- शंकट योगात जन्मणारा जातक शंकट (गाडी) चालवून उपजीवीका करणारा असतो.
- विहंग योगात जन्मलेला जातक दूत असतो.
- श्रृंगारक योगात जन्मलेला जातक नेहमी सुखी असतो.
- हल योगात जन्मलेला जातक शेतकरी असतो.

**विशेष** : सर्व ग्रह जर २,६,१०, किंवा ३,७,११, तसेच ४,८,१२, स्थानी स्थीत असतील तर तो हल नामक योग समजावा.

### वज्र, यव, कमल आणि वापी योग

*क्रूरैः सुखकर्मस्थैः सौम्यैरूदयास्तसंस्थितैर्वज्रम्।*
*यॅव इति तद्विपरीतैर्मिश्रैः कमलं च्युतैर्वापी।। ५।।*

**भट्टोत्पल** : अथ वज्रयवधकमलवापीयूपशरशक्तिदण्डयोगानां लक्षणं फलानि चाह–क्रूरैरिती। चतुर्थदशमस्थैः सर्वैः पापग्रहैः लग्नसप्तमस्थैश्च सौम्यग्रहैर्वज्रयोगाः। वज्रविपरीतस्थैर्यवः। एतदुक्तम्। चतुर्थदशमयोर्यदा सर्वे सौम्यग्रहा भवन्ति लग्नसप्तमगाश्च पापा भवन्ति तदा यवाख्यो योगः। मिश्रैः कमलमिती। वज्रयोगोक्तस्थानं विना सर्वे एव ग्रहा यदा चतुर्षू केन्द्रस्थानेषु भवन्ति तदा कमलयोगः। च्युतैर्वापीति–एवं केन्द्रच्युतैः सर्वैरेव ग्रहैर्वापीयोगः। स च द्विधा–द्वितीयपञ्चाष्टमैकादशमस्थाः सर्वे भवन्ति तदैकः। यदि तृतीयषष्ठनवमद्वादशस्थाः सर्वे ग्रहास्तदा द्वितीयः।। ५।।

**सती** : जर जन्माचे वेळी चौथ्या आणि दहाव्या स्थानी सर्व पापग्रह (रवि, शनि, मंगळ) असतील किंवा लग्नात आणि सातव्या घरात सर्व शुभग्रह (बुध, गुरू, शुक्र) असतील तर तो वज्रयोग होतो.

४ व १० घरामध्ये पापग्रह असता वज्र योग होतो. (पान नं. १०७ पहा)

तसेच लग्न आणि सातव्या घरात शुभग्रह असता वज्र योग हातो. (पान नं. १०७ पहा)

याच्या उलट अर्थात ४ आणि १० मध्ये शुभ ग्रह आणि लग्न व सातव्या घरात सर्व पापग्रह असतील तर तो **यव योग** होतो. (पान नं. १०७ पहा)

– जर १,४,७,१० (लग्न, चौथे, सातवे व दहावे घर) या स्थानी पापग्रह आणि शुभग्रह सोबत–सोबत स्थीत असतील तर तो **कमल योग** होतो. (पान नं. १०७ पहा)

केंद्रस्थाने सोडून इतर स्थानी म्हणजे पणफर आणि अपोक्लीम स्थानी सर्व पाप तसेच शुभग्रह असतील तर **वापी योग** होतो. (पान नं. १०७ पहा)



पणफर व अपोक्लीम २,३,५,६,८,९,११,१२,या स्थानी शुभ–अशुभ सर्व ग्रह असल्याने हा वापी योग झाला.

उदाहरण –

| भाव | ग्रह |
|---|---|
| १ | चंद्र, गुरु ( शुभ ) |
| २ | |
| ३ | |
| ४ | सुर्य, मंगळ ( पाप ) |
| ५ | |
| ६ | |
| ७ | शुक्र, बुध ( शुभ ) |
| ८ | |
| ९ | |
| १० | शनि ( पाप ) |
| ११ | |
| १२ | |

वज्र योग

उदाहरण –

| भाव | ग्रह |
|---|---|
| १ | शनि ( पाप ) |
| २ | |
| ३ | |
| ४ | शुक्र, बुध ( शुभ ) |
| ५ | |
| ६ | |
| ७ | सुर्य, मंगळ ( पाप ) |
| ८ | |
| ९ | |
| १० | चंद्र, गुरु ( शुभ ) |
| ११ | |
| १२ | |

यव योग
४-१० घरात शुभग्रह

उदाहरण –

| भाव | ग्रह |
|---|---|
| १ | शनि, शुक्र |
| २ | |
| ३ | |
| ४ | सूर्य, बुध |
| ५ | |
| ६ | |
| ७ | गुरु |
| ८ | |
| ९ | |
| १० | मंगळ, चंद्र |
| ११ | |
| १२ | |

कमल योग ( मिश्रित )

| भाव | ग्रह |
|---|---|
| १ | |
| २ | गुरु |
| ३ | बुध |
| ४ | |
| ५ | शनि |
| ६ | शुक्र |
| ७ | |
| ८ | |
| ९ | सूर्य |
| १० | |
| ११ | मंगळ |
| १२ | चंद्र |

वापी योग ( केन्द्र स्थान रिकामे )

## यूप, शर, शक्ति एवं दण्ड योग

*लग्नादिकण्टकेभ्यश्चतुर्गृहावस्थितैर्ग्रहैर्योगाः।*
*यूपेषुशक्तिदण्डा वज्रादीनां फलान्यस्मात्।। ६।।*

**भट्टोत्पल :** लग्नादीति। लग्नादिकेन्द्रमादितः कृत्वा चतुर्गृहेषु यदा सर्वे ग्रहा भवन्ति तदा यूपेषुशक्तिदण्डाख्ययोगा भवन्ति। तद्यथा–लग्नद्वितीयतृतीयचतुर्थस्थैः सर्वग्रहैर्यूपाख्यो योगः। चतुर्थ पञ्चमषष्ठसप्तमस्थैरिषुः, सप्तमाष्टमनवमदशमस्थैः शक्ति दशमैकादशद्वादशलग्नस्थैर्दण्ड इति।। ६।।

**सती :**

**युपयोग –** लग्नापासून ४ घरं म्हणजे १,२,३ आणि ४ या घरांमध्ये सर्व ग्रह असतील तर युप योग होतो.

**शरयोग –** चौथ्या घरापासून ४ घरं म्हणजे ४,५,६ आणि ७ या घरांमध्ये सर्व ग्रह असतील तर तो शर (इषु) योग होतो.

**शक्तियोग –** जेव्हा ७ व्या घरापासून ७,८,९ आणि १० व्या घरांमध्ये सर्व ग्रह असतील तो शक्तियोग होतो. तसेच (पान नं. १०९ पहा)

**दंडयोग –** १० व्या स्थानापासून १०,११,१२, आणि १ घरांमध्ये सर्व ग्रह असतील तर दंडयोग होतो. (पान नं. १०९ पहा)




युप योग




शर योग



शक्ति योग



दंड योग

## वज्रादि आठ योगांची फळे

*आद्यन्तयोः सुखयुतः सुखभाङ्मध्ये धनान्विताऽल्पसुखः।*
*त्यागी हिंस्रो धनवर्जितः पुमान् प्रियैर्वियुक्तश्च ।। ७।।*

**भट्टोत्पल :** आद्यन्तयोरिति। वज्रादीनां योगानां फलानि वक्ष्यमाणानि बाल्ये सुखी यौवने दुःखितो वार्धके पुनःसुखी एवंविधो वज्रयोगे जातो भवति। बाल्ये वार्द्धक्ये च दुःखितः यौवने सुखी एवंविधो यवाख्ये योगे जातो भवति। धनान्वितः कमलाख्ये योगे जातो भवति। वापीसंज्ञके अल्पसुखी भवति। यूपाख्ये जातस्त्यागी भवति। वापीसंज्ञके अल्पसुखी भवति। यूपाख्ये जातस्त्यागी भवति। इषुयोगे जातो हिंस्रो घातुको भवति। शक्तियोगे जातो धनवर्जितो भवति। दण्डाख्ये योगे जातः प्रियैः पुत्रादिभिर्वियुक्तो भवति।। ७।।

**सती :** वज्र इत्यादी आठ–योगांची फळे पुढील श्लोकांत सांगीतले आहेत.

(१) **वज्रयोगांचीफळे :** वज्रयोगात जन्मलेला जातक लहानपणी आणि म्हातारपणात धनवान व सुखी होतो.

(२) यव योगात जन्मलेला जातक तारूण्यात सुखी असतो.

(३) कमलयोगात जन्मलेला जातक धनवान असतो.

(४) वापी योगात जन्मलेला जातक सुखी असतो.

(५) युप योगात जन्मलेला जातक दान करणारा. तसेच त्यागी असतो.

(६) शरयोग– शरयोगात जन्मलेला जातक अत्याचार करणारा असतो.

(७) **शक्तियोग :** शक्ति योगात जन्मलेला जातक जन्मलेला जातक दरिद्री असतो.



(८) **दंडयोग :** दंडयोगात जन्मलेला जातकाला भाऊ नसतात. तो बांधव रहित असतो.

## नौ, कूट, छत्र, चाप आणि अर्धचन्द्र योग

*तद्वत् सप्तमसंस्थैर्नौकूटच्छत्रकार्मुकाणि स्युः।*
*नावाद्यैरप्येवं कण्टकान्यस्थैः स्मृतोऽर्धशशी।। ८।।*

**भट्टोत्पल :** अथ नौकूटच्छत्रकामुकार्धचन्द्राणां लक्षणमाह– तद्वत्सप्तमसंस्थैरित्यादि। एकस्मात् केन्द्रादारभ्य सप्तभिर्ग्रहैः सप्तमर्क्षस्थैश्च चत्वारो नौकूटच्छत्रकार्मुकाख्या योगा भवन्ति । लग्नद्वितीयतृतीयचतुर्थपञ्चमषष्ठसप्तमगैः सर्वग्रहैर्नौकाख्यः। चतुर्थादिदशमान्तस्थैर्कूटाख्यः। सप्तमादिलग्नान्तस्थैश्छत्राख्यः। दशमादिचतुर्थान्तस्थैश्चापाख्यः। नावाद्यैर्योगैः कण्टकान्यसंस्थैर्यदा पणफरापोक्लीमादिषु वा सप्तभिर्निरन्तरगतैरर्धचन्द्राख्यो योगो भवति। स चाऽष्टधा तद्यथा द्वितीयाद्यष्टमान्तेष्वेकस्तृतीयादिनवमान्तेषु द्वितीयः। पञ्चमाद्येकादशान्तेषु तृतीयः। पञ्चमाद्येकादशान्तेषु तृतीयः। षष्ठादिद्वादशान्तेषु चतुर्थः। अष्टमादिद्वितीयान्तेषु पञ्चमः। नवमादितृतीयान्तेषु षष्ठः। एकादशादिपञ्चमान्तेषु सप्तमः। द्वादशादिषष्ठान्तेषु अष्टमः।। ८।।

**सती :** ज्याप्रमाणे युप इत्यादी योग सांगीतले आहेत. त्याचप्रमाणे

**नौकायोग :** लग्न इत्यादी सात घरात म्हणजे १,२,३,४,५,६,७, या घरांमध्ये सर्व ग्रह असतील तर तो नौकायोग होतो. तसेच

**कूटयोग :** चौथ्या घरापासून ७ घरे म्हणजे ४,५,६,७,८,९, आणि १० या घरांत जर सर्व ग्रह असतील तर तो कूटयोग होतो.



नौका योग



कूट योग

**छत्र योग :** सातव्या घरापासून ७ घरांमध्ये सर्व ग्रह असतील (७,८,९,१०,११,१२,१) तर तो छत्र योग होतो. (पान नं. १११ पहा)

**चाप ( कार्मुक ) योग :** दहाव्या घरापासून ७ घरांमध्ये (१०,११,१२,१,२, ३,४) सर्व ग्रह असतील तर तो चाप योग होतो.

याचप्रमाणे पणफर आणि अपोक्लीम स्थानापासून लागूनचे ७ घरांमध्ये सर्व ग्रह असतील अर्धचंद्र योग होतो.



छत्र योग



चाप योग ( कार्मुक )

## चक्र आणि समुद्र योग

*एकान्तरैर्विलग्नात् षड्भवनावस्थितैर्ग्रहैश्चक्रम्।*
*अर्थाच्च तद्वदुदधिनौप्रभृत्लान्यथो क्रमशः।। ९।।*

**भट्टोत्पल :** एकान्तरैरिती। अथ चक्रसमुद्रयोगयोर्लक्षणमाह–लग्नादारभ्यैकान्तरावस्थितैर्ग्रहैः षट्सु चक्राख्यो योगो भवति। तद्यथा–लग्नतृतीयपचमसप्तमनवमैकादशेषु षट्सु यदा सर्वे ग्रहाः भवन्ति तदा चक्राख्यो योग अर्थात् द्वितीयादारभ्यैकान्तरावस्थितैः सप्तभिर्ग्रहैः षट्सु उदधिर्नाम योगो भवति। तद्यथा–द्वितीयचतुर्थषडष्टदशमद्वादशेषु षट्सु ग्रहेषु यदा सप्त ग्रहा भवन्ति तदा उदधियोगो भवति।। ९।।

**सती :** चक्रयोग जर लग्नापासून एक घर सोडून एक असे ६ घरांमध्ये (१,३,५,७,९,११) सर्व ग्रह असतील तर चक्रयोग होतो तसेच (पान नं. ११२ पहा)

**समुद्र योग** दुसऱ्या घरापासून एक घर सोडून एक असे ६ घरामध्ये (२,४,६,८,१०,१२) सर्व ग्रह असतील तर तो समुद्र नावाचा योग होतो. (पान नं. ११२ पहा)



नौका इत्यादी योगांचे फळे पूढील श्लोकांत सांगीतले आहे.

उदाहरण –

२ १२ गुरु ११ ३ १ मंगळ शुक्र चंद्र ४ १० सूर्य ५ ७ बुध शनि ९ ६ ८

चक्र योग

उदाहरण –

गुरु २ १२ मंगळ चंद्र ११ ३ १ शुक्र ४ १० बुध ५ ७ ९ ६ सूर्य शनि ८

समुद्र योग

## नौकादि सात योगांची फळे

*कीर्त्या युक्तोऽनृतवाक् स्वजनहितः शूरसुभगधनीभूपाः।*
*इत्याकृतिजा योगा विंशतिरात्मगुणैस्तेषु नन्दन्ते।। १०।।*

**भट्टोत्पल :** कीर्त्येति। नौप्रभृतीनां सप्तानां फलान्याह–नौयोगे जातः कीर्त्या युक्तो भवति। कूटयोग जातोऽनृतवाक्। असत्यभाषी भवति। छत्रयोगे जातः स्वजनहितो भवति। कार्मुकयोगे जातः शूरो भवति। अर्धचन्द्रे जातः सुभगो भवति। चक्रयोगे जातो धनी भवति। समुद्रयोगे जातो राजा भवति। आकृतियोगोपसंहारार्थमाह–आकृतियोगा विंशतिः प्रोक्ताः। एषामन्यतमेन जाता आत्मगुणैर्नन्दन्ते स्वबाह्वर्जितश्रियो भवन्तीत्यर्थः।। १०।।

- नौकायोगांत जन्मलेला जातक यशस्वी होतो.
- कुटयोगात जन्मलेला जातक खोट बोलणारा लबाड असतो.
- छत्रयोगात जन्मलेला जातक आपल्या कुटुंबाचे पालन पोषण करणारा असतो.
- शरयोगात जन्मलेला जातक योध्दा वीर होतो.
- अर्धचंद्र योगात जन्मलेला जातक रूपवान असतो.
- चक्रयोगात जन्मलेला जातक धनवान/श्रीमती असतो.
- समुद्रयोगात जन्मलेला जातक राजा होतो.
- गदा इत्यादी २० आकृति योग आहेत. या सर्व आकृति योगात जन्मलेला जातक आपल्या गुणाने आनंदीत राहतात म्हणजे आपापल्या कष्टाने कमाई करून वैभव प्राप्त करतात. आणि सुख उपभोगतात

## गोल इत्यादी सात संख्या योग

*एकादिगृहोपगतैरूक्तान् योगान् विहाय सङ्ख्याने।*
*गोल-युग-शूल-केदार-पाश-दामाख्य-वीणाः स्युः।। ११।।*

**भट्टोत्पल :** एकादीति। अथ सप्तसङ्ख्यायोगानाह-एकादिगृहोपगतैरित्यादि। उक्तयोगान् रज्जुमुसलादिसमुद्रान्तान् योगान् वर्जयित्वा यदेकस्मिन् राशौ सर्वे ग्रहा भवन्ति तदा गोलाख्यो योगो भवति। यदा राशिद्वये तदा युगाख्यः, यदा राशित्रये तदा शूलाख्यः, यदा राशिचतुष्के तदा केदाराख्यः, यदा राशिपचके तदा पाशाख्यः, यदा राशिषट्के तदा दामाख्यः। यदा राशिसप्तके तदा वीणायोगो भवति।। ११।।

**सती - गोलयोग :** जर सर्व ग्रह एका राशीत म्हणजे एकाच घरात असतील तर तो गोल योग होतो.

**युगयोग :** सर्व ग्रह दोन राशीत म्हणजे दोन घरात असतील तर युगयोग होतो.

उदाहरण –

| भाव | राशी | ग्रह |
|---|---|---|
| १ | १ | |
| २ | २ | |
| ३ | ३ | |
| ४ | ४ | |
| ५ | ५ | |
| ६ | ६ | |
| ७ | ७ | सू. चं. मं. बु. गु. शु. श. |
| ८ | ८ | |
| ९ | ९ | |
| १० | १० | |
| ११ | ११ | |
| १२ | १२ | |

**गोल योग**

उदाहरण –

| भाव | राशी | ग्रह |
|---|---|---|
| १ | १ | बुध, गुरु, शुक्र, शनि |
| २ | २ | |
| ३ | ३ | |
| ४ | ४ | |
| ५ | ५ | |
| ६ | ६ | |
| ७ | ७ | सूर्य, चंद्र, मंगळ |
| ८ | ८ | |
| ९ | ९ | |
| १० | १० | |
| ११ | ११ | |
| १२ | १२ | |

**युग योग**

**शुलयोग :** ३ राशीत/ घरात सर्व ग्रह असतील तर तो शुलयोग होतो. (पान नं. ११४ पहा)

**केदार योग :** ४ राशीमध्ये/ ४ घरात सर्व ग्रह असतील तर तो केदार योग होतो.

**पाश योग :** पाच राशीमध्ये म्हणजे ५ घरात सर्व ग्रह असतील तर तो पाश योग होतो.

**दाम योग :** सहा राशीमध्ये म्हणजे ६ घरात सर्व ग्रह असतील तर दाम योग आणि

**वीणायोग :** सात राशीमध्ये म्हणजे ७ घरामध्ये सर्व ग्रह असतील (प्रत्येक घरात १-१ ग्रह) तर तो वीणायोग होतो. हे सर्व संख्या वाचक योग आहेत.



(वरील सर्व योगाचे कुंडल्या पान नं. ११४ पहा)

उदाहरण –

२ १२ ३ ११ बुध १ गुरु शुक्र ४ शनि सूर्य १० चंद्र मंगळ ५ ९ ६ ७ ८

शुल योग

२ १२ ३ ११ सूर्य १ मंगळ गुरु ४ चंद्र १० बुध शुक्र ७ शनि ५ ९ ६ ८

केदार योग

२ १२ ३ ११ सूर्य १ बुध ४ गुरु मंगळ १० शुक्र ५ ७ शनि ९ चंद्र ६ ८

पाश योग

बुध २ १२ ३ गुरु ११ १ सूर्य ४ शुक्र १० मंगळ ५ चंद्र ७ शनि ९ ६ ८

दाम योग

उदाहरण –

गुरु २ १२ ३ बुध १ ११ शुक्र चंद्र ४ १० मंगळ ५ शनि ९ ७ सूर्य ६ ८



वीणा योग

## गोल इत्यादि योगांची फले

*दुःखितदरिद्रघातककृषिकरदुःशीलपशुपतिनिपुणानाम्।*
*जन्म क्रमेण सुखिनः परभाग्यैस्सर्व एवैते।। १२।।*

**भट्टोत्पल :** दुःखितेति। सङ्ख्यायोगजातानां फलान्याह–गोलाख्ये योगे दुःखितानां जन्म भवति। युगाख्ये दरिद्रस्य। शूलाख्ये योगे घातुकस्य, घातुको वधकारी। केदाराख्ये कर्षकस्य। पाशाख्ये दुःशीलस्य। दामाख्ये पशुपालस्य। वीणायां निपुणस्य। एवं विधानां जन्म क्रमेण। सङ्ख्यायोगे जाताः सर्व एव अन्यवित्त सुखिनो भवन्ति। अथैकस्मिन् राशौ चरे स्थिरे द्विःस्वभावे वा यदा सर्वे ग्रहा भवन्ति तदा रज्जुमुसलानलादियोगानां मध्ये अन्यतमो योगो भवति। यद्यप्युक्तयोगान् विहायेति। तथापि सङ्ख्यायोगाः निरवकाशाः। अतः 'निरवकाशादिविधयः सावकाशान् विधीन् बाधन्ते' इति न्यायेन सङ्ख्यायोगेन आश्रययोगाऽत्र बाध्यते यस्माद् गोलस्यान्य उपाय एव नास्ति तथा दलयोगाकृतियोगयोः समकाले उपस्थानं नास्ति तथा दलयोगाश्रययोगयोरपि नास्ति। अथ दलयोगैः सङ्ख्यायोगा युज्यन्ते। तथापि दलयोगप्राबल्यं तथाकृतियोगा आश्रययोगैः युज्यते तदा आकृतियोगफलं भवति। सङ्ख्यायोगा आश्रययोगाश्च आकृतियोगैरभिभूयन्ते। आश्रययोगाः सङ्ख्यायोगा नाभसादियोगाश्च समाप्तदशास्वपि फलप्रदा भवन्ति।। १२।।

गोल योग इत्यादी योगांची फळे क्रमशः येणेप्रमाणे आहेत.

– गोल योगात जन्मलेला जातक दुःखी होतो.
– युग योगात जन्मलेला जातक गरीब (द्ररीद्री) असतो.
– शुलयोगात जन्मलेला जातक घातक असतो.
– केदार योगात जन्मलेला जातक शेतकरी असतो.
– पाशयोगात जन्मलेला जातक दुष्ट स्वभावाचा असतो.
– दामयोगात जन्मलेला जातक पशुपालन/जनावरे वागवणारा असतो.
– वीणायोगात जन्मलेला जातक काम करण्यात निपूण/कुशल असतो.
– संख्या योगात जन्मलेला जातक दुसऱ्याच्या भाग्याने जगतात. तसा सुखाचा अनुभव करतात.

**विशेष :** आकृति ईत्यादी योगांचे लक्षण जर संख्यायोगात कमी होत असतील तर संख्या योग समजू नये. आकृति योगच समजावा. चरादि राशिंचा आश्रय होत असल्याने आश्रययोग, ग्रहांच्या शुभाशुभ फरकाने दलयोग, ग्रहयोगाच्या आकृत्यनुसार आकृति योग तसेच स्थान संख्यानुसार संख्यायोग असे नाव ठेवले आहे.



**अध्याय १३ वा संपला.**

* * * * * * * *

(१४)

अध्याय चौदावा

# स्त्रीजातकाध्याय

## स्त्रीचे स्वरूप आणि सौभाग्य

*स्त्रीपुंसोर्जन्मफलं तुल्यं किन्त्वत्र लग्नचन्द्रस्थम्।*
*तद्बलयोगाद्वपुराकृतिश्च सौभाग्यमस्तमयात् ।। १।।*

**भट्टोत्पल :** स्त्रीपुंसोरिती। अथ स्त्रीजातकाध्यायं व्याख्यास्यामः। तत्रादावेव पुरूष जन्मोक्तफलनिर्देशमाह–स्त्रीपुंसोर्जन्मफलं तुल्यं यादृशमेव पुरूषजातकं तादृशमेव स्त्रियाः। स्त्रीणां विशेषश्चन्द्राक्रान्तराशिवशेन लग्नवशेन च विचारणीयम्। किं तदित्याह–तद्बलयोगाद्वपुराकृतिः। चन्द्रवशाच्च लग्नवशाच्च दपुस्तस्या वक्तव्यम्। आकृतिश्च वक्तव्या। वपुः स्वरूपं आकृतिःसंस्थानं स चेत् सौम्यग्रहयुक्तो भवति तदा सुभगा वाच्या। पापग्रहयुक्ते हृष्टे तस्मिन् दुर्भगेति वाच्यम्।। १।।

**सती :** स्त्री आणि पुरूषांचे जन्मवेळीच्या ग्रहांची फळे सर्व सारखे समजावे.

– स्त्री कुंडलीत लग्न आणि चंद्राच्या बलवत्तेनुसार स्वरूप व स्वभाव इत्यादीचा विचार करावा. तसेच सातव्या भावावरून पती/पत्नी सुखाचा विचार केला पाहिजे. म्हणजे बलवान लग्न आणि चंद्रानुसार सुंदर स्वरूप तसेच सातव्या स्थान शुभ ग्रहाने युत किंवा दृष्ट असेल तर उत्तम पति/पत्नी सुख मिळते असे समजावे.

## स्त्रीचा स्वभाव

*युग्मर्क्षे लग्नेन्द्वोः प्रकृतिस्था रूपशीलगुणयुक्ता।*
*ओजे पुरूषाकारा दुःशीला दुःखिता चैव।। २।।*

**भट्टोत्पल :** युग्मर्क्ष इति। चन्द्रलग्नवशाद्वपुरित्येतदुक्तमिति तन्निर्देशार्थमाह–युग्मराशौ वृषादौ स्थिते चन्द्रमसि लग्ने वा जाता स्त्री प्रकृतिस्था भवति। स्त्रीरूपेत्यर्थः। रूपशीलगुणयुता भवति ओजे विषमराशौ मेषादौ स्थिते चन्द्रमसि लग्ने वा तस्मिन् जाता स्त्री पुरूषाकारा भवति। दुःशीला दुःखिता च भवति। अर्थादेव चन्द्रलग्नयोः एकस्मिन् युग्मराशिगते अन्यस्मिन् ओजराशिगते मध्यगुणा च भवति।। २।।

**सती :** जर लग्न आणि चंद्र हे सम (२,४,६,८ ई.) राशित असतील तर ती जातक स्त्री चांगली रूपवान असते. चारीत्रवान आणि सद्‌गुणानी संपन्न असते. मात्र लग्न आणि चंद्र हे विषम राशीत (१,३,५,७,९ ई.) असतील तर स्त्री पुरूषासारखी दिसते. आणि ती दुष्ट स्वभावाची आणि दुःखी असते. जर मिश्र राशित असतील तर मिश्रीत स्वभाव समजावा.

### सातव्या भावावरून पतिचा विचार

*अबले सप्तमभवने सौम्येक्षणवर्जिते च कापुरूषः।*
*भवति पतिश्चरभऽस्ते प्रवासशीलो भवेद् भ्रान्तिः।। ३।।*

**भट्टोत्पल :** अबल इति। तस्याः पतिस्वरूपमाह–लग्नात् सप्तमभवने बलहीने सौम्यग्रहदर्शनविवर्जिते च जातायाः तस्याः भर्ता का पुरूषो भवति नाम कुत्सितपुरूषो भवति। जन्मभवनात् सप्तमभवने चरराशिगते या जाता स्त्री तस्याः भर्ता परिभ्रमणशीलो भवति। स्थिरराशौ सप्तमस्थानगते नित्य गृहस्थः द्विःस्वभावे सप्तमस्थानगते मिश्र इति।। ३।।

**सती :** ज्या स्त्रीच्या कुंडलीत सातवे घर निर्बल असून त्यावर शुभ ग्रहांची दृष्टी नसेल तर त्या स्त्रीचा पति, नीचा स्वभावाचा असतो. जर सातव्या घरात चर रास असेल तर तीचा पती परदेशात राहणार असतो. किंवा सतत फिरस्तीवर असतो. जर सातवे घर स्थीर राशीचे असेल तर एका ठिकाणी राहणारा असतो. स्थीर असतो. सातवे घर द्विवस्वभाव राशीचे असेल तर पती मध्यम स्वभावाचा असतो. तो कधी घरी तर कधी परदेशात फिरणार असतो.

### विधवा ईत्यादी अशुभ योग

*बाल्ये विधवा भौमे पतिसन्त्यक्ता दिवाकरेऽस्तस्थे।*
*सौरे पापैर्दृष्टे कन्यैव जारं समुपयाति।। ४।।*

**भट्टोत्पल :** बाल्य इति। यस्या जन्म लग्नात् सप्तमेऽङ्गारको भवति सा बाल्ये एव विधवा भवति। सप्तमेऽर्के जाता या स्त्री सा पत्या सन्त्यज्यते। यस्या जन्म लग्नाच्छनैश्चरः सप्तमे भवति स च पापग्रहदृष्टः वा कन्यैव सती अनूढैव जारं समुपयाति प्राप्नोति।। ४।।

**सती :** लग्नापासून सातव्या घरात

– जर मंगळ असेल तर ती स्त्री लहान पणीच विधवा होते. आणि हा नियम कितपत लागु होईल शंका आहे. कारण आजकाल बाल विवाह होत नाही. आणि बालविवाह करणे हा कायद्याने गुन्हा आहे. तरीही आजही काही दुर्गम भागात आदिवासी भागात बालविवाह होतात. त्यांना हे लागू पडेल.

- जर सातव्या घरात मंगळ असेल आणि विवाह बालविवाह नसेल तर लग्नानंतर लगेचच किंवा काही काळाने अशी स्त्री विधवा होईल असे सांगता येईल.
- जर सातव्या घरात सूर्य असेल अशा स्त्रीला तीचा पती सोडून देतो. तिच्या त्याग करतो. म्हणजेच अशी स्त्री परितक्त्या असते
- जर सातव्या घरात शनि असेल आणि पापग्रहाची त्यावर दृष्टी असेल तर अशी स्त्री कुमारीका असतांना पुरूषासोबत रतिकार्य म्हणजे संभोग करते. दुष्कर्म करते.

### ब्रम्हवादिनी योग

*सितकुज जीवेन्दु सुतैर्बलिभिर्लग्ने समश्च यवि राशिः।*
*स्त्री ब्रह्मवादिनी स्यात् सुशास्त्रकुशला प्रतीता सा।। ५।।*

**भट्टोत्पल :** सितकुजेति। येन योगेन जाता ब्रह्मवादिनी भूरिशास्त्रकुशला प्रतीता च भवति तदर्थमाह–यस्या जन्मनि लग्नगतः समराशिर्भवति। शुक्राङ्गारक गुरूबुधाश्च तस्मिन् बलिनो भवन्ति तदा जाता स्त्री ब्रह्मवादिनी मोक्षशास्त्रकुशला प्रतीता च भवति। प्रतीता विख्याता।।५।।

**सती :** जन्माच्या वेळी स्त्रीचे जन्मकुंडलीत लग्न समराशींचे (२,४,६,८,१०, ई.) असून लग्नात बलवान शुक्र, मंगळ, गुरू आणि बुध असतील तर ती स्त्री ब्रम्हवाहीनी म्हणजे ब्रम्ह जाणणारी असते. मोक्ष शास्त्रात निष्णात आणि प्रतिध्दी मिळालेली असते.

### विशेष फल

*पुञ्जन्मफलं यद्यन्न घटति वनितासु तत्तासाम्।*
*वक्तव्यं राज्याद्यं वृषण विनाशादि वा पापम्।। ६।।*

**भट्टोत्पल :** पुञ्जन्मफलमिति। अथ स्त्रियाः पुरूष–जन्मफलासम्भवे तद्भर्तुरिति आदेशार्थमाह –स्त्रीपुंसोर्जन्मफलं तुल्यमित्युक्तं। यत्र शुभमशुभं वा स्त्रियो न घटते न सम्भवतीत्यर्थः। यथा राज्याद्यं शुभं, पापं वा वृषण विनाशादिकं तत्र तस्या भर्त्तुर्वक्तव्यम्, एवमन्यान्यघटमानानि वेदितव्यानि।। ६।।

**सती :** स्त्रीच्या जन्मकुंडली वरून ज्या फळ प्राप्तीची शक्यता, ती स्त्री असल्याने किंवा कोणत्या ईतर कारणामुळे, होत नसेल तर ते फळ तिच्या पतीच्या संबंधी समजावे. जसे राज्य प्राप्ती ईत्यादि शुभ फळ तसेच अंडकोषाचा विनाश ईत्यादि पाप फळांचा विचार करावा.

**अध्याय १४ वा संपला.**



* * * * * * * *

(१५)

अध्याय पंधरावा

# निर्याणाध्याय

### आठव्या घरातील ग्रहावरुन मरणाचे ज्ञान

*सूर्यादिभिर्निधनगैर्हूतवहसलिलायुधज्वरामयज्ञः।*
*क्षुत्तृट् कृतश्च मृत्युः परदेशे नैधने चरभे।। १।।*

**भट्टोत्पल :** सूर्यादिभिरिति। अथ निर्याणाध्यायं व्याख्यास्यामः। तत्रादौ सूर्यादिभिरष्टगैर्मृत्युज्ञानमाह–यस्य जन्मलग्नादष्टमस्थानेऽर्को भवति तस्याग्निहेतुको मृत्युर्भवति। यस्य चन्द्रोऽष्टमो भवति तस्य जलात्, यस्य भौमोऽष्टमो भवति तस्याऽऽयुधहेतुको मृत्युः। यस्य बुधाऽष्टमो भवति तस्य ज्वरहेतुको मृत्युः। यस्य गुरूरष्टमो भवति तस्यामयात्। आमयादजीर्णादिरोगतः। यस्य शुक्रोऽष्टमो भवति तस्य क्षुद्धेतुको मृत्युः। यस्य शनैश्चरोऽष्टमगो भवति तस्य तृड्हेतुको मृत्युर्भवति। बहवो ग्रहाः अष्टमस्थानगता भवन्ति तदा यो बलवान् तद्धेतुको मृत्युर्भवति। एवं प्रकारे जाते दर्शनार्थज्ञानमाह–यस्य लग्नादष्टमो राशिश्चराख्यो भवति तस्य परदेशे मृत्युर्भवति अर्थाद्यस्य लग्नादष्टमः स्थिरराशिर्भवति तस्य स्वदेशे मृत्युः। यस्याष्टमो द्विःस्वभावराशिर्भवति तस्य मार्गे मृत्युर्भवति।। १।।

**सती :** जन्म लग्नापासून आठव्या घरात जर सुर्य असेल तर जातक अग्नीमुळे –
चंद्र असेल तर – पाण्यामुळे
मंगळ असेल तर – शस्त्राने
बुध असेल तर – तापामुळे
गुरू असेल तर – अजीर्ण झाल्याने
शुक्र असेल तर – भुकेमुळे आणि शनि असेल तर तहानेते मरतो.

जर अनेक ग्रह आठव्या घरात असतील तर तो जातक, आठव्या स्थानातील जो ग्रह बलवान असेल त्या ग्रहानुसार त्या जातकाचा मृत्यु होईल असे समजावे. जर आठव्या भावात चर राशि (१,४,७,१०) असेल तर तो जातक परदेशात मृत्यु पावतो. जर आठव्या

भावात (२,५,८,११) स्थीर राशि असेल तर आपल्या घरी/गावात मृत्यु पावतो. जर द्विस्वभाव राशि (३,६,९,१२) आठव्या स्थानी असेल तर प्रवासात/मार्गात मृत्यु होतो. असे समजावे.

## इतर मृत्यु स्थानाचे ज्ञान

*यो वा निधनं पश्यति बलवांस्तद्धातुकोपजो मृत्युः।*
*लग्नात् त्र्यंशपतिर्वा द्वाविंशः कारणं मृत्योः।। २।।*

**भट्टोत्पल :** यो वेति। यस्य लग्नादष्टमं स्थानं शून्यं ग्रहवर्जितं भवति तस्य मृत्यु ज्ञानमाह– यदा अष्टमस्थानं शून्यमादित्यः पश्यति तदा पित्तप्रकोपेण म्रियते। यदा चन्द्रः पश्यति तदा कफवातप्रकोपेण, भौमस्तदा पित्तप्रकोपेण, बुधश्च तदा वातपित्तश्लेष्मणां त्रयाणामपि प्रकोपेण, बृहस्पतिस्तदा कफप्रकोपेण, शुक्रस्तदा कफवातप्रकोपेण, शौरिस्तदा वातप्रकोपेण। यदा बहवो ग्रहाः अष्टमस्थानं पश्यति तदा तेषां मध्ये यो बली भवति तस्य धातुकोपेन मृत्युर्भवति। यस्य जन्मन्यष्टमं स्थानं केनचिद्युतं दृष्टं न भवति तस्य मृत्युकारणज्ञानमाह–यस्य जन्मलग्नाद्यो लग्नत्र्यंशः द्रेष्काणः तस्माद् द्वाविंशो यो द्रेष्काणः तस्य योऽधिपतिस्तस्य यत्कारणमुक्तं हुतवहसलिलादि तत्कृतो मृत्युर्भवति।। २।।

**सती :** जर आठव्या घरात कोणता ग्रह नसेल आणि जेवढे ग्रह आठव्या घराला पाहत असतील त्यामधील बलवान ग्रहाच्या धातूप्रकोपाने (वात..पित्त..कफ) जातकाला मरण येईल असे समजावे. आणि जर आठव्या भावावर कोणत्याही ग्रहाची दृष्टी नसेल तर लग्नस्थ द्रेष्काणात २२ व्या द्रेष्काणाचा स्वामी मृत्युचे कारण ठरतो. जसे लग्नात प्रथम द्रेष्काण (एका राशिचे ३ भाग केले असता प्रत्येक भाग हा द्रेष्काण असतो) असेल तर आठव्या भावाचा प्रथम द्रेष्काण २२ वा होतो. अशा प्रकारे वरील स्थितीपैकि कुठलीही एकापेक्षा जास्त परीस्थिती आठव्या झारात निर्माण होत असतील तर अनेक कारणांनी मृत्यू येईल असे समजावे.

## मरणानंतर मिळणाऱ्या गतीचे ज्ञान

*सुरपितृतिर्यङ् नरकान् गुरूरिन्दुसितावसृग्रवी ज्ञयमौ।*
*रिपुरन्ध्रत्र्यंशकपा नयन्ति चाऽस्तारिनिधनस्थाः।। ३।।*

**भट्टोत्पल :** सुरपितृ–इति। लग्नात् स्वषष्ठस्थानस्थो ग्रहः स्वपठितां गतिं नयति। सप्तमस्थाऽष्टमस्थश्च। यदैते त्रिष्वपि तदा तेषां यो बलवान् स्वस्वपठितां गतिं नयति। अथ त्रीण्येतानि शून्यानि भवन्ति तदा पुरूषजन्मलग्नात् षष्ठे स्थाने यो द्रेष्काणस्तथाऽष्टमे

तयोर्यावधिपती तयोर्यो बलवान् स स्वपठितां गतिं नयति। तत्र जन्मलग्ने प्रथमद्रेष्काणस्तदा षष्ठेऽपि राशौ प्रथमो भवति। अथ जन्मलग्ने द्वितीयस्तदा षष्ठेऽपि राशौ द्वितीयो भवन्ति। अथ जन्मलग्ने तृतीयः षष्ठे तृतीयः। एवं सप्तमाष्टमयोरपि न केवलं यावत्सर्वेष्वेव एवमपि नवांशकल्पना तत्र बृहस्पतिर्यदा गतिदायको भवति तदा देवलोके गतिं प्रयच्छति। चन्द्रशुक्रयोरन्यतमः पितृलोके गतिं प्रयच्छति। आदित्यभौमयोरन्यतमस्तिर्यग्लोके गति प्रयच्छति। बुधशनैश्चरयोरन्यतमा नरकं प्रयच्छन्ति ।। ३।।

**सती :** जन्म लग्नापासून सहा, सात आणि आठव्या घरातील ग्रहांमध्ये

- गुरू बलवान  असेल तर मेल्यानंतर जातक देवलोकात जातो.
- चंद्र आणि शुक्र बलवान असेल तर जातक पितृलोकात जातो,
- मंगळ आणि  सूर्य बलवान असेल तर तो जातक मृत्युलोकांत तसेच
- बुध आणि शनि बलवान असेल तर तो जातक नरकलोकात जातो.
- जर सहा, सात आणि आठव्या भावात कोणताच ग्रह नसेल तर सहा आणि आठ भावात जो  द्रेष्काण स्वामी पैकी जो बलवान असेल त्या संबंधीचा लोकास जातक जातो.

## मोक्षासंबंधीचे ज्ञान

*षष्ठाष्टमकण्टकगो गुरूरूच्चो भवति मीनलग्ने वा।*
*शेषैरबलैर्जन्मनि मरणे वा मोक्षगतिमाहुः।। ४।।*

**भट्टोत्पल :** षष्ठाष्टमेति। मोक्षयोगज्ञानमाह–यस्य जन्मनि लग्नात् षष्ठे स्थानेऽष्टमे वा केन्द्राणामन्यतमे वा बृहस्पतिर्भवति स चोच्चस्थो भवति तदा मोक्षो भवति। अथवा लग्नं मीनो भवति तत्र बृहस्पतिवर्ज्यमन्ये ग्रहा बलवर्जिता भवन्ति तदा जातस्य मोक्षो भवति। एवंविधे योगे मरणकाले मोक्षो भवति। तत्र जन्ममरणं तत्सर्वेषामपि गतियोगानां ज्ञातव्यम्।।४।।

**सती :** जन्माचे वेळी किंवा मरणाचे वेळी लग्नापासून ६,८,१,४,७,१० यापैकी कोणत्याही स्थानात कर्केचा गुरू (गुरू उच्चीचा) असेल तर त्या जातकाला मरनानंतर मोक्ष प्राप्त होतो. किंवा मीन लग्नात गुरू असेल आणि बाकी सर्व ग्रह (गुरू सोडून) निर्बली असतील तरीही जातकाला मोक्ष प्राप्त होतो.

## पूर्व जन्मीच्या योनि ज्ञान



*गुरूरूडुपतिशुक्रौ सूर्यभौमौ यमज्ञौ*

*विबुधपितृतिरश्चो नारकीयांश्च कुर्युः।*
*दिनकरशशिवीर्याऽधिष्ठितत्र्यंशनाथाः*
*प्रवरसमनिकृष्टास्तुङ्गह्रासादनूके।। ५।।*

**भट्टोत्पल :** गुरूरूडुपतीति। यो जातो जन्तुः स कस्माल्लोकादागत इति ज्ञानार्थमाह–आदित्यचन्द्रयोर्यो बलवान्स यस्मिन्द्रेष्काणे व्यवस्थितः तस्य द्रेष्काणस्य योऽधिपस्तस्य यो लोकस्तस्मादागत इति वक्तव्यम् । स यदि द्रेष्काणो गुरूसम्बन्धी भवति तदा देवलोकागत इति वाच्यम्। चन्द्रशुक्रयोरन्यतरसम्बन्धी चेद्भवति तदा पितृलोकादागत आदित्यभौमयोरन्यतरसम्बन्धी चेद्भवति तदा तिर्यग्लोकात्। बुधसौरयोरन्यतरसम्बन्धी चेद्भवति तदा नरकलोकादागतः। यस्माल्लोकादागतः तत्रापि श्रेष्ठमध्यहीनत्वमाह। यद्गुरहदर्शितलोकाद्यस्य जन्म स चेद् ग्रहः स्वोच्च राशिस्थः तत्रासौ श्रेष्ठ आसीदिति ज्ञेयम्। अथोच्चराशिच्युतो नीचराशिमप्राप्यावस्थितस्तदासौ मध्यम आसीदिति ज्ञेयम्। अथ नीचराशिस्थितस्तदाधम आसीदिति ज्ञेयम् ।। ५।।

**सती :** जातक कोणत्या योनीतून जन्माला आला ते कसे पाहायचे ते या श्लोकात सांगीतले आहे. कुंडलीत सूर्य आणि चंद्रापैकी जो बलवान असेल आणि तो बलवान ग्रह ज्या द्रेष्काणात असेल त्या द्रेष्काणाचा स्वामी जर गुरू असेल तर जातक पूर्वजन्मात देवता असतो. म्हणजे देवयोनीत असतो. जर चंद्र किंवा शुक्र द्रेष्काणचा स्वामी असेल तर जातक पूर्व जन्मी पितृलोकात असतो.

सूर्य किंवा मंगळ, द्रेष्काणाचा स्वामी असेल तर जातक पूर्वजन्मी मृत्युलोकात असतो. तसेच शनि किंवा बुध हा द्रेष्काणचा स्वामी असेल तर तो जातक पूर्वजन्मी नरकलोकात राहणारा असतो. असे समजावे.

द्रेष्काणा चा स्वाती उच्चीचा असेल तर तो जातक पूर्व जन्मी देवयोनीत ही श्रेष्ठ असतो. नीचीचा द्रेष्काण स्वामी असेल तर निम्न तसेच उच्च–नीचच्या मध्ये असेल तर मध्यम समजावा.

**अध्याय १५ वा संपला.**

* * * * * * * *

(१६)

अध्याय सोळावा

# नष्टजातकाध्याय

### प्रश्न लग्न आणि ग्रहावरून पिण्डसाधन

*गोसिंहौ मिथुनाष्टमौ क्रियतुले कन्यामृगौ च क्रमात्।*
*संवर्ग्या दशकाष्टसप्तविषयैः शेषाः स्वसङ्ख्यागुणाः।*
*जीवारास्फुजिदैन्दवः प्रथमवच्छेषा ग्रहाः सौम्यव-*
*द्राशीनां नियतो विधिर्ग्रहयुतैः कार्या च तद्वर्गणा।। १।।*

**भट्टोत्पल :** गोसिंहाविती। तत्र प्रश्नकाले तात्कालिकलग्नं कृत्वा लिप्तापिण्डीकार्यम्। तत्र तस्य लिप्तापिण्डीकृतस्य गुणाकारविज्ञानार्थमाह–वृषलग्नगतं दशभिर्गुणयेत् सिंह च दशभिरेवं मिथुनमष्टभिर्वृश्चिकमप्यष्टभिः मेषं सप्तभिस्तुलामपि सप्तभिर्गुणयेत्। कन्या पञ्चभिःमकरमपि पञ्चभिः कर्कटलग्नगतं चतुर्भिर्गुणयेत्। धनुर्नवभिः कुम्भमेकादशभिः मीनं द्वादशभिरेव तावल्लग्नं स्वगुणाकारेणावश्यमेव गुणयेत्। लग्ने यदि ग्रहो भवति तत्र गुणाकारविधिः गुरौ लग्नगते दशभिर्गुणयेत्। भौमे लग्नगते अष्टभिः शक्रे सप्ताभिः बुधे पञ्चभिः शेषा आदित्यचन्द्रशनयस्तेषां प्रत्येकं पञ्चभिर्गुणाकार एवं तत्काललिप्तापिण्डीकृतं लग्नमवश्यं राशिगुणकारेण गुणयेत्। ततो ग्रहसम्भवे सति ग्रहोक्तगुणकारैरपि एवं गुणितमेकान्ते स्थापयेत्।।१।।

**सती :** ज्या जातकाची जन्मकुंडली नाही किंवा त्याला आपली जन्मतारीख, जन्मवेळ माहीत नाही, त्याची प्रश्न कुंडली करतेवेळी त्यावेळचे स्पष्ट लग्न, ईतर राशि व स्पष्ट ग्रह त्या त्या घरात/भावात लिहील्या नंतर पिंडसाधन करावे. प्रश्न लग्नातील राशिच्या कला करून पिंड साधन करतांना येणाऱ्या गुणाकाराला खालील प्रमाणे राशि संख्येने गुणावे.

- जर वृषभ किंवा सिंह लग्न असेल तर १० ने गुणावे
- मिथुन किंवा वृश्चिक लग्न असेल तर ८ ने गुणावे
- मेष किंवा तुला लग्न असेल तर ७ ने गुणावे

- कन्या किंवा मकर लग्न असेल तर ५ ने गुणावे.
- धनु लग्न असेल तर ९ ने गुणावे
- कुंभ लग्न असेल तर ११ ने गुणावे
- मीन लग्न असेल तर १२ ने गुणावे
- कर्क लग्न असेल तर ४ ने गुणावे

  येणाऱ्या गुणाकाराला लग्नात स्थित असलेल्या ग्रहानुसार त्याच्या संखेने गुणावे
- जर लग्नात गुरू असेल तर १० ने गुणावे
- जर  लग्नात मंगळ असेल तर ८ ने गुणावे
- जर लग्नात शुक्र असेल तर ७ ने गुणावे
- बुध असेल तर ५ ने गुणावे
- लग्नात असलेल्या राशीचे कलापिंड करणे आवश्यक आहे, मात्र लग्नात ग्रह स्थित असेल तरंच अन्यथा नाही.
- तसेच लग्नात अनेक ग्रह असतील तर सर्व ग्रहांचे आपापल्या गुणकांनी लग्नातील राशिच्या कलापिंडाला गुणून स्पष्ट कलापिंड मिळतात.

**विशेष –** जर जन्मवेळची लग्न तिथी, नक्षत्र ईत्यादि आठवत नसेल आणि त्याचे ज्ञान मिळवायचे असेल तर ही पध्दत वापरायला पाहीजे.

उदाहरण –

२ १२
शुक्र
१
३ ११
४ १०
५ ७
९
६ ८

**उदाहरणार्थ –** प्रश्न करतेवेळी राश्यादिक स्पष्टलग्न ६/२०/१०/५ आहे. प्रश्न–कुण्डलीत लग्नात शुक्र आहे. स्पष्ट लग्न राशिच्या कला केल्यावर त्याचा गुणाकार १२०१०/५ होतात. (३० अंशाची एक रास म्हणून ६ राशिचे १८० अंश झालेत. त्यात २० अंश मिळविले असता एकूण २०० अंश होतात. या २०० अंशाच्या कला करूया. एका

अंशाच्या ६० कला असतात. तर २०० गुणेला ६० केले असता १२,००० कला येतात. आपल्याजवळ आधीच्या असलेल्या १० कला त्यात मिळविल्या असता एकूण कला १२०१० कला होतात. आणि ५ विकला आहेत. लग्नात तुला राशि असल्याने तिचा गुणांक ७ ने गुणल्यानंतर ( १२०१०/५ ७) ८४०७०/३५ गुणाकार येतो. आता लग्नात शुक्र ग्रह आहे, त्याचा गुणांक ७ आहे. म्हणजे ७ ने गुणल्यावर (८४०७०। ३५७) गुणाकार ५८८४९४। ५ येतो. हाच प्रश्नवेळचा स्पष्ट कलापिण्ड झाला याच्या आधारेच जन्म वेळ ईत्यादिचे ज्ञान मिळेल ।। १।।

जसे – १) वर्ष ज्ञानार्थ २) मास ज्ञानार्थ
३) ऋृतु ज्ञानार्थ ४) पक्ष ज्ञानार्थ
५) तिथी ज्ञानार्थ ६) दिन/रात्री ज्ञानार्थ
७) नक्षत्र/रात्री ज्ञानार्थ ८) ईष्टकाल/रात्री ज्ञानार्थ

### *नक्षत्राचे ज्ञान*

*सप्ताहतं त्रिघनभाजितशेषमृक्षं*
*दत्वाऽथवा नव विशोध्य नवाऽथवा स्यात्।*
*एवं कलत्रसहजात्मजशत्रुभेभ्यः*
*प्रष्टर्वदेदुदयराशिवशेन तेषाम्।। २।।*

**भट्टोत्पल :** सप्ताहतमिति। अथ नक्षत्रानयनमाह–प्राक् योऽसौ राशिः पृथक् स्थापितस्ततः सप्तभिर्गुणयेत् ततस्तत्र नवदेयाः शोध्या वा न किञ्चिद्वा कदोच्यते। यदा प्रशलग्ने प्रथमद्रेष्काणो भवति तदा नव देया। अथ द्वितीयस्तदा न देया न शोध्याः। अथ तृतीयस्तदा नव शोध्याः। एवं कृत्वा तस्य राशेः सप्तविंशत्या भागमाहरेत्। ततो यावत्संख्याकोऽवशेषो भवति तावत्संख्यमश्विन्यादितो यन्नक्षत्रं भवति तन्नक्षत्रं तस्य वाच्यम्। अथ पुरूषः स्वपत्न्या नक्षत्रं पृच्छति तदा तात्कालिके लग्ने राशिषट्कं दत्वा तस्य लग्नस्य लिप्तपिण्डीकृत्वाऽऽगतं राशिंगुणकारेण गुणयेत। लग्ने ग्रहश्चेत्तद्गुणकारेण गुणयेत। ततस्तस्य सप्तगुणस्य प्रागवन्नवाङ्क विशोधनं कर्तव्यम्। ततस्तस्य सप्तविंशत्या भागमपहृत्यावशेषाङ्कसमं तत्पत्न्या नक्षत्रं वाच्यम्। अथ भ्रातुः पृच्छति तदा तत्काललग्ने राशिद्वयं दत्त्वा एतदेव कर्म कृत्वा तत् भ्रातुः नक्षत्रं वाच्यम्। अथ पुत्रस्य पृच्छति तदा तत्काललग्ने राशिचतुष्टयं दत्त्वा तदेव कर्म कृत्वा तत्पुत्रनक्षत्रं वाच्यम्। अथ शत्रोः पृच्छति तदा तत्काललग्ने शशिपञ्चकं दत्त्वातदेव कर्म कृत्वा तच्छत्रुनक्षत्रं वाच्यम्। एतदुपलक्षणार्थं त्रिराशिसहितात् तात्कालिकाल्लग्नात् तन्मित्रस्यापि वाच्यम्। नक्षत्रानयनं उपलक्षणार्थमेवं सकलमपि नष्टजातकं वाच्यम्।। २।।

**सती –** पूर्वीच्या श्लोकात (श्लोक नं. १ नुसार) आपण काढलेल्या कला पिंडला ७ ने गुणले असता जो गुणाकार येईल त्याला २७ ने भाग दिल्यावर जी संख्या बाकी राहील त्या संखेला जन्म नक्षत्र (संखेनुसार अश्विनी, भरणी ईत्यादि नक्षत्र) समजावे. जर एखादेवेळी हे शक्य नाही असे वाटले तर त्यात ९ ही संख्या मिळवावी किंवा त्यातून वजा करावी. येणारी संख्या म्हणजे जन्म नक्षत्र समजावे. किंवा कलापिंड ला ७ ने गुणून त्यात ९ जोडून किंवा कमी करून राहणाऱ्या संखेला २७ ने भाग दिल्यावर जी संख्या शिल्लक राहील तिला नक्षत्र समजावे.

अशाप्रकारे प्रश्न विचारते वेळी, सातव्या भावावरून प्रश्नकर्त्याच्या पत्नीचा, तिसऱ्या भावावरून भावाचा, पाचव्या भावावरून मुलाचा आणि सहाव्या भावावरून शत्रुचा, विचार करावा. अशाप्रकारे कला पिंडादि साधन करावे आणि वरील प्रमाणे त्या लोकांचे नक्षत्र समजावे.

**विशेष –** जिथे वर्ष इत्यादीचे मान असंभव वाटत असेल तिथे सुध्दा ९ ने मिळवावे किंवा कमी करावे. चर राशीचे लग्न असल्यास त्यात ९ मिळवावे. द्विस्वभाव राशीत ९ कमी करावे. आणि स्थिर राशी असेल तर ते जसेच्या तसे ठेवावे. अधिक स्पष्ट होण्यासाठी खालील उदाहरण पहा

**उदाहरण –**

५८८४९४। ५ कलापिण्ड
× ७ नक्षत्र–गुणांक

२७) ४११९४५८।३५ (१५२५७२
२७
१४१
१३५
००६९
५४
१५४
१३५
०१९५
१८९
००६८
५४
१४ शेष

**सती -** इथे पूर्वी साधन करून मिळविलेल्या कलापिंड ५८८४९४/५ ला ७ ने गुणले असता. ४११९४५८/३५ ही संख्या येते. या संख्येला पुन्हा २७ ने भाग दिल्यास शेवटी १४ शिल्लक राहतात. म्हणजे पूर्वीच्या नियमानुसार अश्वीनी नक्षत्रापासून १४ वे नक्षत्र मोजले असता चित्रा नक्षत्र येते. आता इथे १४ नंतर आणि ३५ (१४/३५) ही संख्या शिल्लक राहते म्हणजे १४ वे पूर्ण नक्षत्र चित्रा व त्यानंतर ३५ घटी या स्वाती नक्षत्राच्या भुक्त घटी झाल्यात परंतू चर लग्न असल्याने त्यात ९ जोडले असता. (१४+९ = २३) २३ वे मागील नक्षत्र म्हणजे धनिष्ठा नक्षत्र येते आणि वर्तमान नक्षत्र शततारकाच्या ३५ भूक्त घटी येतात.

## कलापिण्डावरून वर्ष, महिन्याचे ज्ञान

*वर्षर्तुमासतिथयो द्युनिशं ह्युडूनि*
*वेलोदयर्क्षनवभागविकल्पनाः स्युः।*
*भूयो दशादिगुणिताः स्वविकल्पभक्ता*
*वर्षादयो नवकदानविशोधनाभ्याम्।। ३।।*

**भट्टोत्पल :** वर्षर्तुमासेति। अथ वर्षाद्यानयनम्–लग्नं तावत्तात्कालिकं लिप्तापिण्डीकृतं राशिगुणकारहतं सम्भवात्तु ग्रहगुणकारहतमपि एकान्ते स्थापितं तद्दशादिगुणं कारयेत्। एतदुक्तं स राशिस्थानचतुष्टये कार्यः, एकत्र दशगुणः कार्यः, द्वितीये स्थानेऽष्टगुणः, तृतीये सप्तगुणः, चतुर्थे पञ्चगुणः। ततस्तेषां प्राग्वत् नवकदानविशोधनं कृत्वा स्वविकल्पैर्भागमपहृत्यावशेषं वर्षादयो ज्ञेयाः।। ३।।

**सती -** वरीलप्रमाणे मिळविलेले कलापिंड ला (नक्षत्रनयनाप्रमाणे १०,८,७, आणि ५ या गुणकांनी गुणून येणाऱ्या कलापिंड ला) १० ने गुणून येणाऱ्या संखेत ९ मिळवून किंवा कमी करून आपापल्या विकल्प संखेने भाग दिल्यावर वर्षे, ऋृतू आणि महिन्याचे ज्ञान होते.

- जसे जन्म वर्षाचे ज्ञान होण्यासाठी मिळविलेल्या कलापिंडाला १२० ने भागावे,
- ऋृतुचे ज्ञान होण्यासाठी ६ ने भागावे,
- महीन्याचे ज्ञान होण्यासाठी १२ ने भागावे,
- पक्षाचे ज्ञान होण्यासाठी २ ने भागावे,
- तिथिचे ज्ञान होण्यासाठी १५ ने भागावे,
- नक्षत्राचे ज्ञान होण्यासाठी २७ ने भागावे. तसेच

– २ ने भाग दिल्यानंतर दिवस तसेच रात्रीचे ज्ञान होते.
– ७ ने भाग दिल्यानंतर वाराचे ज्ञान होते,
– १२ ने भाग दिल्यानंतर लग्नाचे ज्ञान होते,
– २ ने भाग दिल्यानंतर होऱ्याचे ज्ञान होते,
– ९ ने भाग दिल्यानंतर नवमांशाचे ज्ञान होते.

म्हणजे वरीलप्रमाणे भाग दिल्यानंतर जी संख्या शिल्लक राहील ती संख्या अनुक्रमे आपापल्या विकल्याने भाग दिल्यावर इष्ट घटी, लग्न, होरा, नवमांश इत्यादिचे ज्ञान मिळवायला पाहिजे. शब्दार्थासाठी पुढील श्लोक पहा

**विशेष –** वर्षाचा विकल्प १२०, ऋतूचा ६, महिन्याचा १२ पक्षाचा २, तिथिचा १५ नक्षत्राचा २७, दिवसाचा/वाराचा विकल्प ७, लग्न राशीचा १२, होऱ्याचा २, नवमांशाचा ९ इत्यादी आपल्या संख्ये इतका विकल्प असतो. ईष्ट कालासाठी दिवसा..दिनमान आणि रात्री..रात्रमान घटीला विकल्प (संख्या) समजावी विशेष माहिति साठी पूढील श्लोक पहा.

## पूर्वीच्या श्लोकाचे स्पष्टीकरण

*विज्ञेया दशकेष्वब्दा ऋतुमासास्तथैव च।*
*अष्टकेष्वपि मासार्ध तिथयश्च तथा स्मृताः।। ४।।*

**भट्टोत्पल :** विज्ञेया इति। तत्र ज्ञातं कस्माद्राशेः कस्यानयनं तत्र ज्ञानार्थमाह–एत्ते चत्वारो राशयः स्थापितास्तेषां मध्ये यो दशगुणो राशिः तत्र प्राग्वदेव नवकदानविशोधनं कर्त्तव्यं एवं कृत्वा दशगुणकर्मयोग्यं स्थापयेत्। एवं पृथक्कर्मभूमिं स्थाप्य तस्य विंशत्याधिकेन शतेन भागमपहृत्य योऽङ्कोऽवशिष्यते तदङ्कसमे वर्षाणि जानाति इति वक्तव्यम्। तस्यैव षड्भिर्भागमपहृत्य तत्र योऽङ्कोऽवशिष्यते तदङ्कसमे शिशिरादारभ्यतौ जात इति वक्तव्यम्। तस्यैव कर्मयोग्यस्थराशेर्द्वाभ्यां भागमपहृत्य यदैकोऽवशिष्यते तदा ज्ञाततौ प्रथमे मासि जन्म इति वाच्यम्। शून्यमवशिष्यते तदा तद्द्वितीये मासि जातः। एवं कृत्वा दशहतः कर्मयोग्यो राशिरपास्यः। यस्य विंशत्यधिकवर्षशतादप्यधिकं जन्मतो व्यतीतं भवति तस्य नष्टजातकज्ञानोपायो नास्ति। योऽसावष्टहतो राशिस्तत्र प्राग्वदेव नवकदानविशोधन विधानं कृत्वा कर्मयोग्यराशिं स्थापयेत्। ततस्तस्य द्वाभ्यां भागमपहृत्य यद्येको–वशिष्यते तदा शुक्लपक्षे जात इति वक्तव्यम्। न किञ्चिदवशिष्यते तदा कृष्णपक्षे जात इति वक्तव्यम्। तस्यैव कर्मयोग्यस्य राशिः पञ्चदशभिर्भागमपहृत्य योऽवशिष्यते तदङ्कसमसङ्ख्यातिथौ जात इति वाच्यम्। एवं कृत्वाऽष्टगुणकर्मयोग्यो राशिरपास्य ।। ४।।

**सती –** कलापिंडाला १० ने गुणून (पूर्वी काढलेल्या प्रमाणे) येणाऱ्या संख्येला वर्षाचा विकल्प १२० ने भागीतल्यानंतर जी संख्या शिल्लक राहते. त्या संखेइतके वर्ष येते. ॠतूच्या विकल्पाने म्हणजे ६ ने भाग दिल्यावर शिल्लक राहिलेल्या संख्येइतके ॠतू येते. महिन्यासाठी कलापिंडाला १२ ने भाग दिल्यावर जी संख्या शिल्लक राहील त्या संखेइतका महिना येईल. पुन्हा ८ ने गुणलेल्या कलापिंडाला पक्षाच्या विकल्याने म्हणजे २ ने भाग दिल्यावर जी संख्या शिल्लक राहिल. तो पक्ष (जसे १ शिल्लक राहिला तर शुक्लपक्ष ० शिल्लक राहीले तर कृष्णपक्ष) आणि जर त्या संख्येला तिथीच्या विकल्पाने म्हणजे १५ ने भागून जी संख्या शिल्लक त्या संख्येइतकी तिथि समजावी.

**विशेष –** तिथीमध्ये शुक्कल प्रतिपदा इत्यादी क्रमानुसार, आणि ॠतूमध्ये वसंत इत्यादी क्रमानुसार मोजावे. वर्ष, ॠतू, महिना काढण्यासाठी गुणकांक १० आहे. पक्ष आणि तिथिचा गुणकांक ८ आहे.वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरद, हेमंत आणि शिशीर हे ६ ॠतू आहेत.

### दिवस, रात्र आणि नक्षत्राचे ज्ञान

*दिवारात्रिप्रसूतिं च नक्षत्रानयनं तथा।*
*सप्तसङ्ख्येऽपि वर्गे तु नित्यमेवोपलक्षयेत्।। ५।।*

**भट्टोत्पल :** दिवारात्रीति। योऽसौ सप्तहतो राशिस्तत्र प्राग्वदेव नवकदानविशोधनं कृत्वा ततः कर्मयोग्यं राशिं स्थापयेत्। तस्य द्वाभ्यां भागमपहृत्य यद्येकोऽवशिष्यते तदा दिने जात इति वाच्यम्। अथ न किञ्चिदवशिष्यते तदा रात्रौ इति वक्तव्यम्। तस्यैव कर्मयोग्यराशेः सप्तविंशत्या भागमपहृत्य योऽङ्कोऽवशिष्यते तदङ्कसमसङ्ख्येके नक्षत्रे अश्विन्यादित आरभ्य जात इति वाच्यम्। अस्य कर्मणः पुनरपि विधानं नक्षत्रानयनस्य बाहुल्येनोपयोगित्वात्।।५।।

**सती –** पूर्वीप्रमाणे मिळविलेल्या कलापिंडाला ७ ने गुणून २ ने भाग दिल्यास जर १ शिल्लक राहत असेल तर दिवस आणि ० शिल्लक राहत असेल तर रात्रीचा जन्म आहे. असे समजावे. कला पिंडाला ७ ने गुणून २७ ने भाग दिल्यानंतर जी संख्या शिल्लक राहील त्या संख्येईतके नक्षत्र (अश्वीन नक्षत्रापासून मोजून येणारी संख्या) समजावे.

### इष्टकाल, लग्न होरा आणि नवमांशाचे ज्ञान



*वेलामथ विलग्नं च होरामंशकमेव च।*
*पञ्चकेषु विजानीयान्नष्टजातकसिद्धये।। ६।।*

**भट्टोत्पल :** वेलामथेति। यस्मिन्दिने पुरूषजन्म जातं तस्य दिनस्य प्रमाणं घटिकादिकं कार्यम्, अथ रात्रौ जन्म जातं तदा रात्रिप्रमाणं ततो योऽसौ पञ्चगुणो राशिः स्थापितः तस्य प्राग्वदेव नवकदानविशोधनं कृत्वा ततो दिनप्रमाणेन रात्रिप्रमाणेन च भागमपहृत्य यदवशिष्यते तस्मिन् काले दिनगते रात्रिगते च तस्य जन्म वाच्यम्। अथ विलग्नमिती काले ज्ञाते राश्यादिलग्नं कार्यम्। तत्र तस्य लग्नस्य होराद्रेष्काणनवांशद्वादशांशक–भागाः कार्याः ततस्तस्य तात्कालिका ग्रहाश्च कर्तव्याः। ततो यथाभिहितेन विधिना दशान्तर्दशाष्टकवर्गादेरभिहितस्य फलानां निर्देशः कार्यः। एवं नष्टजातकं साधयेत्।। ६।।

**सती –** साधन करून मिळाविलेल्या कलापिंडा ला ५ ने गुणून नंतर दिनमानाने (दिवसाचा जन्म असेल तर) किंवा रात्रीमानाने (जर जन्म रात्रीचा असेल तर) भाग दिल्यावर जी संख्या शिल्लक राहिल तो ईष्टकाल समजावा. अशाप्रकारे कलापिंडाला ५ ने गुणून लग्नाच्या विकल्पाने म्हणजे १२ ने भाग दिल्यावर जी संख्या शिल्लक राहील त्या संख्येइतकी राशि मेषादि क्रमानुसार, लग्न समजावे. तसेच होऱ्याच्या विकल्पाने म्हणजे कला पिंडाला २ ने भाग देऊन – १ शिल्लक राहत असेल तर पहिला होरा आणि शुन्य शिल्लक राहत असेल तर २ रा होरा समजावा. कलापिंडाला नवमांशाच्या विकल्पाने म्हणजे ९ ने भाग देऊन शिल्लक राहीलेल्या संख्येईतका नवमांश होईल अशा प्रकारे अज्ञात जन्म काळाच्या ज्ञानावरून नष्ट जन्मपत्र (जन्मकुंडली) बनवावी. त्यावरून मिळालेले फलीत हे माहिती असलेल्या जन्मकालीन कुंडली इतकेच बरोबर असते.

**विशेष –** इष्टकाल, जन्म लग्न, होरा, आणि नवमांशाचा गुणकांक ५ असतो. चर लग्न असल्यास ९ मिळवावे, द्विस्वभाव लग्नात ९ कमी करावे, स्थीर लग्न असता जसेच्या तसे ठेवावे. कलापिंडाला ५ ने गुणून त्याला रात्रीमानाने भाग दिला तर रात्रिचा इष्टकाल मिळतो. प्राप्त इष्टकालात दिनमान जोडले. तर सुर्योदया पासून जन्म वेळेपर्यतचा ईष्टकाल होईल.

| समय | गुणकांक | विकल्पांक |
|---|---|---|
| वर्ष | १० | १२० |
| ऋतु | १० | ६ |
| मास | १० | १२ |
| पक्ष | ८ | २ |

| | | |
|---|---|---|
| तिथी | ८ | १५ |
| दिन (वार) | – | ७ |
| नक्षत्र | ७ | २७ |
| दिन/रात्रि | ८ | २ |
| इष्टकाल | ५ | दिवसाच्या घटी/रात्रिच्या घटी |
| होरा | ५ | २ |
| लग्नराशि | ५ | १२ |
| नवांश | ५ | ९ |

**विशेष उदाहरण –**

| | |
|---|---|
| कलापिण्ड | ५८८४९४। ५ |
| लग्न | ६। २०। १०। ५ |
| दिनमान | २८।००, चरलग्न (तुला), |

**( १ ) वर्ष-ज्ञानार्थ--**

५८८४९४। ५ साधित कलापिण्ड
× १० वर्ष गुणकांक

५८८४९४०। ५०
+ ९ चरलग्नत्वात्

विकल्प १२०) ५८८४९४९। ५० (४९०४१
४८०

१०८४
१०८०

०४९४
४८०

१४९
१२०


२९ बाकी म्हणजे २९ वर्षे

**( २ ) मास-ज्ञानार्थ -**

५८८४९४। ५ कलापिण्ड
× १० गुणकांक
५८८४९४०। ५०
+ ९ चरलग्नत्वात्

विकल्प १२) ५८८४९४९। ५० (४९०४१२
४८
१०८
१०८
०००४९
४८
०१४
१२
०२९
२४
५ शिल्लक म्हणजे ५ वा महीना

**( ३ ) ऋतु-ज्ञानार्थ -**

विकल्प ६) ५८८४९४९। ५० (९८०८२४
५४
०४८
४८
००४९
४८
०१४
१२
०२९
२४
०५ शिल्लक म्हणजेच पाचवा हेमन्त ऋतु।

**( ४ ) पक्षज्ञानार्थ -**

५८८४९४। ५ कलापिण्ड
× ८ पक्ष गुणकांक
________________
४७०७९५२। ४०
+ ९ चरलग्नत्वात्
________________
विकल्प २)४७०७९६१। ४० (२३५३९८०
४
____
०७
६
____
१०
१०
____
००७
६
____
१९
१८
____
०१६
१६
____
००१ शिल्लक १ राहीला म्हणजे शुक्लपक्ष

**( ५ ) तिथी-ज्ञानार्थ-**

विकल्प १५) ४७०७९६१। ४० (३१३८६४
४५
____
०२०
१५
____
०५७
४५
____
१२९
१२०
____
००९६
९०
____
०६१



६०
____
१ शिल्लक म्हणजे १ बरोबर प्रतिपदा तिथि

**( ६ ) दिन/रात्रि-ज्ञानार्थ -**

```
              ५८८४९४। ५      कलापिण्ड
                  × ७        गुणकांक
             ----------------
              ४११९४५८। ३५
                 +   ९       चरलग्नत्वात्
             ----------------
विकल्प   २)   ४११९४६७। ३५ (२०५९७३३
              ४
             --------
              ०११
               १०
             --------
               ०१९
                १८
             --------
                ०१४
                 १४
             --------
                 ००६
                   ६
             --------
                   ०७
                    ६
             --------
                    १ शिल्लक म्हणजे दिवसाचा जन्म
```

**( ७ ) नक्षत्र-ज्ञानार्थ-**

पहा नष्टजातकाध्यायचा श्लोक क्रमांक २ चे उदाहरण

**( ८ )    इष्टकाल-ज्ञानार्थ-**

```
                          ५८८४९४। ५      कलापिण्ड
                          ×  ५           गुणकांक
                       ---------------
                          २९४२४७०। २५
                                + ९      चरलग्नत्वात्
                       ---------------
विकल्प दिनमान    २८)  २९४२४७९। २५ (१०५०८८
                          २८
                         ------
                          ०१४२
                           १४०
                          ------
                           ००२४७
                             २२४
                           ------
                             ०२३९
                              २२४
                            ------
                                १५ शिल्लक म्हणजे इष्टकाल १५।२५
```

**सती –** वरील दिलेल्या उदाहरणांच्या द्वारे वर्षाचे आनयन (–९) ऋतुचे आनयन, महिना/मासाचे आनयन, पक्षाचे आनयन, तिथीचे आनयन दिवस/रात्रीचे आनयन, नक्षत्राचे आनयन आणि इष्टकालाचे आनयन दाखविले आहे. अशाप्रकारे लग्न राशीचे आनयन, होराचे आनयन ई. समजावे. म्हणजेच या विधिचे ज्ञानाने अज्ञात जन्मवेळची कुंडली पण काढली जाऊ शकते.

**अध्याय १६ वा संपला.**

* * * * * * * *

## श्लोकानुक्रमणिका

## परिक्षेत नेहमी विचारल्या जाणारे प्रश्न

**प्रश्न ज्योतिष शास्त्राचे तीन स्कंध कोणते.**

उत्तर सिधान्त, संहिता आणि होरा (जातक)

**प्रश्न शास्त्राचा उद्देश काय आहे.**

उत्तर पूर्व जन्मांच्या केलेल्या शुभ अशुभ कर्मांची संचित फळांना क्रमानुसार प्रकट करणे हा उद्देश आहे.

**प्रश्न लघुजातक या पुस्तकाचे कर्ते कोण आहे.**

उत्तर लघुजातक या पुस्तकाचे कर्ते आदरणीय आचार्य वराहमिहिर हे आहेत.

**प्रश्न लघुजातक या ग्रंथात एकूण किती अध्याय आहेत.**

उत्तर लघुजातक या पुस्तकात एकूण १६ अध्याय आहेत.

**प्रश्न लघुजातक एकूण किती श्लोक आहेत.**

उत्तर लघुजातक एकूण १८२ श्लोक आहेत.

**प्रश्न लघुजातक तयार करतांना कोणत्या छंदाचा उपयोग केलेला आहे.**

उत्तर लघुजातक मध्ये शक्यतोवर आर्या छंदाचा उपयोग केला आहे.

**प्रश्न लघुजातक मध्ये असलेला मंगलाचरणाचा संस्कृत श्लोक लिहा.**

उत्तर यस्योदयात---निधी सूर्य।।

**प्रश्न. मंगलाचरणात कोणत्या देवतेची स्तूति आणि प्रार्थना केली आहे.**

उत्तर. मंगलाचरणात भगवान सूर्याची स्तूति आणि प्रार्थना केली आहे.

**प्रश्न कालपुरूषाचे अवयव मेष इत्यादी क्रमानुसार कोणते.**

उत्तर. मेष-डोके, वृषभ-तोंड, मिथून-हात, कर्क-हृदय, सिंह-पोट, कन्या-कंबर, तुला-गुप्ताद्रिय, वृश्चिक-गुहय भाग धनु-मांडया, मकर-गुडघे, कुंभ-पोटरी, मीन-पाय.

**प्रश्न एकूण राशि किती, त्यांची नावे क्रमानुसार लिहा.**

उत्तर. एकूण १२ राशि आहेत. १) मेष, २)वृषभ, ३) मिथुन, ४) कर्क, ५) सिंह, ६) कन्या, ७) तुला, ८) वृश्चिक, ९) धनु, १०) मकर, ११) कुंभ, १२) मीन.

**प्रश्न राशीचे क्रमवार रंग लिहा**

उत्तर. मेष हलका लाल. वृषभः पांढरा मिथुन-हिरवा कर्कः गुलाबी (पाटल) सिंहः पाण्डु कन्याःविचित्र तुलाः सावळा वृश्चिकः सोन्यासारखा धनुः पिंगल मकरः करडा कुंभः बभ्रुक मीनः मळकट

**प्रश्न. राशींच्या वेगवेगळया व्याख्या लिहा?**

उत्तर. पुरूष–स्त्री राशी, क्रुर–अक्रूर राशी, चर–स्थिर–द्विस्वभाव राशी, शुभ–अशुभ राशी, ईत्यादी आहेत.

**प्रश्न राशींच्या दिशा लिहा.**

उत्तर. पूर्व दिशा–मेष, सिंह, धनु
दक्षिण दिशा–वृषभ, कन्या, मकर
पश्चिम दिशा–मिथून तुला, कुंभ आणि
उत्तर दिशा–कर्क, वृश्चिक, मीन

**प्रश्न राशीचे स्वामी कोणते ते क्रमवार लिहा.**

उत्तर. वृश्चिक मेष–मंगळ, वृषभ व तुला–शुक्र, मिथुन व कन्या–बुध, कर्क–चंद्र, सिंह–सूर्य, धनु व मीन–गुरू, मकर व कुंभ–शनि

**प्रश्न पुरूष राशी, आणि स्त्री राशी कोणत्या**

उत्तर. सर्व विषभ राशी १,३,५,७,९,११, या पुरूष राशि आहेत सर्व समराशी– २,४,६,८,१०,१२ या स्त्री राशी आहेत.

**प्रश्न होरा म्हणजे काय.**

उत्तर. राशीचे दोन सारखे भाग केले असता प्रत्येक १५ अंशाच्या भागाला होरा म्हणतात एक होरा चंद्राचा तर दुसरा होरा सूर्याचा असतो.

**प्रश्न द्रेष्काण कशाला म्हणतात?**

उत्तर राशीचे ३ सारखे भाग केले असता (१–१० अंश) (११ते२०अंश) (२१ते३० अंश). प्रत्येक १० अंशाचा भाग हा पहिला, दुसरा, तिसरा, असे द्रेष्काण असतात. पहिला द्रेष्काण स्वराशीचा, दुसरा पाचव्या राशीचा आणि तिसरा द्रेष्काण तीच्या पासून ९ व्या राशीचा असतो.

**प्रश्न द्वादशांश म्हणजे काय?**

उत्तर. राशीचे सारखे १२ भाग केले असता प्रत्येक २°–३० अंशाला द्वादशांश म्हणतात

**प्रश्न नवमांश म्हणजे काय?**

उत्तर. राशीचे सारखे ९ भाग केले असता. प्रत्येक ३°–२०, अंश केलेल्या भागाला प्रथम ते नवम असे नवमांश म्हणतात.

**प्रश्न. त्रिशांश म्हणजे काय?**

उत्तर. राशीचे सारखे ३० भाग केले असता प्रत्येक भागाला त्रिशांश म्हणतात.

**प्रश्न द्विपद राशी चतुष्पाद राशी कोणत्या?**

उत्तर. द्विपद राशी ३,६,७,११, व धनुचा पूर्वार्ध हया द्विपाद राशी आहेत. चतुष्पाद राशी १,२,५, धनुचा उत्तरार्ध आणि मकरेचा पूर्वार्ध हया चतुष्पाद राशी आहेत.

**प्रश्न कीट राशी-सरिसृप आणि जलचर राशी कोणत्या?**

उत्तर. कीट राशी-कर्क, सरिसृप-वृश्चिक जलचर-मीन व मकरेचा उत्तरार्ध

**प्रश्न कोणत्या दिशेला कोणत्या राशी बलवान असतात.**

उत्तर. पूर्वेला-द्विपद राशी बलवान असतात

दक्षिणेल-चतुष्पाद राशी बलवान असतात.

पश्चिमेला-कीट राशी बलवान असतात.

उत्तरेला-जलचर राशी बलवान असतात.

**प्रश्न बलवान राशी म्हणजे काय?**

उत्तर. जी राशी स्वतःच्या स्वामीने युत व शुभ ग्रहाने दृष्ट असते ती राशी बलवान असते.

**प्रश्न कुंडलीत एकूण घरं किती**

उत्तर. कुडलीत एकूण १२ घर असतात. त्यांना भाव किंवा स्थान असेही म्हणतात.

**प्रश्न कुंडलीत केंद्र स्थाने कोणते**

उत्तर. १,४,७,१० हा केंद्र स्थान आहेत.

**प्रश्न पणफर आणि अपोक्लिम स्थाने कोणते?**

उत्तर. पणफर स्थाने २,५,८,११

अपोक्लिम स्थाने ३,६,९,१२

**प्रश्न कुंडलीतील उपचय व अनुपचय स्थाने कोणते?**

उत्तर. उपचय स्थाने-३,६,१०,११

अनुपचय स्थाने-१,२,४,५,७,८,९ व १२

**प्रश्न ग्रहांच्या उच्च राशी कोणत्या**

उत्तर. सूर्य-मेष, चंद्र-वृषभ, मंगळ-मकर, बुध-कन्या, गुरू-कर्क, शुक्र-मीन, आणि शनि-तुळ राशीच्या उच्चीचा असतो. या उलट उच्च राशीपासून सातवी रास ही त्या ग्रहांची नीच रास असते.



**प्रश्न शीर्षोदय राशी व पृष्ठोदय राशी कोणत्या**

उत्तर. शीर्षोदय राशी-३,५,६,७,८,११

पृष्ठोदय राशी-१,२,४,९,१०

उभयोदयराशी-मीन-१२

**प्रश्न षड्वर्ग कोणते**

उत्तर. लग्न, होरा, द्रेष्काण, नवमांश, द्वादशांश, त्रिशांश हे षड्वर्ग आहेत.

**प्रश्न नवमांशात प्रत्येक नवमांश किती अंशचा असतो.**

उत्तर. प्रत्येक नवमांश हा ३ अंश २० कलेचा असतो.

**प्रश्न कुंडलीतील १२ भावांची क्रमवार नावे सांगा**

उत्तर. कुंडलीत एकूण १२ भाव असतात. ते येणे प्रमाणे

१) लग्न/तनुभाव २) धनभाव ३) पराक्रम भाव ४) सुख-मातृभाव ५) पुत्रभाव ६) शत्रु-रोग भाव ७) जायाभाव ८) मृत्यु भाव ९) धर्मभाव १०) कर्मभाव ११) आयभाव आणि १२) व्ययभाव

**प्रश्न ग्रहांचे कारकत्व लिहा**

सूर्य-आत्मा कारक

चंद्र-मनाचा कारक

मंगळ-पराक्रम/साहस कारक

बुध-वाणिचा कारक

गुरू-ज्ञान व सुखाचा कारक

शुक्र-वासनेचा कारक

शनि-दुःखाचा कारक

**प्रश्न ग्रहांचा दृष्टीक्रम लिहा**

ग्रह ज्या घरात असतो तिथून तो

तिसऱ्या व दहाव्या घराला एकपद दृष्टीने पाहतो.

नवव्या व पाचव्या घराला द्विपाद दृष्टीने पाहतो.

चौथ्या व आठव्या घराला त्रिपाद दृष्टीने पाहतो.

आणि सातव्या घराला चतुष्पाद (पूर्ण) दृष्टीने पाहतो.

**प्रश्न. दिशेचे स्वामी सांगा**

उत्तर. पूर्व, सूर्य, आग्नेय, शुक्र, दक्षिण-मंगळ, नैऋत्य राहू, पश्चिम-शनि, वायव्य-चंद्र उत्तर-बुध, ईशान्य-गुरू.

**प्रश्न. पुरूष ग्रह स्त्री ग्रह, नपुंसक ग्रह कोणते सांगा?**

उत्तर. पुरूष ग्रह–सूर्य, मंगळ, गुरू, स्त्री ग्रह–चंद्र, शुक्र, नपुंसक ग्रह–बुध, शनि,

**प्रश्न. ग्रहांचे वर्ण सांगा?**

उत्तर. ब्राम्हण–गुरू, शुक्र, क्षत्रिय–सूर्य, भौम वैश्यः चंद्र, शुद्र–बुध इतर वर्ण–शनि

**प्रश्न. बलवान भेद–सांगा.**

उत्तर. राशि बल, दिशा बल, चेष्टा बल, काळ–बल नैसर्गिक बल, स्थान बल हे भेद आहेत.

**प्रश्न. सूर्याचे स्वरूप व गुण सविस्तर लिहा**

उत्तर. सूर्य चतुरस्त्र शरीराचा असून, कमी केस, पित्त प्रकृति, मजबूत हाडे, पराक्रमी, शहदासारखे, पिंगट डोळे, लाल–सावळा, मिश्री रंग, तसेच स्थूल शरीराचा असतो.

**प्रश्न. ग्रह मैत्री म्हणजे काय?**

उत्तर. काही ग्रह आपसात, मित्र असतात तर काही एकमेकाचे शत्रु असतात. काही ग्रह मित्रही नाही आणि शत्रुही नाही. म्हणजे सम असतात.

**प्रश्न. पंचधा मैत्री म्हणजे काय? वर्णन करा**

उत्तर. काही ग्रह नैसर्गिक मित्र तर काही नैसर्गिक शत्रु असतात मात्र काही सम असतात मित्रही नाही आणि शत्रुही नाही जेंव्हा ग्रह नैसर्गिक मित्र आणि तत्कालिक मित्र असतात. तेंव्हा ते अधिमित्र असतात. जेंव्हा ग्रह नैसर्गिक शत्रु आणि तत्कालिक शत्रु असतात. तेंव्हा ते अधिशत्रु असतात.

**प्रश्न. सत्याचार्यानुसार ग्रह मैत्री काय आहे?**

उत्तर. चंद्राचा कोणी नैसर्गिक शत्रु नाही तसेच गुरू ग्रह हा कुणाचाही नैसर्गिक शत्रु नाही.

प्रश्न. तात्कालिक मित्र ग्रह स्थान कोणते?

उत्तर. २,३,४,१०,११,१२ ही तत्कालिक मित्र ग्रह स्थाने आहेत.

**प्रश्न तात्कालीक शत्रु ग्रह स्थान कोणते?**

उत्तर. १,५,६,७,८,९ ही तात्कालिक शत्रु ग्रह स्थाने आहेत.

**प्रश्न. सूर्याचे शत्रु मित्र तसेच सम ग्रहांबद्दल सांगा?**

उत्तर. सूर्याचे शनि आणि शुक्र हे शत्रु आहेत, बुध सम तसेच इतर ग्रह (चंद्र, मंगळ, गुरू) हे मित्र ग्रह आहेत.



**प्रश्न. जन्म लग्न, प्रश्न लग्न किंवा आधान लग्न यावरून दीपज्ञान कसे होते?**

उत्तर. जन्माचेवेळी किंवा गर्भधारणेच्या वेळी जर चंद्र शनिच्या नवमांशात असेल किंवा जलचर राशीत असेल किंवा शनि ने युक्त असेल. किंवा लग्नापासून चौथ्या घरात असेल आणि सूर्याची त्यावर दृष्टी नसेल तर जन्माचेवेळी दीव्याचा प्रकाश नसतो.

**प्रश्न. पुरूष जन्म केंव्हा होतो.**

उत्तर. गर्भधान लग्न किंवा प्रश्न लग्नापासून विषम भावात म्हणजे १,३,५,७,९ आणि ११ या घरात शनि ग्रह असेल तर मुलाचा जन्म होतो. वरील सर्व गर्भयोगात ग्रहांच्या बलवत्तेनुसार शक्य आहे असे सांगावे.

**प्रश्न. पुरूष कारक ग्रह कोणते? लिहा?**

उत्तर. सूर्य आणि गुरू हे ग्रह पुरूषकारक आहे.

**प्रश्न. स्त्री कारक ग्रह कोणते? लिहा?**

उत्तर. चंद्र, मंगळ आणि शुक्र हे स्त्री कारक ग्रह आहेत.

**प्रश्न. कोणत्या ग्रहाच्या दृष्टि प्रभावाने जुळे मुलं होतात.**

उत्तर. बुध ग्रहाच्या दृष्टिप्रभावाने जुळे मुलं होतात.

**प्रश्न. १० महिन्यात गर्भाचे स्वरूप तसेच त्या महिन्यांचे स्वामी कोणते? लिहा?**

उत्तर. १. गर्भधारणेपासून पहिल्या महिन्यात कलल म्हणजे रजः वीर्य मिश्रण होते. हया महिन्याचा स्वामी शुक्र असतो.

२. दुसऱ्या महिन्यात पिंड तयार होतो. या महिन्याचा स्वामी मंगळ असतो.

३. तिसऱ्या महिन्यात हात-पाय व इतर अवयव तयार होतात या महिन्याचा स्वामी गुरू असतो.

४. चौथ्या. महिन्यात हाडे तयार होतात. या महिन्याचा स्वामी सुर्य असतो.

५. पाचव्या महिन्यात कातडी तयार होते. या महिन्याचा स्वामी चंद्र असतो.

६. सहाव्या महिन्यात रोम तयार होतात या महिन्याचा स्वामी शनि असतो.

७. सातव्या महिन्यात चेतना निर्माण होते. या महिन्याचा स्वामी बुध असतो.

८. आठव्या महिन्यात आईने सेवन केलेल्या अन्नापासून पोषण होते. या महिन्याचा स्वामी लग्नेश असतो.



९. नवव्या महिन्यात बाळ बाहेर येण्याचा प्रयत्न करते. या महिन्याचा स्वामी चंद्र असतो.

१०. या १० व्या महिन्यात स्त्री बाळंतीन होते. बाळाला जन्म देते. या महिन्याचा स्वामी सुर्य असतो.

**प्रश्न. गर्भाचे संभाव्यह ज्ञान आपल्याला कशावरून होते?**

उत्तर. गर्भाचे संभाव्य ज्ञान आपल्याला प्रश्न करून तसेच गर्भ लग्न (गर्भधान लग्न) यावरून होते.

**प्रश्न. स्त्री-पुरूष योग किंवा मृत्युचे ज्ञान कशामुळे होते?**

उत्तर. पुरूष रोग किंवा मृत्युचे ज्ञान आपल्याला गर्भ लग्नावरून होते.

**प्रश्न. जन्म वेळेचे ज्ञान कशावरून होते?**

उत्तर. जन्म वेळेचे ज्ञान आपल्याला आधान लग्न (गर्भधान) लग्न तसेच प्रश्न लग्नावरून होते.

**प्रश्न जूळे मुलं होण्याचा योग केंव्हा होतो. तसेच गर्भातील मुलं हे पुरूष किंवा स्त्री आहे. हे कसे सांग स्पष्ट करा.**

उत्तर. जर विषम राशी किंवा विषम राशीच्या (१,३,५,७,९ व ११) नवमांशात बलवान सूर्य किंवा बलवान गुरू असेल तर मुलाचा जन्म होतो. तसेच सम राशीच्या (२,४,६,८,१०,१२) नवमांशात बलवान मंगळ, बलवान चंद्र किंवा बलवान शुक्र असेल तर मुलीचा जन्म होईल असे सांगावे जर द्वि:स्वभाव राशीत किंवा द्वि:स्वभाव राशीच्या नवमांशात वरील ग्रह असून त्यावर बुध ग्रहाची दृष्टी असेल तर यमल म्हणजे जुळे मुलं जन्माला येतील असे सांगावे

**प्रश्न. वडीलाच्या गैरहजेरीत बाळाच्या जन्माचा योग लिहा?**

उत्तर. लग्नावर चंद्राची दृष्टि नसेल किंवा चंद्र हा शत्रु आणि बुध यांच्या मध्ये असेल किंवा शनि ग्रह लग्नात असेल किंवा लग्नापासून सातव्या घरात मंगळ ग्रह असेल तेंव्हा या सर्व योगात, वडिलाच्या गैरहजेरीत बाळाचा जन्म होतो.

**प्रश्न. सत्व, गुणी, रजोगुणी, तमोगुणी ग्रह कोणते. लिहा.**

उत्तर. १ सूर्य, चंद्र व गुरू हे सत्वगुणी ग्रह आहेत.

२. बुध, शुक्र हे रजोगुणी ग्रह आहेत.

३. मंगल आणि शनि हे तमोगुणी ग्रह आहेत.

**प्रश्न. कोणताही एक अरिष्टकारक योग लिहा?**



उत्तर. जन्मलग्नापासून ६/८ व्या घरात जर चंद्र असेल आणि त्यावर पापग्रहाची दृष्टी असेल तर जातकाला तत्काळ मरण येते. त्याचा मृत्यु होतो.

**प्रश्न. कोणताही एक अरिष्टभंग योग लिहा?**

उत्तर. शुभग्रहांच्या मध्ये जर पूर्ण चंद्र असेल तर सर्व संकटांचा नाश होतो. जसे सर्पजातीचा नाश गरूड पक्षी करतो.

**प्रश्न. संकट/अरिष्ट योग केंव्हा शक्य आहे?**

उत्तर. शुभ ग्रह निर्व्वल असून त्यासोबत चंद्र नसेल किंवा चंद्राची दृष्टि नसेल तर अरिष्ट योग बनतो.

**प्रश्न. आयुष्यमानात चक्रार्ध हानिक्रम दाखवा?**

उत्तर. जर पापग्रहा लग्नाच्या द्वादश भावात/घरात असतील तर ते सर्व आयुष्याचा नाश करतात. त्याचप्रमाणे

–पापग्रह लग्नाच्या ११ व्या घरात असता

–अर्ध्या आयुष्याचय नाश करतात.

–पापग्रह लग्नाच्या दहाव्या घरात असता एक तृतीयांश आयुष्याचा नाश करतात

–पापग्रह लग्नाच्या नवव्या घरात असता एक चतुर्थाश आयुष्याचा नाश करतात

–पापग्रह लग्नाच्या आठव्या घरात असता एक पंचमांश आयुष्याचा नाश करतात

–पापग्रह लग्नाच्या सातव्या घरात असता एक षष्ठांश आयुष्याचा नाश करतात

मात्र याच घरात शुभ ग्रह असतील तर पापग्रहांच्या मुळे होणारे आयुष्यमाना पेक्षा अर्ध्य आयुष्याचा नाश करतात

**प्रश्न. अरिष्ट भंग योगाचे उदाहरण द्या?**

१) लग्नात (केंद्रस्थ) बलवान गुरू असता सर्व अरिष्टांचे निवारण होते.

२) लग्नेश बलवान असून त्यावर शुभग्रहांची दृष्टि असेल तेंव्हा अरिष्ट भंग होतो.

३) शुभ ग्रहांपैकी कोणताही एक ग्रह बलवान असून केंद्रात असता अरिष्ट भंग होतो

४) अरिष्ट कारक पापग्रह जर षड्वर्गात शुभ वर्गात असून शुभ ग्रहांची त्यावर दृष्टि असेल तरीही अरिष्ट भंग होतो.

५) सर्व ग्रह शीर्षोदय राशीत असता अरिष्ट भंग होतो.

**प्रश्न ग्रहाचे आयुष्यमान दुप्पट आणि तिप्पट केंव्हा होतो?**

उत्तर. जो ग्रह वर्गोत्तम नवमांशात स्वराशित स्वद्रेष्काणात किंवा स्वनव मांशाचा असतो. त्यावेळी त्याचे आयुष्य दुप्पट करावे. जर कोणता ग्रह वक्री असून उच्चीचा असेल त्याचे आयुष्य तिप्पट करावे/समजावे.



**प्रश्न. लघुजातकानुसार बलवत्ते वरून ग्रहांचे दशा क्रम सांगा?**

उत्तर. दशा वर्ष क्रमात सर्वप्रथम लग्न, सूर्य, आणि चंद्र यापैकी जो सर्वात बलवान असेल त्याची दशा बलवत्ते नुसार पहिली दूसरी तिसरी राहिल त्यानंतर केंद्रात असलेल्या ग्रहापैकी जो ग्रह बलवान असेल त्याची दशा बलवत्तेच्या क्रमानुसार राहिल त्यानंतर पणफर स्थानात स्थीत ग्रहांची बालवत्तेनुसार क्रमवार दशा राहील आणि शेवटी आपोक्लिम घरात स्थीत ग्रहांची बलवत्तेनुसार क्रमवार दशा राहिल.

**प्रश्न. सर्व ग्रह केंव्हा व कसे फळे देतात?**

उत्तर. प्रत्येक ग्रह आपल्या स्वभावानुसार शुभ-अशुभ फळे आपापल्या दशा-अंतर्दशेत देतात.

**प्रश्न. अष्टकवर्गात ग्रहांची शुभता आणि अशुभता कशाने दर्शविली जाते.**

उत्तर. अष्टकवर्गात ग्रहांची शुभता बिन्दू (०) ने तर अशुभता उभ्या रेषेने (।) दर्शविली जाते.

**प्रश्न अष्टकवर्गात सूर्याष्टकवर्गाची शुभस्थाने सांगा**

– सूर्याष्टकवर्गाची शुभस्थाने.

– सूर्य हा शनि आणि मंगळापासून १,४,७,१०,११,८,२,९ या स्थानी असता शुभ असतो.

– सूर्य हा शुक्रापासून ६,७,१२ या स्थानी शुभ असतो.

– सूर्य हा गुरूपासून ६,११,५ व ९ या स्थानी शुभ असतो.

– सूर्य हा चंद्रापासून ३,६,१० आणि ११ या स्थानी शुभ असतो.

– सूर्य हा बुधापासून ३,६,११,१०,९,१२ व ५ या स्थानी असता शुभ असतो.

– सूर्य हा लग्नापासून ३,६,११,१०,४ व १२ या स्थानी असता शुभ असतो.

**प्रश्न. अष्टकवर्गाची विशेष तरतूद कशासाठी असते.**

उत्तर. अष्टकवर्गाची विशेष तरतूद ही जन्मकुंडली आणि गोचरीचे ग्रह यांच्या समन्वयाने फळ नेमके काय मिळेल या साठी असते.

**प्रश्न. चंद्रापासून होणारे अनफादी ४ योग थोडक्यात लिहा.**

अनफा योग-जन्मकुंडलीत चंद्रा पासून १२ घरात सूर्य सोडून इतर ग्रह असणे

सुनफा योग- जन्मकुंडलीत चंद्रा पासून दुसऱ्या घरात सूर्य सोडून इतर ग्रह असणे.



दुरूधरा योग- जन्मकुंडलीत चंद्रा पासून दुसऱ्या आणि १२ व्या घरात सूर्य सोडून इतर ग्रह असणे

केमद्रुम योग– जन्मकुंडलीत चंद्रा पासून दुसऱ्या आणि १२ व्या घरात सूर्य तसेच इतर कोणताही ग्रह नसणे.

अनफा, सुनफा, दुरूधरा हे शुभ योग आहेत. मात्र केमद्रुम योग हा अशुभ योग आहे.

**प्रश्न. प्रव्रज्या योग केंव्हा होतो व त्याचे प्रकार लिहा.**

उत्तर. जन्मकुंडलीत एका घरात ४ किंवा ४ पेक्षा जास्त ग्रह असतील तर प्रव्रज्या योग होतो. प्रव्रज्या योगाचे प्रकार खालील प्रमाणे आहेत.

– सूर्य हा प्रव्रज्या योग कारक असेल तर जातक वानप्रस्थाश्रमी होतो.

– चंद्र ग्रह प्रव्रज्या योग कारक असेल तर वृध्दश्रावक म्हणजे जातक कपालिक होतो.

– मंगळ ग्रह प्रव्रज्या योग कारक असेल तर जातक लाल वस्त्र धारण करणारा शक्तिचा उपासक असतो.

– बुध ग्रह प्रव्रज्या योग कारक असेल तर जातक एकदंडी स्वामी होतो.

– गुरू ग्रह प्रव्रज्या योग कारक असेल तर जातक भिक्षू–त्रिदंडी स्वामी होतो.

– शुक्र ग्रह प्रव्रज्या योग कारक असेल तर जातक चक्रधारी योग होतो.

– शनि ग्रह प्रव्रज्या योग कारक असेल तर जातक नागासाधू/योगी बनतो.

**प्रश्न. चंद्रावर इतर ग्रहांच्या दृष्टिमुळे मिळणारे फळा बद्दल थोडक्यात लिहा.**

उत्तर. जन्माच्यावेळी चंद्र ज्या राशीत असेल त्या त्यावर जर त्या राशी स्वामीची दृष्टि असेल तर जातक राजा होतो. चंद्रावर त्या राशी स्वामीच्या मित्राची दृष्टि असेल तर जातक धनवान होतो. ज्या द्रेष्काणात, नवमांशात, द्वादशांशात किंवा त्रिशांशात चंद्र असेल आणि त्याचा स्वामी शुभ ग्रह असेल तर दृष्टि ने सुध्दा शुभ फळ मिळतात.

**प्रश्न. कोणताही एक राजयोगाबद्दल लिहा?**

उत्तर. जर जन्माच्या वेळी एखादा ग्रह उच्चीचा असेल आणि त्याला मित्र ग्रह पाहत असेल. तर तो जातक राजा होतो. ३ किंवा अधिक ग्रह बलवान असून केंद्रात असतील तर जातक राजा होतो.

**प्रश्न. वेशिस्थान कशाला म्हणतात.**



उत्तर. यवनाचार्यानुसार सूर्य ज्या राशी असतो. त्यापासून दुसऱ्या स्थानाला वेशिस्थान म्हणतात. जन्मकुंडलीत वेशिस्थान स्वस्वामी आणि शुभ ग्रहाने युक्त किंवा

दृष्ट असेल तर शुभ असते.

**प्रश्न. रज्जू योग म्हणजे काय थोडक्यात लिहा?**

उत्तर. जातकाच्या जन्माच्यावेळी सर्व सातही ग्रह (सूर्यादी ग्रह) जन्माचे वेळी जर चरराशीत असतील तर तो रज्जूयोग होतो.

**प्रश्न. मुसलयोग म्हणजे काय? थोडक्यात लिहा**

उत्तर. जातकाच्या जन्माच्या वेळी जर सर्व सातही ग्रह (सूर्यादी ग्रह) स्थीर राशीत असतील तर मुसल योग होतो.

**प्रश्न. नलयोग म्हणजे काय? थोडक्यात लिहा.**

उत्तर. जातकाच्या जन्माच्या वेळी सर्व सातही ग्रह (सूर्यादी) द्विःस्वभाव राशीत असतील तर नल योग होतो.

२) माला योग : जन्म लग्नापासून कोणत्याही तीन केंद्रस्थानात तीन शुभ ग्रह (पाप ग्रह र ) असता माला योग होतो. हा शुभ फळे देतो यात सुखी जातकाचा जन्म होतो.

**प्रश्न. गदादीः आकृति योग कोणते थोडक्यात लिहाः**

उत्तर. एकूण ४ आकृति योग आहेत. ते म्हणजे

१) गदा योग २) शकट योग ३) विहंग योग आणि ४) शृंगाष्टक योग

१) गदायोगः जन्मकुंडली कोणतेही दोन लागून असलेल्या केंद्रस्थानात सर्व ग्रह असता गदा योग होतो. जसे लग्न-चतुर्थ, चतुर्थ-सप्तम, सप्तम-दशम, दशम-लग्न,

२) जन्म कुंडलीत लग्न आणि सातव्या घरात सर्व ग्रह असता शकट योग होतो.

३) जन्मकुंडलीत दहाव्या आणि चौथ्या घरात सर्व ग्रह असता विहंग योग होतो.

४) श्रृंगाष्टक योगः लग्नात, पाचव्या आणि नवव्या घरात सर्व ग्रह असतील तर तो श्रृंगाष्टक योग होतो.

**प्रश्न. स्त्रीचा ब्रम्हवादिनी होण्याचा योग सांगा**

उत्तर. स्त्रीच्या जन्माच्यावेळी बलवान शुक्र, मंगळ, गुरू, आणि बुध हे लग्नात असतील आणि समराशीचे लग्न (२,४,६,८,१०,१२) असेल तर स्त्री हो ब्रम्हवादिनी मोक्ष शास्त्रिज्ञ आणि किर्तीमान असते/होते.



**प्रश्न. आठव्या घरातील स्थीत ग्रहांवरून मृत्युचे कारण कसे समजते.**

१) जन्म कुंडलीत आठव्या घरात सर्व असता अग्नीमुळे मृत्यु होतो.
२) जन्म कुंडलीत आठव्या घरात चंद्र असेल तर पाण्यामुळे मृत्यु होतो.
३) जन्म कुंडलीत आठव्या घरात मंगळ असेल तर अस्त्रश स्थाने मृत्यु होतो.
४) जन्म कुंडलीत आठव्या घरात बुध असेल तर तापाने मृत्यु होतो.
५) जन्म कुंडलीत आठव्या घरात गुरू असेल तर अजीर्णाने मृत्यु होतो.
६) जन्म कुंडलीत आठव्या घरात शुक्र असेल तर भूकेने मृत्यु होतो.
७) जन्म कुंडलीत आठव्या घरात शनि असेल तर तहानेने मृत्यु होतो.

**प्रश्न. मरणानंतर जातकाला कोणती गती मिळते.**

उत्तर. लग्नापासून ६,७ आणि ८ व्या घरात बलवान ग्रह असता त्यानुसार मरणानंतर गती प्राप्त होते. जसे–

– वरील स्थानात गुरू बली असेल तर देवलोक प्राप्ति होते. जसे–
– चंद्र किंवा शुक्र बलवान असेल तर पितृलोकाची प्राप्ति होते.
– सूर्य किंवा मंगळ बलवान असेल तर मृत्युलोकाची प्राप्ती होते.
– बुध किंवा शनि बलवान असता नरक लोकांची प्राप्ती होते.

**समाप्त**

-----------------------------------

**: ग्रंथ मिळण्याचे ठिकाण :**

**सौ. मधुमालती नंदकिशोर बढे**

१०२, अमृत निकेतन अपार्टमेंटस्, पहिला मजला,
जी.एस.कॉमर्स कॉलेजसमोर, गोरेपेठ, अमरावती रोड,
नागपूर–४४००१० महाराष्ट्र, भारत.

**भ्रमणध्वनी क्र. ९४२२१२९१३९, ९७६६५४०७९१**